


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

पु. ल. देशपांडे विशेषांक

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ पुरस्कृत
महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुखपत्र

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

**संपादन-समिती**
प्रा. गंगाधर गाडगीळ
श्री. व्यंकटेश माडगूळकर
प्रा. रमेश तेंडुलकर
डॉ. वा. वा. दातार
प्रा. कृ. ब. निकुंब
श्री. रा. ज. देशमुख

मूल्य : सहा रुपये



**अंक : १९०-१९१**
**आषाढ ते मार्गशीर्ष**
**शके १८९६**
**जुलै ते डिसेंबर**
**१९७४**
**प्रसिद्धी दिनांक**
**२६ डिसेंबर १९७४**

**संपादक**
**डॉ. भालचंद्र फडके**

✲

प्रकाशक व मुद्रक : श्री. वासू देशपांडे, कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद
टिळक रस्ता, पुणे ३०. मुद्रक : श्री. चिं. स. लाटकर, कल्पना मुद्रणालय, पुणे ३०

अनुक्रमणिका

# संपादकीय

## उत्सव बहु थोर होत

साहित्य संमेलनाचे सुवर्णमहोत्सवी अधिवेशन पद्मश्री पु. ल. देशपांडे यांच्या अध्यक्षतेखाली २६, २७ व २८ डिसेंबर १९७४ रोजी इचलकरंजी येथे होत आहे. हा केवढा सोनियाचा दिन! ग्वाल्हेरच्या संमेलनात श्री. माधवराव अणे म्हणाले होते की, साहित्य संमेलन म्हणजे श्रीशारदादेवीच्या वाङ्मयपूजेचा साहित्यभक्तांकडून होणारा मंगलोत्सव! या मंगलोत्सवाची आदी प्रेरणा महाराष्ट्राचे पुण्यपुरुष न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे व गोपाळराव हरी देशमुख (लोकहितवादी) यांची. पहिले ग्रंथकार संमेलन पुण्यास ११ मे १८७८ रोजी भरले! आता या सुवर्णमहोत्सवी संमेलनास भारताच्या कानाकोपऱ्यातून मराठी भाषा, मराठी साहित्य आणि मराठी संस्कृती यांवर प्रेम करणारा मराठी माणूस येणार आणि अपूर्व सोहळा पाहून धन्य होणार! या संमेलनाचे अध्यक्षपद हा मराठी लेखकाला मिळणारा सर्वोच्च बहुमान होय असेच मराठी लेखक मानीत आला आहे. आमचे मित्र पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे यांना आजवर कितीतरी मानचिन्हे लाभली. १९६५ मध्ये नांदेड येथे भरलेल्या नाट्यपरिषदेच्या अध्यक्षपदाचा मान त्यांना लाभला. ‘ व्यक्ती आणि वल्ली ’ या ग्रंथास भारत सरकारने पारितोषिक दिले. १९६७ च्या डिसेंबरात नाट्य अकादमीने नाट्यलेखनाबद्दल गौरव केला. भारत सरकारने ‘ पद्मश्री ’ ही पदवी देऊन त्यांचा उचित गौरव केला. आणि आता मराठी रसिकतेने सुवर्णमहोत्सवी संमेलनाच्या अध्यक्षपदी पु. ल. ना विराजमान करून आपले त्यांच्यावरील असीम प्रेम व्यक्त केले आहे. पु. ल. देशपांडे यांचे आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतो.

अनुक्रमणिका







## माणसात रंगलेला थोर अंतःकरणाचा ललित लेखक — पु. ल. देशपांडे

जो जीवन खऱ्या अर्थाने जगतो तोच श्रेष्ठ ललित लेखक होऊ शकतो. पु. लं. नी जीवनाच्या विविध क्षेत्रांत जे पाहिले ते ज्ञात्याचे पाहणे होते म्हणूनच आपल्या अनुभवांना त्यांना गोचर करता आले. आपल्या प्रसन्न आणि टवटवीत व्यक्तिमत्त्वाने ते सगळ्यांनाच जिंकून टाकतात. त्यांच्या व्यक्तित्वातील प्रसन्नता त्यांच्या साहित्यात आहे. माहीमच्या ओरिएंट हायस्कूलमध्ये शिक्षक म्हणून काम करीत असता ते मुलांना शिकवीत असत, " मुलांनो, जीवन जगण्यासाठी आहे. जीवनानंद हेच जीवनाचे श्रेय. "

जीवनानंद मिळविण्याचे भाग्य पु. लं. ना सहज लाभलेले नाही. त्यासाठी त्यांना झुंजावे लागले आहे. विविध क्षेत्रांत जीवनाला सामोरे जावे लागले आहे. अध्ययन, अध्यापन व कारकुनी करीत असता त्यांना मध्यमवर्गीय माणसाचे जीवन जवळून पाहता आले. त्यांची सुखदुःखे, त्यांची किरटी स्वप्ने, क्षुद्र आकांक्षा, त्यांच्या बळकट निष्ठा, त्यांची अगतिकता इत्यादिकांचा त्यांना वेध घेता आला म्हणूनच त्यांना मध्यमवर्गाचे व्यंगचित्रण करता आले. भाऊसाहेब खांडेकर हे मध्यमवर्गाचे भाष्यकार आहेत तर पु. ल. मध्यमवर्गाचे खरेखुरे व्यंगचित्रकार आहेत. 'तुळशी वृंदावनापासून ते कॅक्टस कुंडी'पर्यंत न कळत काळाबरोबर वाहत गेलेला एक कारकून त्यांना गवसतो तो याच मध्यमवर्गात आणि त्याची आत्मकथा ते 'असा मी असा मी' मध्ये निवेदितात. कारण ते लिहितात, " ह्या अफाट मुंबई शहरातल्या ज्या मध्यमवर्गीय समाजात मी वाढलो त्यातलाच हा एक (कारकून) " आणि हे खरे आहे. हरिभाऊ आपट्यांची कादंबरी नाही का पांढरपेशा मध्यम वर्गाचे प्रत्ययकारी चित्र रेखाटत ? ललित लेखकाच्या कृतीचा विचार करीत असता त्या लेखकाचा प्रकृतिधर्म ( Sensibility ) लक्षात घ्यावा लागतो. लेखकाच्या प्रकृतिधर्माची जी जडणघडण होते त्यात तो ज्या वर्गात वाढतो, ज्या रीतीने अनुभव घेतो, जे वाङ्मयीन संस्कार त्याच्यावर होत असतात त्याचा प्रामुख्याने समावेश असतो. लेखक विशिष्ट वर्गाचे चित्रण करतो म्हणून तो कमी प्रतीचा नसतो. उलट आपण जे अनुभविले तेच तो व्यक्त करू शकतो. 'असा मी असा मी' किंवा 'बटाट्याची चाळ' मधील लेखन वाचीत असताना पांढरपेशा मध्यमवर्गात वाढलेल्या पु. लं. चे सकस समृद्ध व्यक्तिमत्त्व आपल्याला जाणवते. बटाट्याच्या चाळीतील एच. मंगेशराव, हट्टंगडी, राघूनाना सोमण, आचार्य बाबा बर्वे, अण्णा पावशे, गुप्ते इ. सगळी मंडळी आपल्या ओळखीची, नव्हे आपल्यातलीच वाटतात. त्यांच्या आवडीनिवडी वेगळ्या, छंद वेगवेगळे, स्वप्ने वेगवेगळी पण सर्वांच्या ठायी 'माणुसकीचा ओलावा' आहे. पु. ल. अगदी सहजपणे बटाट्याच्या चाळीतील व्यथांना वाचा फोडतात आणि त्यांच्या अंतःकरणातल्या ओलाव्याचेही दर्शन घडवितात. मूल्यांना जपावं ही ओढ ज्या माणसांत आहे, अशी माणसं पु. लं. ना प्रिय असतात. त्यांच्याशी पु. लं. ची 'वेव्हलेंग्थ' जुळते

आणि म्हणून ते ज्यांच्याविषयी लिहितात त्यांना जिवंत करतात. 'व्यक्ती आणि वल्ली'-मधील त्यांनी रेखाटलेल्या व्यक्ती कल्पित खऱ्या पण त्यांचे मूळ वास्तवात आहे. लेखकाच्या अनुभवविश्वात आहे. दुसऱ्यासाठी झिजण्यात सुख मानणारा नारायण, इतिहासात रंगून गेलेले हरितात्या, निःसंग वेडर नामू परीट, खिसेकापून आणि हातभट्टीच्या धंद्यावर गबर झालेला बबडू, मोठ्यांचं अनुकरण करणारा, त्यांचा उपदेश शिरोधार्य मानणारा सखाराम गटणे, प्रणयानं पेटलेला, धुंद झालेला नाथा कामत, मुलावर अपार माया करणारे चितळे मास्तर, अंतू बर्वा, लखू रिसबूड इ. सगळ्या व्यक्ती जपण्यासारखं काही तरी जपत आहेत आणि जगत आहेत. अखेर या जीविताचा अर्थ तरी काय असतो? कशासाठी तरी जगायचे असते आणि मरायचेही असते. आयुष्य झोकून देणारी, सूर शोधणारी माणसं पु. लं. ना जवळची वाटतात. अशा माणसांनीच त्यांचं अफाट 'गणगोत' घडलेलं आहे. ते लिहितात, "प्रत्येकाला कधी जवळीक तर कधी दुरावा अशा हेलकाव्यात तरंगणारे गणगोत लाभतच असते. माणूस कधीही एकटा नसतो. त्याने तसे असूही नये. माझे गणगोत फार मोठे आहे. अनिलांनी म्हटल्याप्रमाणे 'इथे सखे नि सोयरी, कुणी इथे कुणी तिथे.'"

शब्द, सूर आणि लय यांच्या सृष्टीत धुंद होणारा पु. ल. एक श्रेष्ठ ललितलेखक आहे. सुरांच्या दुनियेत तो एक 'ऐकणारा' रसिक आहे. हिराबाई, बालगंधर्व, मल्लिकार्जुन, भीमसेन, सवाई गंधर्व, वसंतराव देशपांडे, कुमार गंधर्व, इ. शेकडो गवयांच्या मैफलीतून त्यांनी 'सूर' भोगले आहेत. मग त्यांना वाटतं की, अंतश्चक्षूंना दिसणारी रागाची मूर्ती हलके-हलके नटवीत हिराबाई गाऊ लागल्या की शीतल वाऱ्याची जणू झुळूक अंगावर येते. किंवा बालगंधर्वांबद्दल ते लिहितात की त्यांच्या भीमपलास–बागेश्रीतला कोमल गंधार–निषाद ऐकल्यावर बाकीच्यांचे गंधार–निषाद उपरे वाटतात. पु. लं. च्या 'गणगोता'त माणसं किती तऱ्हेची, किती गुणाची, किती विविध वृत्तीची! त्यात इतिहास आणि त्याच्याशी संलग्न स्थावर-जंगम आणि सजीव गोष्टी यांच्यासंबंधीच्या वेडानं झपाटलेले, शिवरायचरित्र कथन करण्याचे व्रत घेतलेले बाबासाहेब पुरंदरे आहेत, मास्तर नसलेले फणसळकर मास्तर आहेत, माणूस माणसाजवळ यावा म्हणून 'पदयात्रा' करणारे स्थितप्रज्ञ विनोबा आहेत, रस-रूप-रंग-गंध-नाद यांचा आस्वाद घेत 'ही मजबूरी आहे भाई' असे म्हणणारे रामूभय्या दाते आहेत, हसत आणि हसवीत दारिद्र्याला उंबरठ्याबाहेर ठेवणारी 'बाय' आहे, बाहेरून खडबडीत पण आतून माणसाचे लोभी असलेले, जिव्हाळ्याने जिंकणारे परखड बोलणारे, आतिथ्यशील राजे देशमुख आहेत, बेळगावचे रावसाहेब कृष्णराव हरिहर आहेत, म्युझिक डॉयरेक्टर केशवराव भोळे आहेत, असामान्य ताकदीचे नट केशवराव दाते, रसीले गायक कुमार गंधर्व आहेत, इंटरनॅशनलचे दीक्षित आहेत. अशी किती तरी माणसे! या माणसांत पु. ल. रंगून जातात. अशा माणसांच्या जगात वावरताना त्यांना 'संगती'चा शोध लागतो आणि 'विसं-

गती'ची जाणीव होते. मराठीत त्यांनी जे विनोदी लेखन केले त्यामागे हेच सूत्र आहे. तसा पु. लं. चा विनोद एका विशिष्ट परंपरेतला नाही. त्यात अनेक रंग मिसळले आहेत. रविकिरण मंडळातील कवी ज्या कालखंडात कविता करीत होते त्या कालखंडात काव्य-क्षेत्रातील सांकेतिकतेचा, यांत्रिकतेचा, अनिष्ट प्रवृत्तींचा उपहास करण्याच्या दृष्टीने 'झेंडूच्या फुलां'चा जन्म झाला. पु. ल. यांच्या 'आणखी एक रस' महाराष्ट्रातील महानुभाव संप्रदाय, निष्काम साहित्यसेवा, आगामी आत्मचरित्र इ. सारख्या लेखांत पु. लं. चे लेखन आचार्य अत्र्यांचा वारसा घेऊन जन्मले आहे. या लेखातून साहित्य-क्षेत्रातील अनिष्ट प्रथांचे उपहासगर्भ दर्शन आहे. मराठी विनोदाला खरी प्रतिष्ठा लाभली ती श्रीपाद कृष्णांच्या 'सुदाम्याचे पोहे' मधील लेखनामुळे! श्रीपाद कृष्णांचे लेखन हेतु-पूर्वक होते. रूढिदासांच्या डोळ्यांत अंजन घालून त्या रूढींचे व चालींचे अनिष्टत्व वाचकांच्या नजरेस आणावे असा त्यांचा हेतू होता. म्हणून तर श्रीपाद कृष्ण एक वैचारिक भूमिका स्वीकारून लेखन करीत होते. सामान्यतः विनोदी लेखक एक तर नीतिज्ञ,औचित्य-विचार मांडणारा तरी असतो किंवा सामाजिक व्यवहारात ग्राह्य कोणते अग्राह्य कोणते ते सांगणारा पंच तरी असतो. त्यामुळे त्याला बहुमताची कदर करणे क्रमप्राप्त असते. सर्वांना रुचेल पचेल अशा विचारांचा पुरस्कार करणे अटळ होते. या अर्थाने तो नीतिवादी मूल्य मानणारा आणि सामाजिक क्षेत्रात सनातनी (Conservative) असतो. समाजाच्या आचारविचारांचे चिंतन, परीक्षण आणि मूल्यमापन करू पाहणाऱ्या श्रीपाद कृष्णांच्या विनोदाची जात अनन्यसाधारण होती. श्रीपाद कृष्णांप्रमाणे व्यंगदर्शन आणि व्यंगनिर्मूलन हे पु. लं. च्या विनोदी लेखनामागचे हेतू असावे. श्रीपाद कृष्णांच्या जवळ व्यंग्यविषयीभूत व्यक्तींबद्दल सहृदयता नव्हती ती पु. लं. च्या जवळ आहे, म्हणून संगीत-चिवडामणी, आदर्श समाजसेविका, बटाट्याच्या चाळीतील चाळकरी, इ. ओळखीचे वाटतात. श्रीपाद कृष्णांचे पांडुतात्या, सुदामा, बंडूनाना किंवा गडकऱ्यांचा बाळकराम सरासरीपेक्षा अधिक मूर्ख असल्याचे दाखविले गेल्यामुळे ती दूरची वाटतात अशी चिं. वि. जोशी यांची मार्मिक टीका होती. पु. लं. च्या व्यक्तिचित्रांची गत निराळी. ती माणसे आपल्यातच आहेत असे वाटते.

पु. लं. ना जे उपहासविषय गवसले ते अवतीभवतीच्या जीवनात आणि साहित्य-क्षेत्रात, त्यामुळे ज्यांना 'मध्यमवर्ग' वा 'साहित्यक्षेत्र' परिचित आहे ते पु. लं. चे लेखन आस्वादू शकतात. विनोदनिर्मितीसाठी पु. लं. नी कोटी, उपरोध, उपहास, टवाळी, व्याजोक्ती, वक्रोक्ती, ऊनोक्ती, इ. सर्व आयुधे सामर्थ्यानिशी वापरली आहेत. ते आपल्या विनोदी लेखनासंबंधी म्हणतात, "नैराश्याचा अंधकार नाहीसा करणं, उदासीनतेची कोळीष्टकं झटकून टाकून ढोंगाचा फुगा फोडणं, दुःखाश्रू पुसणं हे माझ्या विनोदाचं प्रयोजन आहे. ज्याच्यावर शस्त्र चालवीन त्याची चांगली गुळगुळीत करीन पण त्याला कुठेही जखम होऊ न देता". त्यांचे लेखन या भूमिकेतूनच झाले आहे.

अनुक्रमणिका

पु. लं ना तत्त्वचर्चा करण्याचा कंटाळा आहे. पण आपण जे चांगले वाचले, चांगले ऐकले, चांगले पाहिले त्याचे मर्म ते अगदी भारावून सांगतात. उत्तम वाङ्मय कोणते हे सांगताना ते म्हणतात, "जे वाचायला घेतल्याबरोबर पहिल्या ओळीपासून शेवटच्या ओळीपर्यंत मला इतर सर्व गोष्टींचा विसर पाडून 'आपल्याबरोबर ओढीत नेते ते माझ्या दृष्टीने उत्तम वाङ्मय. मग ते कुठल्याही शतकातील असो वा कुठल्याही देशातले असो." वाङ्मयातील प्रसादगुण म्हणजे अवगुण नव्हे अशी त्यांची श्रद्धा! "जे वाङ्मय, जे संगीत मला धुंद करते, एका निराळ्या विश्वात मला नकळत उचलून नेते ते वाङ्मय मला माझे वाटते." नववाङ्मय तेवढे सत्य आणि इतर वाङ्मय मिथ्या असा समज ते कधीच करून घेत नाहीत. जणू 'उत्कट भव्य ते घ्यावे' अशी समर्थांची 'टीप' घेऊनच ते वाङ्मयाला सामोरे जातात. ते असं मानतात की ललित साहित्याचा उद्देश आनंदाची निर्मिती हा तर खराच, परंतु तो आनंद देणाऱ्या आणि घेणाऱ्या माणसाचे जीवन अधिकाधिक शुद्ध व्हावे ही देखील तळमळ उत्पन्न करण्याची शक्ती त्यात दडलेली हवी. म्हणून ते बडोदे येथे मराठी वाङ्मय परिषदेसमोर म्हणाले होते, "आजच्या भयग्रस्त जगाला सामाजिक आणि राजकीय आपत्तींनी त्रस्त झालेल्या समाजाला धीर देण्याचे कार्य द्रष्ट्या साहित्यिकाचे आहे." साहित्यनिर्मात्याने हा 'स्वधर्म' ओळखून लिहावे असे त्यांचे सांगणे आहे. साहित्यावर व साहित्याचा विषय असलेल्या माणसावर अपार प्रेम करणारा हा 'पुरुषोत्तम' सुवर्णमहोत्सवी संमेलनात अग्रपूजेचा मान मिळवीत आहे याचा आम्हा मराठी माणसाला आनंद — अपार आनंद होतो आहे हे निःसंशय!

## राजर्षी शाहूमहाराजांना अभिवादन!

समाजसेवेचे व्रत अखंडपणे चालवणारे राजर्षी शाहूमहाराज ही एक प्रचंड प्रेरक शक्ती होती. सामाजिक परिवर्तनाच्या चक्राला फुले–लोकहितवादी–आगरकरांनंतर जर कुणी गती दिली असेल तर ती राजर्षी शाहूमहाराजांनी! सामाजिक गुलामगिरीच्या विरुद्ध सर्वशक्तीनिशी झगडणारे जनतेच्या स्वातंत्र्याचे ते सेनापती होते. शाहू छत्रपतींनी २ एप्रिल १८९४ रोजी अधिकारग्रहण केले आणि कोल्हापूरचे राजे म्हणून त्यांनी चिरस्मरणीय कामगिरी बजावली. लॉर्ड हॅरिसला पाठविलेल्या एका पत्रात (२१–१–१८९५) ते म्हणतात, "माझ्या प्रजाजनांशी प्रत्यक्ष बोलण्यामध्ये त्यांच्या व रयतेच्या अडीअडचणी व त्यांच्या गरजा समजावून घेण्यामध्ये मला आनंद वाटतो." जनतेचे कल्याण करणारा हा महान राजा होता. पुत्रवियोगाची व्यथा सोशीत ते गोरगरिबांना मदत करीत राहिले. शाहू छत्रपती बोलके सुधारक नव्हते तर ते कर्ते सुधारक होते. अस्पृश्यता-निवारणाचे फार मोठे कार्य त्यांनी पार पाडले. जातिनिर्मूलनासाठी त्यांनी आक्रमक पवित्रा घेतला. प्रचलित धर्मसुधारणांसाठी त्यांनी आर्यसमाज व सत्यशोधक समाजाच्या आंदोलनाला पाठिंबा दिला. जे धर्मनिर्णय त्यांनी घेतले त्यामागे मानवधर्माच्या प्रतिष्ठेची

अनुक्रमणिका

भावना होती. भारतीय समाजातील दुबळ्या घटकांच्या उत्कर्षामध्ये महाराजांनी देशाच्या उत्कर्षाचे स्वप्न पाहिले असे म्हटले पाहिजे. " जातिभेद मोडून टाकून आपण सर्व एक होऊ या " हाच राजर्षींचा संदेश होता. तो आजच्या काळालाही प्रेरक व्हावा अशीच कुणीही इच्छा करील.

## व्यक्तीपेक्षा कृती श्रेष्ठ : चारुता सागर

एकोणीसशे एकाहत्तर सालच्या सर्वोत्कृष्ट मराठी कथेबद्दल कॅ. लिमये पारितोषिक मिळविणाऱ्या चारुता सागर हे नाव धारण करणाऱ्या लेखकाचा सत्कार हिन्दी कथेला नवी दिशा देणाऱ्या श्रेष्ठ कथालेखकाच्या – श्री. कमलेश्वरांच्या हस्ते झाला. सर्वोत्कृष्ट मराठी कथेच्या आठव्या ( १९७१ ) भागाचे संपादन श्री. राम कोलारकर यांनी परिश्रमपूर्वक केले आहे. चारुता सागरांच्या ' नागीण ' या कथेचे सामर्थ्य अगदी निराळे ! ती कथा मनुष्याच्या मनातील ' भया 'सारख्या मूलभूत भावनेला गोचर करू पाहते. या लेखकाला जी. ए. यांच्याप्रमाणेच प्रत्येक घटना म्हणजे एक कूट, एक रहस्य, एक गूढ वाटत आहे. माणूस आणि जनावर यांची जगं किती भिन्न पण या कथेत ती एकमेकात मिसळून जातात. चारुता सागर 'नागीण' या कथेत लिहितात, " माणसाचं काय आणि जनावराचं काय ? दुःख मिळून सारखेच. माणसं ओरडून दाखवितेत आणि जनावरं गिळून टाकतेत. " या सूत्राभोवती भयभीत चंद्रा, बापू आणि नागीण यांच्या परस्पर संबंधातून संथ लयीत तर कधी द्रुत लयीत कथा उमलते. ही कथा या मातीतली, जसं जागवलं तसं सांगितलं या जाणिवेतून फुललेली आहे ! असं कमलेश्वर म्हणाले ते किती खरं आहे. तसेच एका वर्षातील सर्वोत्कृष्ट कथेला एक हजार रुपयाचे पारितोषिक देण्याचा एकमेव उपक्रम सबंध हिंदुस्थानात मराठी भाषेतच असावा. या शब्दांत त्यांनी ' कॅप्टन लिमये लघुकथा पारितोषिक ' देण्याच्या उपक्रमाचा गौरव केला. जीवनातले चढउतार अनुभवणारे, दुःखाचे घोट गिळणारे, दारिद्र्याशी झगडणारा आणि या जीविताचा अर्थ शोधू पाहणारे चारुता सागर उत्तरादाखल एवढंच म्हणाले, " मी चारुता सागर. व्यक्तीपेक्षा कलाकृती श्रेष्ठ, सत्कार ' नागीण ' या कथेचा, माझा नाही. " जातिवंत कलावंताचे यापरते दुसरे लक्षण कोणते ?

## कै. मा. का. देशपांडे : श्रद्धांजली

प्रा. मा. का. देशपांडे नुकतेच कालवश झाले. एक वादळी व्यक्तिमत्त्व काळाच्या पडद्याआड गेले. इंग्रजी वाङ्मय आणि इंग्रजी भाषा यांचे निष्णात प्राध्यापक म्हणून त्यांचा महाराष्ट्रात लौकिक होता. एखाद्या वाङ्मयीन प्रश्नाकडे वा वाङ्मयकृतीकडे पाहण्याची त्यांची अशी खास स्वतंत्र दृष्टी होती. कुणाला आवडो वा न आवडो ते आपले विचार निर्भयपणे व्यक्त करीत. त्यामुळे ते वादळे निर्माण करीत. अत्रे, खांडेकर, फडके

यांच्या वाङ्मयकृतींचा अभ्यास त्यांनी सादर केला आहे. त्यातून त्यांचा चिकित्सक पिंड प्रत्ययास येतो. साहित्य-साधना, संत आणि सायन्स इ. ग्रंथांचा हा लेखक आपल्या कवितांतून मात्र आपल्या व्यथांना गोचर करीत असावा. प्रा. देशपांडे यांच्याशी वाङ्मयीन चर्चा करताना एक अपूर्व आनंद मिळत असे. त्यांच्याशी गप्पागोष्टी करताना त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या काही वेगळ्याच छटा ध्यानी येत. असा हा मनस्वी माणूस, आपल्याच जगात हरवून गेलेला, एकलेपणा अनुभवणारा कायमचा दुरावला एवढे मात्र खरे !

## कै. डॉ. शं. दा. पेंडसे : श्रद्धांजली

संतवाङ्मयाचे एक ज्येष्ठ अभ्यासक, पंढरपूर येथे भरलेल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष डॉ. शं. दा. पेंडसे वैकुंठवासी झाले. साहित्य परिषदेच्या कार्यात त्यांना अधिक रस होता. संस्कृत व मराठी भाषेवर त्यांचे अतिशय प्रभुत्व होते. आपल्या रसाळ वक्तृत्वाने ते कोणतीही सभा सहज जिंकत. १९२७ ते १९६७ अशी चाळीस वर्षे नागपूर येथील हिस्लॉप कॉलेजात त्यांनी मराठीचे अध्यापन केले. सेवानिवृत्तीनंतर ते पुण्यास आले. लेखन आणि वाचनात ते सदैव गढलेले असत. 'महाराष्ट्राचा भागवतधर्म' या शीर्षकाखाली ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम व रामदास यांच्या ग्रंथसंपदेचे मूल्यमापन करावे असा त्यांनी सोडलेला संकल्प सिद्धीस गेला. अलीकडील या ग्रंथांव्यतिरिक्त महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास, ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान, वैदिक वाङ्मयातील भागवत धर्माचा विकास इ. त्यांचे ग्रंथ ख्यात पावलेले आहेत. आम्ही त्यांना श्रद्धांजली वाहतो.

## अभिनन्दन !

भारतीय ज्ञानपीठाचे एक लाख रुपयांचे सर्वोच्च पारितोषिक श्री. मोहन्ती व कविवर्य डॉ. द. रा. बेन्द्रे यांना विभागून मिळाले याबद्दल आम्ही या दोन श्रेष्ठ साहित्यिकांचे मनःपूर्वक अभिनंदन करतो.

साहित्य अकादमीने वि. वा. शिरवाडकर ऊर्फ कुसुमाग्रज यांच्या 'नटसम्राट' या नाटकाला १९७३ ची मराठी भाषेतील सर्वोत्कृष्ट ललितकृती म्हणून पुरस्कार दिला याबद्दल कविवर्य कुसुमाग्रजांचे आम्ही हार्दिक अभिनंदन करतो. काव्य, नाट्य, कादंबरी इ. अनेक क्षेत्रांत शिरवाडकर लेखन करीत आहेत. या पुरस्काराच्या निमित्ताने त्यांच्या साहित्यसेवेचा गौरव झाला याचा आम्हास विशेष आनंद होतो.

भालचन्द्र दिनकर फडके

# परिषदवार्ता

## ( जून ते डिसेंबर १९७४ )

### शिवराज्याभिषेक त्रिशतसांवत्सरिक उत्सव

शिवराज्याभिषेक त्रिशतसांवत्सरिक उत्सव परिषदेने खालील दोन महत्त्वाच्या व्याख्यानांच्या रूपाने साजरा केला.

दि. २२ जून रोजी प्रा. स. शि. भावे यांचे 'मराठी कादंबरीतील शिवाजी' या विषयावर व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी प्रा. रा. श्री. जोग हे होते.

दि. ६ जुलै रोजी डॉ. अरविंद कुलकर्णी यांचे 'मराठी नाटकातला शिवाजी' या विषयावर व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी पुणे विद्यापीठातील इतिहास विभागाचे प्रमुख डॉ. अ. रा. कुलकर्णी हे होते.

### महापौर भाई वैद्य यांची भेट

पुणे महानगरपालिकेचे महापौर श्री. भाई वैद्य, माजी महापौर व विद्यमान नगरसेवक श्री. निळूभाऊ लिमये, व परिषदेचा विभाग ज्या मतदार संघात आहे त्या क्षेत्रातील नगरसेवक श्री. महाजन यांनी दि. २० जुलै रोजी परिषदेस भेट दिली. या प्रसंगी महापौरांचा उचित सत्कार करण्यात आला. परिषदेचे सांस्कृतिक कार्य पुण्याच्या प्रतिष्ठेला साजेसे असून तिच्या कार्याला परिषदेची जागा अपुरी व गैरसोयीची आहे, हे लक्षात घेऊन नगरपालिकेने परिषदेच्या हीरक महोत्सवप्रसंगी देऊ केलेल्या जागेसंबंधी आपण सर्व ते साहाय्य करण्याचे आश्वासन या प्रसंगी महापौरांनी दिले. श्री. वासू देशपांडे यांनी आभार मानले.

### वामनराव चोरघडे यांचा सत्कार

विदर्भातील प्रसिद्ध कथाकार वामनराव चोरघडे यांच्या षष्ठ्यब्दिपूर्तीनिमित्त मंगळवार दि. २३ जुलै रोजी श्री. ग. दि. माडगूळकर यांच्या अध्यक्षतेखाली सत्कार करण्यात आला. या प्रसंगी पु. भा. भावे, डॉ. भीमराव कुलकर्णी, कु. प्रभू डॉ. फडके यांची भाषणे झाली.

अनुक्रमणिका






श्री. वामनरावांनी पश्चिम महाराष्ट्राने वेळोवेळी केलेल्या आपल्या कौतुकाबद्दल कृतज्ञता व्यक्त केली.

## कविवर्य बेंद्रे यांचा सत्कार

यंदाचे भारतीय ज्ञानपीठ पारितोषिक-विजेते प्रसिद्ध कन्नड कवी श्री. द. रा. बेंद्रे यांचा दि. १२ ऑगस्ट रोजी प्रा. रा. श्री. जोग यांच्या अध्यक्षतेखाली सत्कार करण्यात आला. या प्रसंगी सर्वश्री वासू देशपांडे, दा. गो. देशपांडे, यदुनाथ थत्ते यांची भाषणे झाली.

## एकपात्री नाट्यप्रयोग

विदर्भातील साहित्यिक श्री. वसंत वरखेडकर यांनी त्यांनी लिहिलेल्या 'अनंदीबाई' व 'नीरो' या दोन भावनाट्यांचे एकपात्री प्रयोग दि. २० व २१ सप्टेंबर रोजी परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात सादर केले.

## कै. विनायक कोंडदेव ओक स्मृतिदिन

१० आक्टोबर रोजी कै. वि. कों. ओक यांच्या स्मृतिदिनानिमित्त श्री. राजा मंगळवेढेकर यांचे 'बालकथेची कथा' या विषयावर प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या अध्यक्षतेखाली उद्बोधक व्याख्यान झाले.

## श्री. पु. ल. देशपांडे यांचा भव्य सत्कार

इचलकरंजी येथे भरणाऱ्या आगामी सुवर्णमहोत्सवी अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष श्री. पु. ल. देशपांडे यांचा दि. २३ नोव्हेंबर रोजी शिक्षण-शास्त्र संस्थेच्या सभागृहात परिषदेच्या वतीने श्री. वि. स. खांडेकर यांच्या अध्यक्षतेखाली भव्य सत्कार करण्यात आला. या सत्कारास परिषदेचे सभागृह अपुरे पडणार हे लक्षात घेऊन शिक्षणशास्त्र संस्थेचे सभागृह त्यासाठी घेण्यात आले होते. हेही सभागृह त्या दिवशी अपुरेच पडले, इतकी साहित्यप्रेमी रसिकांनी गर्दी केली होती. या प्रसंगी प्रारंभी परिषदेचे उपाध्यक्ष डॉ. वि. रा. करंदीकर यांनी उपस्थितांचे स्वागत केले व नंतर डॉ. भालचंद्र फडके, सौ. उषा दा. कुलकर्णी व डॉ. भीमराव कुलकर्णी यांची भाषणे झाली. मध्यमवर्गीयांच्या जिव्हाळ्याने व उमाळ्याने आपण लेखन करतो आहोत व या वर्गा-बद्दल आपणास नितांत प्रेम असल्याचे पु. ल. देशपांडे यांनी सांगितले व त्यांनी केलेल्या सन्मानाबद्दल कृतज्ञतेचे उद्गार काढले. श्री. वि. स. खांडेकरांनी पु. लं. चे या प्रसंगीचे भाषण पुन्हा जरी संमेलनप्रसंगी इचलकरंजीस झाले तर ते ऐकण्यासाठी आपण संमेलनास आनंदाने येऊ, अशा गौरवपर शब्दात पु. ल. देशपांडे यांचा सन्मान केला. परिषदेचे कोषाध्यक्ष श्री. मधुकाका कुलकर्णी यांनी आभार मानले. सौ. ज्योत्स्ना भोळे यांनी महा-राष्ट्रगीत म्हटले.

## माधव जूलियन स्मृतिदिन

कवी माधव जलियन यांच्या स्मृतिदिनानिमित्त प्रा. माधव मनोहर यांचे 'माधव जलियन : वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व' या विषयावर दि. २९ नोव्हेंबर रोजी व्याख्यान झाले.

## वार्षिक सर्वसाधारण सभा

यंदाची वार्षिक सर्वसाधारण सभा दि. २८ जुलै १९७४ रोजी सायं. ५ वा. माधवराव पटवर्धन सभागृहात परिषदेचे उपाध्यक्ष डॉ. वि. रा. करंदीकर यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. सभेस ६३ सभासद हजर होते. या सभेत मागील सभेचा वृत्तान्त वाचून संमत करण्यात आला. तसेच १९७३-७४ च्या वार्षिक कार्यवृत्तास मान्यता देण्यात आली. या कार्यवृत्तावर सविस्तर चर्चा झाली. अनेक प्रश्न विचारण्यात आले व सूचना करण्यात आल्या. कार्यवाह व कार्याध्यक्षांनी त्यांना उत्तरे दिली. बराच उशीर झाल्याने व अनेक विषय चर्चा करावयाचे राहिल्याने ही सभा दि. २५-८-७४ पर्यंत दुपारी ४ वाजेपर्यंत तहकूब करावी असे ठरले.

दि. २८-७-१९७४ रोजी स्थगित झालेली सभा दि. २५ ऑगस्ट रोजी दुपारी ४ वा. परिषदेचे अध्यक्ष प्रा. रा. श्री. जोग यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. या सभेस ३२ सदस्य हजर होते. या सभेत १९७३-७४ चे उत्पन्न व खर्च आणि ताळेबंद पत्रक मंजूर करण्यात आले. तसेच १९७४-७५ चा अर्थसंकल्प सम्मत करण्यात आला. घटनेत कोणत्या दुरुस्त्या करण्यात याव्यात याचा विचार करण्यासाठी श्री. वि. त्र्यं. शेटे, श्री. व. ह. गोळे व कार्यकारी मंडळाचे सभासद अशी समिति या सर्वसाधारण सभेत नेमण्यात आली.

साहित्य परिषदेचे विश्वस्त तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांची ते आजारी असल्याने हिशेब-पत्रकावर सही घ्यावयाची राहिली होती. ती आता घेण्यात आली आहे. तहहयात सभासद नोंदणीची सात हजार रुपयांची रक्कमही विश्वस्तांच्या खाती जमा करण्यात आली आहे.

**कार्यवाह**

### साभार पोच

**प्रकाशक : श्री. सं. गो. चिंधडे :** टिळक रोड. मालेगाव. जि. नाशिक (१) हुतात्मा चाफेकर व अन्य कविता : स. गो. चिंधडे पृ. १०६ किं. ५ रु.

**पंचमंडळ शिवाजी भारत प्रकाशन:** वि. त्र्यं. शेटे अध्यक्ष, पंचमंडळ छत्रपती शिवाजी भारत प्रकाशन द्वारा. भारत इतिहास संशोधन मंडळ, १३२१ सदाशिव, पुणे ३०. (१) छत्रपती शिवाजी भारत या महाकाव्यातील अध्याय ४१-४४ राज्यारोहण व जिजाबाई जीवनाखेर श्री. विष्णु सखाराम घाटे विरचित पृ. १०० किं. ५ रु.

# मायावादी भाष्यकार आचार्य पुरुषोत्तम

## तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी

पश्चिमी साहित्यशास्त्रात ललितकला किंवा ललितसाहित्य यांसंबंधी जे अनेक सिद्धान्त सांगितलेले आहेत त्यांतील मला पटलेला एक सिद्धान्त, 'काव्य किंवा ललितसाहित्य हे जीवनाचे भाष्य असते' हा होय. काव्य किंवा ललितसाहित्य हे वाच्यार्थाने भाष्य नसते, त्याचा भाष्य हा ध्वनितार्थ असतो.

पु. ल. देशपांडे यांनी आपल्या एका ललित लेखसंग्रहाला एक प्रास्ताविक पत्र जोडले आहे. ते असे –

"फ आणि ह

जन्म आणि मृत्यू ह्या दोन टोकांच्या मधे पकडून नियतीने चालविलेली आपणा साऱ्यांची फसवणूक एकदा लक्षात आली की त्यातून सुटायला आपली आणि आपुलकीने भोवताली जमणाऱ्या माणसांची 'हसवणूक' करण्यापलीकडे आणखी काय करायचं?"

शांकर वेदान्तातील माया शब्दाची व्याख्या साध्या सोप्या शब्दात या पत्रात सांगितली आहे. पकडणारी आणि फसविणारी नियती म्हणजेच माया होय. या मायेचे कलात्मक आविष्करण पु. लं. च्या प्रथितयश साहित्य कृतीत आढळते. फसवणुकीने बहुशः आसू‌ येतात. परंतु हसू प्रसवणे ही कलाकाराची मोठीच किमया म्हटली पाहिजे.

शंकराचार्यांच्या शारीरक भाष्याच्या प्रस्तावनेत, जीवन हे सत्यानृताचे मिथुन होय, असा सिद्धान्त मांडला आहे. अनृत म्हणजे संस्कृतमध्ये माया आणि मराठीत फसवणूक; – हे खोटे मायाजाल आहे, ही फसवणूक आहे, हे फसणाऱ्या पात्रांच्या लक्षात जेव्हा येते तेव्हा फसणारी पात्रे बहुशः हसत नसतात तर प्रेक्षक हसत असतात. 'तुझे आहे तुजपाशी' (परी तू जागा चुकलासी) हे गंभीर सत्य 'आचार्यां'च्या लक्षात ज्या क्षणी येते तेव्हा त्याचे मन विव्हल होते. तेव्हा प्रेक्षकांचेही मन विव्हल व्हावयास पाहिजे; काही थोड्यांचे विव्हल होतेसुद्धा. परंतु सामान्य प्रेक्षकांच्या मनाची

अनुक्रमणिका

दीर्घकालिक विनोदी संदर्भाने फसवणूक होते व ते हसतच राहतात.

या भाष्यकाराने आपल्या स्वतःच्या साहित्याबद्दल वर निर्दिष्ट केलेल्या पत्रात्मक प्रास्ताविकामध्ये 'सौंदर्यवाचक विधान' केले आहे. ते सबंध पत्रच सौंदर्यवाचक विधान आहे; व पु. लं. च्या साहित्याचे 'व्यवच्छेदक लक्षण' आहे. भारतीय काव्य-शास्त्राच्या परिभाषेत म्हणावयाचे तर या सौंदर्यवाचक विधानातून पु. लं. च्या साहित्याचा स्थायीभाव सूचित होतो. नैतिक सत्यांची ओढ हा पु. लं. तथा साहित्याचा स्थायीभाव आहे, ही गोष्ट ध्वनित होते. हा ध्वनितार्थ विश्लेषणात्मक पद्धतीने निघतो. कांटने वाक्यांचे किंवा विधानांचे दोन प्रकार सांगितले आहेत : (१) विश्लेषणात्मक व (२) संश्लेषणात्मक. उद्देशपदाच्या पृथक्करणातून विधेयपद निघते त्या विधानास विश्लेषणात्मक म्हणतात. उदा. गाय हा सस्तन प्राणी आहे. या विधानातील सस्तन प्राणी हा अर्थ गाय या पदाच्या व्याख्येत असतो व विश्लेषणात स्पष्ट होतो. 'वासुदेव व्याकरणशास्त्री आहे' हे विधान संश्लेषणात्मक आहे; कारण 'वासुदेव' या उद्देशपदाच्या व्याख्येत व्याकरणशास्त्री हे पद अंतर्भूत नसते. वरील पत्रातील 'फसवणूक' या पदाच्या व्याख्येतच 'सत्याच्या विपरीत' असा अर्थ नियमाने अंतर्भूत आहे. काहीतरी वास्तव किंवा सत्य आहे. हे गृहीत धरण्याशिवाय फसवणुकीची कल्पना करताच येत नाही. रज्जूवर सर्पाचा भास होतो म्हणजे फसवणूक होते ही गोष्ट रज्जू ही वस्तुस्थिती गृहीत धरल्याशिवाय मानताच येत नाही. शिंपल्यावर रुप्याचा भास होतो म्हणजे फसवणूक होते असे आपण जेव्हा म्हणतो तेव्हा शिंपले ही वस्तुस्थिती सापडावी लागते.

पु. लं. च्या साहित्यातील सत्य हे शांकरभाष्यातील परमार्थ सत्य किंवा ज्ञान-विज्ञानातील सत्य आहे की नाही याबद्दल वाद होऊ शकेल, परंतु जीवनातील नैतिक सत्याबद्दल वाद होणार नाही. उदा. पु. लं. चे 'गणगोत' हे गाजलेले पुस्तक घ्या किंवा 'व्यक्ती आणि वल्ली' हे पुस्तक घ्या. 'गणगोत'मध्ये वास्तव्य व्यक्तिचित्रे आहेत व 'व्यक्ती आणि वल्ली' यात काल्पनिक व्यक्तिचित्रे आहेत. त्या दोन्हीमध्ये माणुसकीचा जिव्हाळा ओतप्रोत भरला आहे. त्या त्या वास्तव किंवा काल्पनिक व्यक्तींच्या जीवनातील मूल्यांचा किंवा नैतिक रहस्यांचा आविष्कार आहे. त्यात साधीभोळी सांसारिक माणसे आहेत; काही व्यवहारी यशस्वी माणसे आहेत. ज्यांचे व्यक्तिमत्त्व विकसित आहे अशाही व्यक्ती आहेत; काहींच्या ठिकाणी तर भगवद्गीतेतील विभूति-मत्त्वही प्रकट झाले आहे. 'मला दिसलेले विनोबा' आणि 'दया छाया घे'... या दोन व्यक्तिचित्रांतून या साहित्यकाराच्या अंतिम निष्ठेचे दर्शन होते. विनोबांच्या पदयात्रेचे चित्रण अशी ग्वाही देते की 'तुझे आहे तुजपाशी' यामधील मुख्य आशय गांधीवादाचे विडंबन हा नव्हे. गांधींची तीन आंदोलने आणि विनोबांचे भूदान आंदोलन या सर्व गोष्टींनी या कलाकाराच्या हृदयाचा कायम ठाव घेतलेला आहे. वैयक्तिक व

सामाजिक नैतिक आदर्शांची विलक्षण ओढ या कलाकाराला लागली आहे याची साक्ष निरनिराळ्या संदर्भात तर मिळतेच, परंतु विनोबांच्या पदयात्रेवरील या लेखात संपूर्णपणे मिळते. परंतु या निष्ठेचा अर्थ बालगंधर्वांवरील 'दया छाया घे' या व्यक्तिचित्रणात पूर्ण स्पष्ट होतो. कलात्मक सौंदर्य ही त्यांची अंतिम निष्ठा आहे आणि या कला-मूल्याचा आशय नैतिक सत्य होय हे ठरते.

वास्तवव्यक्तिविषयक अनेक लेखांत वर्ण्यव्यक्तींच्या दोषांकडे काना (णा) डोळा पु. लं. नी केलेला दिसतो, असा त्यांच्यावर काहींचा आक्षेप आहे. परंतु त्या आक्षेपांचे निरसन कल्पित व्यक्तींच्या, त्यांनी केलेल्या दोषदर्शनाने होते. वास्तव व्यक्तिविषयक लेखनात त्यांचा भर गुणग्राहकतेवर असतो. कल्पित व्यक्तींची मने दुखविली तरी चालतात, परंतु वास्तव व्यक्तीची व ज्यांच्यासंबंधी जनांची अंतःकरणे राखणे किंवा न दुखवतील अशी खबरदारी घेणे हेच योग्य अशी त्यांची धारणा असावीसे दिसते. 'तुझे आहे तुजपाशी' या नाटकातला आचार्य कल्पित की वास्तवातला ? रंगभूमीवरील आचार्य भूमिका घेतलेल्या पात्रानं एका तत्कालीन विद्यमान आचार्यांचा अभिनय वा हावभाव उचलल्यामुळे त्या आचार्यांचे मित्र व संबंधी रागावले, परंतु हा पु. लं. चा दोष नव्हे. हे ते नाटक वाचणाऱ्या वाचकास सांगण्याची आवश्यकता नाही.

नव्या भारताचे व आधुनिक मानवसमाजाचे नैतिक आदर्श हे पु. लं. चे कलेच्या मूल्यात रूपांतर पावलेले निकष होते. आधुनिक मराठी साहित्यात विनोदी साहित्य-कारांच्या तीन पिढ्या झाल्या, ही चौथी. विनोदी साहित्याला प्रतिष्ठा प्रथम श्रीपाद कृष्णांनी दिली. तत्पूर्वीचा विनोद एक तर विदूषकी तरी असायचा किंवा तमाशाचा तरी असायचा. श्रीपाद कृष्णांनी त्याच्यात सामाजिक टीकेचा आशय ओतून शिष्ट म्हणजे सुशिक्षित वर्गाची मान्यता मिळवून दिली. दुसरी पिढी गडकरी व तिसरी पिढी अत्रे यांची. त्यांनी सुशिक्षितांना विनोदाचे वेड लावले. परंतु या दुसऱ्या व तिसऱ्या पिढीच्या विनोदाला सामाजिक टीकेचा विसर पडला. कारण गडकरी किंवा अत्रे यांच्या श्रद्धा परंपरागत रूढीशी एकरूप झालेल्या होत्या. गुरू श्रीपाद कृष्ण हे सुधारकांचे पाठीराखे तर शिष्य व प्रशिष्य सनातनी कर्मठांच्या पाठीशी उभे. पु. लं. नी विनोदाला श्रीपाद कृष्णांचा मागोवा घेत त्यांच्याही फार पुढे नेऊन अधिक उच्च पदवीवर नेऊन बसविले. त्यांनी नव्या बदलत्या स्वतंत्र भारताच्या व आधुनिक मानवी समाजाच्या आदर्शाकडे आकर्षित केले आहे.

एकच व्यक्ती बहुरूपी बनते या बाबतीत पु. लं. चे यश हे अप्रतिम आहे. एकच बहुरूपी बनतो. 'एकं सत्' हा मायावादाचा सिद्धान्त आहे. त्यांनी यशस्वी नट व नाटककार म्हणून जेवढी माया जमविली तेवढी परत केली. त्यांनी समाजाकडून जेवढे मिळविले तेवढे त्यांनी समाजाला परत केले आहे. त्यांच्या सौंदर्यनिष्ठेचा आशय नैतिक आहे हे यावरूनही सूचित होते. काही मंडळी खाजगी रीतींने त्यांना

घट्ट मुठीचा म्हणतात, परंतु ती झाकलेली मूठ खरोखरच सव्वा लाखाची असते व ती वेळोवेळी मोकळी करतात समाजाकरिता, त्यातल्या त्यात विशेष म्हणजे समाजातील रंजल्यागांजल्याकरता, आंधळ्या-पांगळ्याकरिता. त्यांचा पात्रापात्रविवेक चोख असतो.

## साभार पोच

**मॅजेस्टिक प्रकाशन** ३१६, प्रसाद चेंबर्स, मुंबई ४ (१) भक्तिरस नवनीत : प. श्रीपादशास्त्री किंजवडेकर, पृ. ३२८, किं. ५ रु.

**दीपज्योति प्रकाशन**, २३०, सदाशिव पेठ, पुणे ३०, (१) दीपज्योति : सौ. कुसूम अभ्यंकर, पृ. २८० किं. १५ रु. (२) अरुणाचलाच्या सीमेवरून, कॅ. वासुदेव वेलवलकर, पृ. ३१६, किं. २० रु.

**वैष्णव प्रकाशन**. मोतीनगर, अमरावती, (१) अभिलाषा (काव्यसंग्रह) श्री. प्रभाकर जावरकर, पृ. ६४ किं. २·५० रु. (२) शरनीरा : श्री. ना. दि. मायी पृ. ९१ किं. ३ रु.

**प्रकाशक श्री. भाई बागल**, कोल्हापूर (१) शिव शाहू : फुले आंबेडकर तसेच विठ्ठलरामजी व भाऊराव हेच आमचे मार्गदर्शक, भाई माधवराव बागल, पृ. ५३ किं. १ रु. (२) श्री. खंडेराव गोपाळराव बागल यांचे निवडक लेख भाई माधवराव बागल, पृ. २९६ किं. १५ रु.

**सोमैया पब्लिकेशन**, १७२, नायगाव क्रॉस रोड, दादर, मुंबई १४ (१) माझी जीवनगाथा : श्री. प्रबोधनकार ठाकरे, पृ. ४६७ किं. १५रु.

**ह. वि. मोटे प्रकाशन**, ३ वेस्ट व्ह्यू, दादर, मुंबई १४, (१) विश्रब्ध शारदा : श्री. ह. वि. मोटे पृ. ५९६ किं. ३० रु.

**प्रकाशिका सौ. कालिंदी उजळंबकर**, ४६, वैदिकाश्रम, आपटे रोड, पुणे ४ (१) आंदण-रेषा : श्री. विलास कुलकर्णी पृ. ७२ किं. ६ रु.

# मुष्किल बंदिश पण यमनातली

वसंतराव देशपांडे

मला काही लिहायचंच झालं तर फक्त आठवत असलेल्या बंदिशी, तबल्याच्या खास गती, कधी स्वतः बांधलेल्या बंदिशी, अधूनमधून सुचलेल्या चाली येवढंच त्यातल्या त्यात मी लिहितो. आलेल्या पत्रांची उत्तरं द्यावीच लागतात म्हणून लिहायला बसतो. पण लेखन करणं हा शब्दप्रयोग ज्याअर्थी वापरला जातो त्याअर्थी मात्र मी काहीच लिहीत नाही, तसं पाह्यलं तर ते जमतदेखील नाही. काहीतरी लिहून एकदाचं छापून घ्यावं, घरच्या सकट किंवा आल्यागेलेल्यांना काय आजचा पेपर वाचलात का? पुढच्या स्वराज्यावर लक्ष असू द्या असं खोटं खोटं हासून विचारणं मला अजिबात जमत नाही. मित्रांच्या संगतीत मनमुराद गप्पा मारत बसायचा मला छंद आहे. त्यात रमणारा माणूस मी.

काय कसं काय? बरं आहे ना? काय ठीक? अरे किती दिवसांनी भेटलात? या-सारख्यापासून फार दिवसांत मधूकडे जायला झालं नाही. अरेच्या आप्पा जाम चिडला असेल. बंडोपंताला घरी जेवायला बोलावलंच पाहिजे. आज नानाकडे जाऊन भरपेट गाबून घ्यावं अशी मनात चुळबूळ सुरू होईल. या स्तरातले बरेच मित्र आहेत मला. सगळ्यांच्या बद्दल आपुलकी तीच आहे, पण त्यातून देखील मनाच्या आतल्या कप्प्यात कायमची दडी मारून बसलेले मोजके मित्र आहेत.

भाई! ( सर्वांच्या परिचयाचे पु. ल. देशपांडे ) हा माझा एकदम आतल्या कप्प्या-तल्या मित्रांतला यार दोस्त आहे. भाईला मित्र म्हणणे, दोस्त म्हणणे हे मनाला खरंच पटत नाही. तो त्याहून वेगळा आहे. हा भाई आपलाच आहे येवढं बस आहे. त्यापुढे त्याचं माझं नातं काय आहे हे सांगायची गरज उरत नाही. तो आपलाच आहे. सतत गाण्याच्या मैफलीचा आनंद घेणारा रसिक श्रोता क्वचित प्रसंगी स्वतः गाऊन पाहण्याचं धाडस करतो. आपण गाणारे आहोत असं त्याला मुळीच भासवायचं नसतं, पण तरीही त्याला एखाद्या वेळी राहवत नाही. भाईच्या बाबतीत माझं नेमकं तसंच झालं आहे.

अनुक्रमणिका

लिहिता येत नाही तरीदेखील भाईबद्दल आपण काहीतरी लिहून पाहावं, नव्हे ते मी आवरू शकलो नाही म्हणून हे धाडस करतो आहे.

भाई फारच मोठा माणूस आहे. माझ्या मनानं मानलेल्या माणसाच्या मोठेपणाच्या मर्यादा भाईला लागू पडत नाहीत. तो त्याहून कितीतरी मोठा आहे. तो आपला आहे आणि त्यालादेखील मी त्याचा असाच कुणीतरी आहे असं वाटतं. बस. या आनंदाचा मी गेली पस्तीस वर्षे उपभोग घेतो आहे.

गाण्याच्या बैठकीत आम्ही जवळ आलो. गाण्या-वाजवण्याच्या परिभाषेत बोलायचं म्हणजे आम्ही एकमेकांचे साथीदार झालो. संगत जुळणं ही महा मुष्किल गोष्ट असते. पण इथे आमची साथ संगत पुरती जुळली. भाईच्या गाण्याला माझी तबल्याची साथ अन् माझ्या गाण्याला भाईच्या पेटीची साथ. एकजीव झालेल्या त्या मैफली होत्या. आम्ही दोघांनी गाण्याबजावण्यातला आनंद मनमुराद लुटला. निर्मळ मनानं लुटला. कलावंतापेक्षा कलेवर प्रेम करण्याच्या बाबतीत आमचे दोघांचे तंबोरे झकास जुळले. त्या वेळी पुण्यात गाण्याचे काही खास अड्डे असत. आम्ही आपण होऊन गणूकाका कातरे यांच्या माडीत जमत असू. सतरंजी घालण्यापासून बैठक जमावण्यापर्यंत जमलेल्या इनमीन दहा ते बारा मंडळींत ही कामं आमचे आम्हीच करत असू. कोण गाणार आहे, कोण साथीला बसणार आहे असला औपचारिकपणा त्या बैठकीत अजिबात नसे. भाई चटकन पेटी उचलून, ' चल वस्या सुरू कर ' अशी प्रस्तावना करायचा. तसल्या एक दोन नाही शेकडो बैठकी व्हायच्या. माझ्या दृष्टीने त्या खऱ्या बैठकी होत्या. महफिली होत्या. आजच्यासारख्या कुणाचा कुणाशी संबंध नाही. सगळा मामला कंत्राटी पद्धतीचा यासारख्या पार्टी टाकायच्या मैफली नव्हत्या त्या. तो आनंद आम्ही दोघेही अजून आठवतो. त्याच दुनियेत दोघेही अजून हरवलेले आहोत. ते जुने दिवस स्मरणातून हलतच नाहीत.

भाईचं नाव त्या वेळी समजून गाणारा भावगीत गायक, बऱ्यापैकी पेटीवाला, नाटकांतून काम करणारा एक सुशिक्षित नट अन् उदयोन्मुख विनोदी लेखक इतक्या क्षेत्रात व्हायला सुरुवात झाली होती. पण एकूण बड्या प्रस्थांच्या लेखी तो अन् मी " एकूण लेकाचे आहेत चांगले पण जरा आगाऊच " एवढीच आमची किंमत होती. मी तर काय एक अगदीच सामान्य मिलिटरी अकौन्टस खात्यातला कारकून. लोकांच्या नजरेत एक भंगड तिरसट अन् गाण्यावाजवण्यातली एक वल्ली एवढाच होतो. तेही दिवस पुढे सरकत गेले.

भाईंच्या घरी एक दिवस जरी जायला झालं नाही तरी चुकल्यासारखं वाटायचं. अनेक विषयांच्या चर्चा अवांतर गप्पा रंगायच्या. पोट दुखेपर्यंत हसायचं. गाणी व्हायची. असा जमाना होता तो. त्या सुमारास भाई चिंतामणराव कोल्हटकरांच्या कंपनीत कामं करीत असत. त्यानंतर रांगणेकरांच्या नाट्य निकेतन कंपनीत त्यांची बरीच नाट्यसेवा झाली. 'दहा वाजता ' या प्रभात फिल्म कंपनीच्या एका चित्रपटात ' पाहिजे पोटाला भाकरी ' हे त्यांच्या

तोंडी असलेलं गाणं रेकॉर्ड झालं होतं. रांगेकरांनी काढलेल्या 'गोकुळ' नावाच्या चित्रपटात भाईंनी एक भूमिका गाण्यासकट केली. नंतर पु. रा. भिडे नावाच्या निर्मात्यानं काढलेल्या 'वंदेमातरम्' या चित्रपटात भाई अन् सौ.सुनीता भाभीजी दोघांनी भूमिका केल्या.

भाईंचं नाटकं, मराठी चित्रपटात लेखक, संगीत दिग्दर्शक होण्याची पूर्वतयारी-गाण्याच्या मैफली अन् विनोदी कथालेखन हे सगळं मस्तीत चाललं होतं. या सगळ्यांची झिंग आली होती आम्हा सर्व मित्रांना. तेव्हापासूनच भाई आम्हा सगळ्या मित्रांच्या मनाच्या कप्प्यात खोल रुतून बसले आहेत. अजूनही तिथेच आहेत.

अभिरुची मासिकातून भाईंचं लिखाण चालू होतं. 'नाटक कसे बसवतात' हा लेख छापून आला होता. बापरे ! इतका कमालीचा चांगला लेख होता तो की अजून देखील तो लेख पुन्हा पुन्हा वाचावासा वाटतो. वरवर पाहिलं तर त्या लेखात उपहास आहे. तपशिलात एकूण एक बारकावा आहे. कुणालाही नजरेला न दिसणाऱ्या, मेंदूला न सुचणाऱ्या, अं ! त्यात काय आहे इतक्या वरवर क्षुल्लक वाटणाऱ्या नेहमीच्याच गोष्टी आहेत; पण त्या मांडणीतून केवढा विनोद निर्माण झाला आहे. वाहवा बहोत खूप ! पण तरीदेखील तो लेख वाचताना शेवटी पापण्या ओलावतात. ठुमरी पेश करायची झाली तर सुरांनी तालाच्या लयीच्या सगळ्या क्रियांनी क्वचित हावभावांनी नटवता येते, रंगवता येते. परिणामी रसिक श्रोता डोलायला लागतो. पण ठुमरीचा मूळ भाव. तिची तक्रार खऱ्या अर्थानं श्रोत्याच्या काळजाला हात घालते. त्यालाच सही ठुमरी पेश झाली असं म्हणता येतं. तसाच हा भाईंच्या लिखाणाचा परिणाम आहे.

नेहमी अनुभवाला येणारा समाजातला भंपकपणा हा भाईंच्या विनोदाचा त्या काळी आरंभक सूर होता. त्या वेळचे भाईंचे सगळेच लेख एकदम खुल्लम खुल्ला लिहिलेले आहेत. त्यात जवानी आहे. जवानीतला बेदरकारपणा आहे, बेफिकिरी आहे. काही प्रसंगी भरकटणं हे देखील जवानीला धरून आहे. अंगुस्तान विद्यापीठ, सुरंगा सासवडकर, लोकमाता पण सापत्न आणि इतर बरंच हे सगळंच त्या वेळचं रसरशीत लिखाण आहे असं अजून वाटतं.

त्याच सुमारास भाईंनी 'दूधभात' या चित्रपटाचे संवाद अन् संगीत दोन्ही ताकतीनी पेश केले. 'देवबाप्पा' या चित्रपटातली भाईंची गाणी अजून रेडिओवर वाजतात. 'विठ्ठलपायी' या चित्रपटात देखील भाईंचं म्युझिक आहे.

स्वतः भाईंनी आणखी दोन चित्रपटांत कामं केली. एक 'अंमलदार' अन् दुसरं 'गुळाचा गणपती'. गुळाचा गणपती म्हणजे सब कुछ पी. एल. असा चित्रपट होता तो. अजूनदेखील तो चित्रपट सध्याच्या मालकाचा योगक्षेम चालवतो. एकूण भाईंनी पटकथालेखक, संवादलेखक, संगीतदिग्दर्शक, पद्यलेखक, दिग्दर्शक हे सगळे प्रकार समर्थपणे हाताळले आहेत.

'तुका म्हणे आता' हे भाईंचं पाहिलं नाटक. फार छान नाटक आहे. पण त्या वेळी

का कोण जाणे, ते नाटक धंदा करू शकलं नाही. सगळेच कुप्रयोग पुढच्या रांगेत बसले होते याच्या सगळ्या प्रयोगांना. पण नाटकाचा प्रयोग व्हायचा नजर लागल्यासारखा. या नाटकात मी संतू तेल्याची भूमिका करीत असे. नाटकाचे दिग्दर्शन भाईंचंच होतं. माझ्या गाठी नाट्यक्षेत्रातलं जे काही बऱ्यापैकी साचलं आहे त्यातलं बरंच महत्त्वाचं भाईंच्या सहवासामुळे, मार्गदर्शनामुळे साचलं आहे.

आवडलं, पटलं तर स्वतः वाटेल तो त्याग करून कुठलीही गोष्ट कायावाचामनेकरून स्वीकारायची हा भाईंचा खाक्या. शिक्षणक्षेत्रातल्या आवडीपायी त्यांनी बेळगावच्या आर. पी. डी. कॉलेजात प्रोफेसरकी केली. त्याहूनही मालेगावसारख्या विणकरांच्या पाकिस्तानात एका कल्पनेतच विरलेल्या महाविद्यालयासाठी पुणे सोडून ही दोघं पति-पत्नी अक्षरशः माळरानातल्या झोपडीत राहायला गेली. त्याच तऱ्हेनं ऑल इंडिया रेडिओत प्रोड्यूसरकी केली. टेलिव्हिजनचा अभ्यासक्रम इंग्लंडमध्ये पुरा केला. टी. व्ही. वर रुजूही झाले.

परमेश्वर करतो ते बऱ्यासाठी असा आपला माझा समज आहे. भाईंनी जेवढ्या आपुलकीनी हे सगळे उद्योग स्वीकारले तेवढ्याच खट्टू मनःस्थितीत पण शांतपणे सोडून देखील दिले. स्वतंत्र राहायचं, मनसोक्त वाचायचं, पटेल तेच लिहायचं, नवीन शोधायचं. त्यासाठी भ्रमंती करायची, देशात परदेशात संचार करायचा असा त्यांचा नवा जीवनक्रम सुरू झाला. इंदूरी, ग्वाल्हेरी, लखनवी, नवाबी वातावरणाचा परिचय करून घेण्यासाठी भाई रामुभैय्या दात्यांच्या संगतीत उत्तरेची सफर करून आले. भूदानाचं कार्य समजून घ्यायला विनोबाजींच्या सहवासात फिरले. अशा कितीतरी सफरी झाल्या. बाबा आमट्यांच्या कार्याचं दर्शन घ्यायला चांद्याच्या जंगलात देखील फिरले. अजूनही असल्या सफरींत ते रमलेलेच आहेत.

भाईंच्या नाटकांपैकी पहिल्याच पडलेल्या नाटकाचा त्यांनी धसका घेतला होता. पण तरीदेखील पुढे लिहिलेली त्यांची अम्मलदार, भाग्यवान, तुझे आहे तुजपाशी, सुंदर मी होणार ही सगळीच नाटकं एकदम जमली. त्या नाटकांनी सगळ्या संबंधितांना पैसा दिला. प्रसिद्धी दिली. भाई फार मोठे नाटककार झाले.

रसिकांची भूक भाईंनी वाढवून ठेवली. बटाट्याची चाळ हा एकपात्री प्रयोग तुफान रंगला असूनही प्रयोगाची रंगत कायम आहे. त्यानंतरची वाऱ्यावरची वरात. या वरातीनं तर कहर केला. प्रयोग फक्त जाहीर झाला की एक तासाच्या आत बुकिंगवर बसलेला माणूस गल्ला पेटीत टाकून खिडकी बंद करायचा. केवढं जबरदस्त यश भाईंचं. वाऱ्यावरच्या वराती-नंतर आलं ते 'असा मी असा मी'. इथे प्रेक्षकांचा काटा जरा डावीकडे झुकायला लागला. अन् त्याच सुमारास का कोण जाणे भाईंचं नाटकं लिहिणं थांबलं. अनेकांनी अनेक कल्पना लढवल्या. बातम्या पसरायला वेळ लागत नाही. ना शेंडा ना बुडखा पण कुजबुज सुरू झाली की, पुलंची प्रतिभा आटली. दुभती म्हैस आटली हे जितक्या निर्विकार

अनुक्रमणिका

मनानं म्हशीचा राखणदार सांगतो तसं गण्यागणप्यापासून शहाणेसुरते म्हणवणारे सुद्धा बोलायला लागले. मी मनातल्या मनात खूप वैतागलो. भाईंच्याकडे नेहमीच जाणारा मी. एक दिवस अगदीच रहावलं नाही. अन् भडकून त्यांना म्हणालो, "भाई, मला एक लोकनाट्यासारखं किंवा लहान मुलांसाठी बसवायचं नाटक लिहून दे." भाई नुसते हसले. माझीच पंचायत झाली. त्या ताणात घरी आलो. माझा मीच विचार करायला लागलो. भाई लेखक आहेत, नाटककार आहेत, नट आहेत, दिग्दर्शक आहेत, समीक्षक आहेत. समजा, नाटक लिहायला बसले तर त्याच मजकुरावर ते दिग्दर्शक म्हणून विचार करतील. नट, समीक्षक या नात्यानं विचार करतील. पण या कात्रीत सापडल्यामुळे या सगळ्यातून नाटककार नाउमेद तर होत नसेल ना? या कित्येक विचारांनी मी बेचैन झालो. पण शेवटी मलाच वाटलं, नाही; हे खरं नाही, असं नसेल ते कारण. माझा मूड नसला अन् मला कुणी गाण्याचा आग्रह केला तर मी खऱ्या अर्थानं गाऊ शकणार नाही. म्हण, म्हणून मला गाता येत नाही. पाट्या टाकणं मला जमत नाही. मग भाई-कडून ही अपेक्षा करणं चूक नाही का?

असेच गप्पा मारीत बसलो असताना भाई एक दिवशी म्हणाले, "बसंता अरे, मी लिहायला बसतो. लिहून झालेला मजकूर वाचून पाहतो. पुन्हा विचार करतो. शेवटी लिहिलेला सगळा मजकूर फाडून टाकतो. मनासारखी भट्टी जमत नाही. स्वतःच्या खात्यावर भरपूर साहित्यसेवा या नावानी कागदाच्या गठ्ठ्यांची रास जमवायची नाही मला." वा वा क्या बात है! एकदम पटलं.

प्रतिभा कधीच आटत नाही. फक्त सतत त्याच वाटेनं चालण्यानं वाट वहिवाटीची होते. आपणच आपल्याला मर्यादा घालून घेतल्यासारखं होतं. मात्र हे बंधन मूळ प्रकृती मानायला तयार होत नाही. ती सारखी सतवायला लागते. या कोंडीतून बाहेर पडायचं कसं? म्हणून तेवढ्यापुरतं कुठेतरी थांबावं लागतं. पुढे काय दिसतं त्याचा अंदाज घ्यावा लागतो. या थांबण्याला फार महत्त्व आहे. त्या अवस्थेत एक दिवस असा उजाडतो की भराभर नव्या सुरावटी मनात गर्दी करायला लागतात. वाट दिसायला लागते. नव्या रूपानं सुचत जाणारे सगळे स्वरांचे आकृतिबंध आधी मी आधी मी असे सतवायला लागतात. गाण्याच्या बाबतीत हा माझा अनुभव आहे. भाईंच्या बाबतीत देखील या मधल्या काळात तेच होत असावं म्हणून भाई थांबले असावे. ओ हो! हा विचार मनात आल्यावर एकदम बरं वाटलं.

भाईंनी व्यक्तिरेखा रंगवायला पूर्वीच सुरुवात केली होती. तोच धागा पुढे तसाच चालू ठेवला. तबीयत जमत नसेल तर साथ संगतीशिवाय झलक म्हणून नुसत्याच सुरेख बंदिशी ऐकवत बसण्यातला मजा घेणं हा प्रकार होता तो. ती मैफल देखील जमते. पण त्यापायी देखील बरेच आरोप भाईंवर लादले गेले. त्याच्याच प्रांतातल्या काही अति उत्साही मंडळींनी हं! आता बहुतेक हेच लिखाण यांच्या लेखणीतून उतरणारसं दिसतंय.

असा पूर्ण विराम देखील देऊन ठेवला. दुनिया झटक्यात निर्णय घेऊन मोकळी होते. सगळाच मामला अजब आहे. पण कुठे कुणाच्या तोंडी लागा. मनात मात्र माझी तडफड सुरू झाली. बरं नुसतं एक पान लिहून झालं किंवा डोक्यात पुसट कल्पनेचा किडा वळवळला तर लगेच दुसरे दिवशी रस्त्यात आल्यागेलेल्याला गाठून सध्याची समाधी अवस्था रंगवून सांगायची या माझ्या मित्राला सवय नाही. वृत्तपत्रांतून संकल्पित लिखाणाचा चिंतनीय भाग किंवा गोपवारा अथवा मला हे कसं सुचलं, मी या गोष्टीनं किती झपाटलो गेलो आहे वगैरे वगैरे सगळंच मौलिक छापून घ्यायची देखील हौस नाही. हा त्या मानानं भलताच बेफिकीर माणूस आहे. आपल्या चाहत्यांची उत्कंठा सारखी वाढवत ठेवणं याला बिलकूल जमत नाही. सगळ्या थिएटर्समधून ट्रेलर दाखवत रहावं. पुढे चित्रपट तयार झाला नाही तरी त्याची कारणं किंवा झळ आपल्याला चिकटत नाहीत हे भाईला का जमत नाही देव जाणे.

पु. ल. हल्ली पूर्वीसारखे लिहीत नाहीत असं अधूनमधून काही अड्ड्यावर ऐकायला येतं. तसं लिहीत नाहीत हे फार बरं करतात. पंचवीस वर्षांपूर्वी मी जवानीच्या जोशात तडफेनं गात होतो. भरपूर रग होती माझ्या गाण्यात. तसाच आता पन्नाशी उलटल्यावर गात राहिलो असतो तर? असतो तर हे वाटणं ठीक आहे, पण टिकलो नसतो हेही खरं आहे. पन्नाशीत पंचविशी कशी मिळवायची. उलट पंचाहत्तरीतली फजितीच व्हायची.

एका उपजेत परिणाम साधता येतो. एक साधा सूर जिथे बरचंसं सांगून जाऊ शकतो तिथं नको ते अलंकार तानपलटे कशाला वापरा? ते भरकटणं जवानीत ठीक होतं. मैफलीत आलेल्या अनुभवांनी मी विचार करायला लागलो. समाजात मिळत राहणारी लोकप्रियता–मान्यता ही देखील आपल्या विचारांची जागा अडवते. वाढत्या वयामुळे आलेला किंवा आणावा लागणारा पोक्तपणासुद्धा जागोजागी अडवायला लागतो. मोठीच पंचाईत होते. या सगळ्यांचा आदब राखून पुढची वाट काढायची असते. त्या अवस्थेत गाणं बदलत जातं.

स्वतःला आपल्या वाढत्या वयामुळे देखील बरंच जपावं लागतं. आमच्या भाईचं लिखाण कदाचित त्यामुळे काहीसं बदललं असल्यास त्यात वावगं काय आहे?

फिर भी आमचे पु. ल. असेच मोठे राहणार आहेत. त्यांचं फुलराणी हे नाटक लिहून हातावेगळं झालं अन् त्यांनी वाचून देखील दाखवलं. फार आनंद वाटला. इतके दिवस सगळं तुंबलं होतं. चला एकदाची मोरी मोकळी झाली. हे त्याचेच शब्द. सध्या भाईची लेखणी परत जोरात सुरू झाली आहे, आम्हा मित्रांच्या वाट पाहण्याला हे फळ आलं असं निदान मी तरी म्हणत नाही. हां पण आमच्या सुनीता भाभीची पुण्याई फळाला आली. भाई लिहायला लागले. पुढे देखील भरपूर लिहीत राहतील.

भाईच्या बाबतीत नुसतंच प्रेम आपुलकी येवढंच नाही. माझा एक त्यांच्यावरचा भाबडा भक्तिभाव आहे. मला जे जे वाटतं तेच भाईंना वाटत असावं, होत असावं असा माझा

भावडा समज आहे. गाण्याची सुरुवात करताना माझ्या गुरुजींनी मला यमन शिकवायला घेतला. समुद्रासारखा अथांग राग. गेली चाळीस वर्षे मी यमनाचा विचार करतो. त्या रागाच्या जुजबी जाणिवेनं मी गायला लागलो. कितीतरी अंगाच्या बंदिशी याद केल्या तरी नवनव्या बंदिशी अजूनदेखील सुचतातच. काही ठिकाणी मी यमनात देखील अडतो. हे त्या रागाचं सामर्थ्य. दिसायला सोपा वाटणारा राग नुसत्या उपजेत जाम रुतवून ठेवतो अन् तशीच पेचदार उपजांनी नटवायची बंदिश पेश करायची झाली तर काय अवस्था होईल हे गवईच जाणू शकतो.

भाईबद्दल जो जो विचार करायला लागतो तो तो हा भाई म्हणजे खरंच एक महा-मुष्किल बंदिश असल्यासारखा वाटतो. बंदिश मुष्किल जरूर आहे. दिलासा एवढाच आहे की यमनासारख्या सदा प्रसन्न रागातली आहे.

## साभार पोच

केसरी प्रकाशन : ५६८ नारायण पेठ, पुणे ३०. १. बद्री विशाल : पं. महादेवशास्त्री जोशी, पृ. ७६, किं. ६ रु. २. केसरीची त्रिमूर्ती : डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, पृ. ३५२ किं २५ रु.

जोशी ब्रदर्स, बुकसेलर्स अँड पब्लिशर्स, : अप्पा बळवंत चौक, पुणे २. १. देह देवाचे मंदिर : श्री. पद्माकर गोवईकर, पृ. ७७, किं. ५ रु. २. येरे घना : श्री. वा. रा. सोनार, पृ. ११०, किं. ५ रु. ३. रातराणी : श्री. पद्माकर गोवईकर, पृ. ८७, किं. ५ रु.

कॉन्टिनेन्टल प्रकाशन : विजयानगर कॉलनी, पुणे ३०. १. अपभ्रंश : श्री. चंद्रकांत खोत, पृ. ८०, किं. रु. ४-५० पैसे २. जे. बी. प्रीस्टले : नाटक-काराची कला, पृ. १४७, किं. ७ रु.

नीलकंठ प्रकाशन : १६४३ सदाशिव पेठ, टिळक रोड, पुणे ३०. १. मिकी आणि मेमसाहेब : श्री. सतीश आळेकर, पृ ५२, किं. ४ रु. २. फुगे साबणाचे : श्री. विजय तेंडुलकर, पृ. ९६, किं. ६ रु. ३. झुलता पूल : श्री. सतीश आळेकर, पृ. ५५, किं. ४ रु.

विश्वमोहिनी प्रकाशन : ६२/१२ कर्वे रोड, पुणे ४. १. गाळीव रत्ने श्री. अनंत अंतरकर, पृ. १३५, किं. ९ रु. २. मुद्रा : श्री. पु. भा. भावे, पृ. १२५, किं. ९ रु. ३. हंसकथा: श्री. आनंद अंतरकर, पृ. १९५, किं. १५ रु.

# नाव सार्थ करणारा पुरुषोत्तम

सौ. ज्योत्स्ना भोळे

टिरिंग टिरिंग...... टिरिंग टिरिंग...

ज्या दिवशी वर्तमानपत्रात वाचलं की पी. एल. ची साहित्य संमेलनाच्या सुवर्ण-महोत्सवी अधिवेशनाच्या अध्यक्षपदी निवड झाली आहे, तेव्हा मनात आलं त्याला फोन करून आपला आनंद व्यक्त करावा. म्हणून त्याचा फोन नंबर फिरवला. पण बराच वेळ वेल वाजत राहिली. फोन कुणी उचलीत नव्हते. सहजच माझ्या तोंडून उद्गार निघाले की, हा एक कधीच घरात सापडत नाही. केशवराव जवळच होते. त्यांनी विचारलं "अग, कोण घरात सापडत नाही ?" मी म्हटलं, 'पी. एल. हो.' शाब्बास, आमचा फोन येणार म्हणून त्यानं दिवसभर घरातच बसावं की काय ? कंटाळून मी रिसीव्हर खाली ठेवला.

आणि आठवड्यानंतर माझ्या फोनची वेल ठणठणली. मी रिसीव्हर उचलला (मी घरातच होते) आणि 'हॅलो, कोण पाहिजे ?' म्हणून विचारलं. तिथून आवाज आला, "ज्योत्स्ना भोळे आहेत का ?" "मीच बोलते हे." "मी साहित्य परिषदेतून कुलकर्णी बोलतोय.." "बोला.". "२३ नोव्हेंबरला आम्ही परिषदेतर्फे पु. लं. चा, संमेलनाचं अध्यक्षपद स्वीकारल्याबद्दल सत्कार करणार आहो. आपण सुरुवातीला महाराष्ट्रगीत म्हणावं अशी सर्वांची इच्छा आहे." खरं म्हटलं तर मला थोडं बरं नव्हतं. होय म्हणावं आणि ऐनवेळी प्रकृती बिघडली तर ? शेवटी, नाही म्हणवेना. म्हटलं, 'मी येईन.' त्याप्रमाणे २३ तारखेला महाराष्ट्रगीत म्हटलं आणि एकेकांची पी. एल. वर गौरवपर भाषणे सुरू झाली. त्याचा सत्कार झाला आणि पी. एल. सत्काराला उत्तर देण्यासाठी उभा राहिला. मी स्टेजवर मागेच खुर्चीवर बसले होते; आता पी. एल. काय बोलणार म्हणून कान टवकारीत भाषण ऐकत होते.

माझं मन २५ वर्षांच्या मागे धावत होतं. पोरसवदा देशपांडे (तो त्या वेळी पी. एल. झालेला नव्हता) 'नाट्यनिकेतन'मध्ये आला, तो 'वहिनी' नाटकात वल्लभाचं

अनुक्रमणिका

काम करण्याकरिता. नंतर एका एकांकिकेत आणि एकदा 'कुलवधू'त त्यानं काम केलं होतं. आता या अध्यक्षांना मी एकेरी नावानं संबोधणं वाचकांना कसंतरीच वाटेल. पण मी जर त्याला 'अहो पी. एल.' म्हटलं, तर तोच 'हे असं काय विचडलं आहे, ज्योत्स्नाबाई' असं मला उलट म्हणेल आणि खरं सांगायचं म्हणजे आम्हा गोमंतकीयांना अरेजारेची फार सवय आहे. तर काय सांगत होते, तो नाटकात कधी आला.

तो जेव्हा कंपनीत आला, तेव्हा तो एक आनंदी, थोडासा हूड पण चलाख असा पोरगा वाटायचा. कुणाच्या खोड्या काढ, कुणाच्या नकला कर, असा दिवसभर त्याचा उद्योग चालायचा. गेला तिथं रमला. तो मग त्याच घरचा व्हायचा. तो कधी कुणाला नकोसा झाला नाही. घरी आला की पोट दुखेपर्यंत हसवून मगच त्या घरातल्या मंडळींची सुटका व्हायची. प्रत्येक वाक्यागणिक त्यात काहीतरी खाद्य भरलेलं असायचं. 'वहिनी' नाटकात त्याला गाणी होती. ती कधी व्यवस्थित म्हटली गेली नाहीत, तर मी त्याला खरोखरीच 'मेहनत कर' म्हणून रागवायची. पण त्याच्या आपल्या टिवल्याबावल्या चालायच्या. कधी कधी मला वाटायचं, हा कधी आयुष्यात सीरिअस होणारच नाही का? प्रत्येक भाषणात पी. एल. ने काहीतरी विनोद केलेला असायचा. सदोदित याचं विनोदी बोलणं. तसेच आमचे व्ही. डी. पंडितही गमत्याच होते. प्रवासात, पंक्तीत जेवताना, नाटकाच्या वेळी रंगपटात, सर्व कसं आनंदी वातावरण असायचं.

बसल्या बसल्या मी कितीतरी वर्षे मागे जात होते आणि पी. एल. कितीतरी वर्षे ओलांडून पुढं पुढं जात होता, गेला होता, गेला आहे, जात आहे; जनतेच्या गळ्यातला कंठमणी होऊन राहिला आहे. तोंडातून आता कसलं वाक्य बाहेर पडतं, इकडे लोकांचं अगदी लक्ष लागून राहिलेलं असतं. त्याचा विनोद, त्याचं लेखन, सर्वच कसं निर्मळ. आणि म्हणून मला ते अत्यंत प्रिय आहे. त्याचं वाङ्मय वाचताना अगदी निर्मळ झऱ्याजवळ बसून आपण शुद्ध काही प्राशन करतो असं वाटतं. त्यात गढूळता कणभरसुद्धा सापडणार नाही. मी त्याला नेहमी विचारायची, 'अरे, तुला हे सुचतं तरी कसं?' काही त्याच्यापुढे टाका, तो नेमके काहीतरी उचलतोच. प्रत्येक वाक्यागणिक तो विनोद करू शकतो. सहजपणे स्फुरणारा विनोद आणि त्याची बोलण्याची पद्धत अशी आहे की, तो साधं बोलला, तरी हसू येतं. लोक मुळी तयारीनेच येतात की आज खूप हसायचं आहे – एखाद्या गवयाकडून जशा अपेक्षा असतात की आज आपण मस्त गाणं ऐकायचं, कान तृप्त करायचे. पण काही वेळा गाणाऱ्याचा आवाज बसतो, आणखी काही होतं. त्यामुळं बैठक रंगत नाही. पण आमच्या पी. एल. ची बैठक रंगली नाही, असं कधीच होत नाही. पैलवान कुस्ती खेळताना जसे पवित्रे घेतात, तसा पी. एल. प्रेक्षक पाहून पवित्रे घेतो. काय करावं यापेक्षा काय करू नये, हे पी. एल. बरोबर जाणतो. त्याच्या विद्वत्तेबद्दल मी काय लिहिणार?

अनुक्रमणिका

इथं एक ऋण आपण मानले पाहिजे, ते म्हणजे सुनीताचं, त्याच्या बायकोचं. मला तर मनापासून वाटतं की सुनीतासारखी बायको त्याला मिळाली, म्हणून तो बांधल्या-सारखा राहिला आहे. एकदा असाच मी त्यांच्या घरी फोन केला होता, तेव्हा सुनीताने तो घेतला आणि म्हणाली, "ज्योत्स्नाबाई, तसंच काही काम असलं तर त्याला बोलावते." मी विचारलं, "कुठं गेला आहे?" ती म्हणाली, "त्याला खोलीत कोंडून घातला आहे. कारण, त्याला खूप लिहायचं आहे, आणि हा काही लवकर पुरं करील, असं वाटत नाही. उठला तुमचं निमित्त करून, की उठलाच." मला एका बाजूने सुनीताचं इतकं कौतुक वाटलं आणि दुसऱ्या बाजूने पी. एल. चेही पण. कारण, बहुतेक पुरुषांना 'बायको मला सांगते म्हणजे काय' असंच जास्त वाटतं. पण यातही एक प्रकारची गोडी आहे, हे ते विसरतात. एकाऐवजी दोन सिगारेट्स त्यानं ओढल्या तर सुनीता लगेच म्हणते, "भाई, आत्ता किती ओढतोस?" यात तो तिला घाबरतो, असं नाही. पण एखाद्या अवखळ मुलाला त्याची आई सांभाळते, ते कार्य त्याच्या बाबतीत सुनीतानं फारच छान बजावलं आहे, यात शंकाच नाही. पी. एल. ला ते नाकारता येणार नाही. असो.

आता, तो कंपनीत असतानाच्या त्याच्या काही आठवणी सांगितल्याशिवाय राहवत नाही. कोल्हापूरला 'वहिनी' नाटकाचे प्रयोग चालू होते. जिथे बिऱ्हाड होतं, ती जागा जुन्या पद्धतीची होती. म्हणजे, वर लहानशी माडी. जिन्याखाली थोडी जागा. तिथं चहा, वगैरे केला जात असे. त्या वेळी 'वहिनीं'ची भूमिका आताच्या सुचेता जोशी करायच्या. तिच्या जावेचं काम विमल वैसास करायची. त्या दोघी जिन्याखाली चहा करीत होत्या. इतक्यात 'हे' भावोजी जिन्यावरून खाली उतरत होते, आणि ह्या लाडक्या भावोजींनी अगदी शॉर्ट 'शॉर्ट' पेहेनली होती – म्हणजे लहान मुलांना कधी कधी अगदी तोकडी घालतात तशी. आमच्या विमल वैसासच्या डोळ्यातून काही निसटत नसे. तिनं लगेच वडील जावेला (सुचेता जोशीला) कोपरखळी दिली की, बघा तुमच्या लाडक्या भाऊजींचा पोषाख. ते पी. एल.ने बरोबर पाहिलं. वहिनी ओरडल्या 'भावोजी!' त्याच्या लक्षात आलं आपलं काय चुकलं ते. त्याने काय उत्तर द्यावे? तो म्हणाला, "वहिनी, माफ करा. यापेक्षा कमी कपडे घालणं मला शक्य नाही." त्या दोघी हसून हसून मेल्याहून मेल्या झाल्या.

आणखी एक असाच प्रसंग. एकाच वेळी तीन एकांकिका नाट्यनिकेतन सादर करीत असे. 'फरारी' या एकांकिकेत पी. एल.चं काम होतं. एक तासाची एकांकिका असायची त्यामुळे सर्वांची मेकअपसाठी रंगपटात गर्दी व्हायची. हे राजश्री तयार झाले. (आधी एट्रीना) पँट चढविली आणि त्यांच्या ध्यानात आलं की पँटचं एक बटन तुटलेलं आहे. त्यांनी हाक मारली, 'पंढरी!' (हा कंपनीचा जुना नोकर होता.) 'काय साहेब?' 'अरे साहेब कसला? हा पँटचा बटन तुटला आहे बघ. लवकर शिवून दे. दोन मिनिटांत

नाटक सुरू होईल.'' ती पँट त्यांनी पंढरीच्या अंगावर फेकली. पंढरीने दोन मिनिटांत बटन शिवून दिलं. महाशयांनी पुनः पँट चढविली आणि बटन लावायला लागले आणि एकदम म्हणाले, "अरे हे केवढं मोठं बटन लावलं आहेस!" त्यावर पंढरी म्हणाला, "लहान सापडलं नाही, साहेब" "असं होय, नशीब माझं हे तरी तुला सापडलं. नाहीतर तू दिव्याचंसुद्धा बटन लावलं असतंस." रंगपटात जो हशा पिकला, तो नाटक संपेपर्यंत चालू होता. स्टेजवरसुद्धा ती आठवण होऊन हसू येत होतं. असा हा 'रंगनाथ' सर्वांना रंगवून सोडीत असे.

असाच एकदा आमचा नागपूरला मुक्काम होता. मला वाटतं, जानेवारी महिना होता. थंडीचा नुसता कडाका. सकाळी जाग आली की, प्रत्येकानं म्हणावं, 'बापरे काय ही थंडी! गारठून गेलो.' आमचे जे तबलजी होते (बल्लेमामा) त्यांना सर्व कंपनीत 'मामाच' म्हणत असत. एकदा ते सकाळी चहा घेताना आम्हाला म्हणाले, की रात्रीसारखी थंडी कधीच पडली नसेल. नुसते दातावर दात आपटत होते. त्यावर पी. एल. म्हणाला, "मामा, तुम्ही वाटीत काढून ठेवलेल्या दोन्ही दातांच्या कवळ्या एकमेकांवर आपटत होत्या, त्यानंच मी जागा झालो." ज्यांच्या तोंडात चहाचा घोट होता, तो तर हसता हसता बाहेर आलाच, पण पोटात गेलेलासुद्धा बाहेर पडायची वेळ आली. असा हा चतुरंगी नव्हे चतुररंगी पी. एल. त्याला मी नेहमी 'पी. एल.' म्हणूनच हाक मारते. इथं त्याला न आवडणारं नाव पुकारलं जातं, पण मला ती सवय आहे. काही बाबतीत इंग्रजी भाषा फार सोईची पडते, त्यांपैकी हे समजावं.

आणखी एक आठवण. आम्ही साताऱ्याहून नाटक संपवून रात्री स्टेशनवॅगनने सर्व नटवर्य निघालो. भर रात्री आमची गाडी बराच वेळ रस्त्यात थांबली. अर्धा-पाऊण तास झाला. शेवटी रांगणेकरांनी विचारलं, "काय हो ड्रायव्हर, अजून गाडी नीट झाली नाही का?" "झाली, साहेब," "काय झालं होतं?" "काही नाही. एक नट पडला होता." रांगणेकर म्हणाले, "मग आम्हाला का नाही सांगितलंस? आमच्याकडे बरेच होते." त्या ड्रायव्हरच्या डोक्यावरून ती कोटी गेली. पण, गाडी-मधल्या नट-नटींची झोप मात्र उडाली. असे हे एकापेक्षा एक विद्वान जमले होते.

बरं का पी. एल., तुझ्यावर लेख लिहायला मला सांगितलं; मी काय लिहिणार रे? त्या विशेषांकात तुझ्यावर भरपूर विद्वत्ताप्रचुर लेख लिहून येतील. तुला कधीही न सुचलेला हा 'इनोद' यांना कसा काय सुचला, ते काही सांगता येत नाही. प्रेम, माया-विद्वत्ता जाणीत नाही. सोन्याची द्वारका असलेल्या कृष्णाला सुदाम्यानं काय दिलं होतं, माहीत आहे ना? पुरचुंडीत बांधून नेलेले मूठभर पोहे! ही ओंजळभर शब्दांची फुलं तुझ्या सत्काराप्रीत्यर्थ गाठी बांधली. ती गाठ सोडून, आशीर्वादासह तुझ्या शिरी वहात आहे. स्वीकार व्हावा. माझे हे चार शब्द तुझ्या प्रेमातून, मायेतून निघाले आहेत, हे विसरू नकोस. 'माझिया माहेरा जा' म्हणून सांगणारी सासुर-

वाशीग मुलगी जितकी साधी, 'भोळी', तसेच हे माझे चार शब्द तुझा आशीर्वाद म्हणून समज. सर्व लोक एकत्र येऊन हजारोंनी तुला आशीर्वाद देवोत की, आपल्या नावाने सार्थ झालेल्या पुरुषोत्तमाला भरपूर आयुष्य लाभो. त्याचबरोबर सुखसमृद्धीही लाभो. त्यात तुला जपणाऱ्या सुनीतालाही.

तुझी
ज्योत्स्नाबाई

ता. क. महाराष्ट्र टाइम्समधला लेख वाचला. तू देव मानीत नाहीस, म्हणून त्याचा आशीर्वाद तुला परवडणार नाही. यासाठी जनताजनार्दनाचा आशीर्वाद मागितला. जनताजनार्दन म्हणजे आम्ही देवच मानतो; त्यावर माझा विश्वास आहे.



## साभार पोच

**अभिनव प्रकाशन,** ५३, गुरुनानक मार्केट, डॉ. आंबेडकर रोड, दादर, मुंबई १४. (१) जीवन आणि साहित्य : श्री. शरच्चंद्र मुक्तिबोध पृ. १४७ किं. ६ रु. (२) डॉ. विक्रम साराभाई : श्री. रा. पु. कुलकर्णी पृ. ७१ किं. ४ रु.

**आध्यात्मिक साहित्य प्रकाशन,** श्री. कृष्णदास महानुभाव. अध्यात्मिक साहित्य प्रकाशन, अमरावती – हैद्राबाद, (१) श्री. नागिंद्राचार्य महापूजा वर्णन, अण्णासाहेब अडसोड, पृ. ७६ किं. २.५० रु.

**उषा प्रकाशन,** पारडी (जि. जळगाव) (१) कस्तुरीचे कण : श्री. श्रीपाद जोशी, पृ. १२४ किं. ५ रु.

**नागपूर प्रकाशन,** श्री. दि. मा. धुमाळ, नागपूर प्रकाशन, नागपूर (१) अनुरूपता : श्री. हेमन्त कानिटकर, पृ. ८९ किं. ५ रु.

# 'गप्पांतून गवसलेले पु. ल.'

डॉ. आनंद यादव

(असे अनेक वेळा घडते. वाङ्मयीन प्रश्नांवर, समस्यांवर पु. लं. ची अशी काही मते असतात. अनेक वेळा एखादे उत्तम पुस्तक त्यांनी वाचलेले असते. त्या पुस्तकातील दर्शनाने ते भारून गेलेले असतात. त्याचा आस्वाद सुरू होतो. कधी त्यातील मार्मिक स्थळांचे विवेचन होत असते. कधी एकूण मराठी साहित्यावरच वाद-विवाद झडत असतो. या सर्वांतून पु. लं. ची वाङ्मयीन मते उलगडत जातात. श्रेष्ठ विनोदी लेखक, संगीताचे पट्टीचे जाणकार, नाटकाच्या क्षेत्रातील सव्यकुळ, चित्रपटांतील नट, दिग्दर्शक, संगीत-दिग्दर्शक, शैलीदार वक्ते, कलांचे रसिक इत्यादी त्यांच्या व्यक्तित्वाच्या पैलूंपेक्षा हा पैलू अगदी वेगळा असतो. लिखित स्वरूपात तो फारसा कुठे दिसून येत नाही. एरवीच्या खाजगी गप्पांतून अनुभवाला येतो...वाङ्मयीन चर्चेवर त्यांच्या अशाही गप्पा रंगतात. अशाच एका अलीकडील बैठकीतील हा वादसंवाद स्मरणाने लिहून काढलेला. पु. लं. ना आणखी एक वेगळा पैलू आहे याची केवळ नोंद व्हावी या हेतूने (संमेलनाचे निमित्त साधून) वाचकांपुढे मांडलेला. काही शब्द कमी-अधिक झालेले असतील तर ते माझे. या संवादामुळे त्यांच्या साहित्यावर, वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वावर काही थोडा प्रकाश पडेल असे वाटते.)

"तुम्ही स्वतः श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांना विनोदातील गुरू मानता ?"

"मी असं कुठंही म्हटलं नाही. गुरू तर मी कुणालाच कधी मानत नाही."

"अनेक लोक तुमचा तसा उल्लेख करतात."

"त्याला आता मी काय करणार ? त्यांना तसं वाटलं असेल."

"मला तसं वाटत नाही. कोल्हटकरांचा विनोद सुधारणेवरील बौद्धिक प्रेमापोटी, आणि त्याचा परिणाम होऊन जुन्याच्या निर्दय उपहासापोटी, निर्माण झालेला वाटतो. उलट तुमचा विनोद मध्यमवर्गीय माणसाची प्रस्थापित मूल्ये जोपासताना होणारी ओढाताण आणि तथाकथित नव्या सुधारणांचा अवलंब करताना त्याची होणारी तिरपीट

अनुक्रमणिका

यांतील विसंगतीवर आधारलेला वाटतो. त्यामुळे तो सहानुभूतिप्रेरित, भावनिक प्रेमापोटी अनेक वेळा त्या जीवनाबद्दलच्या करुणेपोटी जन्माला येतो असं जाणवतं. ”

“ तसा तो येतो, कारण मी स्वतः मध्यमवर्गीय आहे. त्या जीवनाबद्दल, त्यातील माणसांबद्दल मला प्रेम आहे. सगळंच जुनं टाकाऊ नाही. त्यातही काही चांगली मूल्ये आहेत. नव्याच्या वरवरच्या अनुकरणात, विचारशून्य स्वीकारात, काही जुनी चांगली मूल्ये हरवतात याची मला जाणीव होते; आणि त्यातूनच विनोद निर्माण होतो. त्यामुळं तुला त्यात सहानुभूती, भावनिक प्रेम, करुणा वगैरे जाणवत असेल. ”

“ म्हणजे तुम्ही जुन्याचा पुरस्कार आणि नव्याचा तिरस्कार...”

“...असं मुळीच नाही. उलट नवं जे जे चांगलं आहे त्याचा मी हिरीरीनं पुरस्कारच केला आहे. फक्त या नव्याच्या पुरस्कारात जुनं काही चांगलं असेल ते पायदळी तुडवलं जाऊ नये; त्यातील माणुसकीला पारखं होऊ नये असं मला वाटतं. ”

“ आणखी एक गोष्ट : तुमच्या विनोदात सहजता, स्वाभाविकता, अवलोकनातील चतुर चारकावा जाणवतो; तर श्रीपाद कृष्णांच्या विनोदात बौद्धिक चातुर्य, त्यामुळं येणारी कृत्रिमता आणि कोरडेपणा येतो. ”

“ कोल्हटकरांचं वाङ्मय मी आवडीनं वाचलं आहे. मलाही पुष्कळ वेळा कोल्हटकरांचा विनोद बौद्धिक, प्रयत्नपूर्वक केलेला, कोरडा वाटतो... विनोद हा सहज आला तरच त्यात गंमत आहे....कोटी हीसुद्धा सहजपणे आली तरच विनोदाला मजा येते. असं असलं तरी श्रीपाद कृष्णांचं मराठी साहित्यातलं स्थान निर्विवाद आहे. ”

“ मुद्दा असा की श्रीपाद कृष्णांचा विनोद आणि तुमचा विनोद यांत साम्यापेक्षा भिन्नताच जास्त आहे. त्यांची कोटी आणि त्यांनी निर्माण केलेली काही पात्रे ही दोनच अतिशय गौण साम्यस्थळे आहेत. शिवाय कोटी करुन साधलेला विनोद हा काही मोठा नसतो. आणि तशा प्रकारच्या विनोदामुळे परंपरा निर्माण होते. आणि तुम्ही त्या परंपरेतील आहात असे म्हणणे हा ‘ विनोद ’ आणि ‘ परंपरा ’ या दोन्हींबद्दलही अज्ञान दाखविण्यासारखा प्रकार आहे. ”

“ पण श्रीपाद कृष्णांचा कोटीवर भर होता. ”

“...पण तुमच्या विनोदात कोटी असली तरी कारुण्य, जीवनातील केविलवाणी विसंगती यावर अधिक भर आहे. त्यामुळे तुमच्या विनोदाला हृद्यता आणि दर्जा प्राप्त झाला आहे असे मला वाटते. एरवी ‘ कोटी ’वरच भर देऊन विनोद करणारे मराठीत अनेक विनोदी लेखक आहेत. ”

“ तुला तसं वाटतं. ”

“ तुम्हीही तसं अनेक वेळा प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे कबूल केलेलं आहे—तुमच्या वाङ्मयातील ‘ मी ’ हा गबाळा, विसरभोळा, व्यवहारज्ञान फारसे नसलेला, सदैव आर्थिक ओढाताणीत असलेला, डोक्यात काहीतरी वेड घेऊन वावरणारा असतो. पण

प्रत्यक्षात तुम्ही तसे नाही. तुम्ही खूप वाचता. हुशारीनं बौद्धिक चर्चा करता. अनेक संस्थांना तुम्ही भरपूर आर्थिक मदत केली आहे. विमानाने प्रवास केला आहे.... थोडक्यात असे की तुमचे व्यक्तिमत्त्व आणि तुमच्या वाङ्मयातील ' मी ' चे व्यक्तिमत्त्व यांत भेद आहे."

" असेल...माझ्या साहित्यातला ' मी ' हा माझ्या आसपासच्या मध्यमवर्गीय जीवनातून प्रातिनिधिक स्वरूपात आकाराला आलेला आहे. त्या जीवनाचे गुणधर्म त्याला चिकटलेले आहेत. "

" म्हणजे विनोद निर्माण करण्यासाठी ' मी ' ने घेतलेली ती एक पोज आहे का ?"

" पोज कशी ? उलट मी जो मध्यमवर्गीय माणूस अनुभवला आहे, त्याचे ते प्रतीक आहे. मला तो ' मी ' मध्यमवर्गीय जीवनात सर्वत्र अनुभवाला येतो."

" तुम्हांला हे 'मी' चे विशिष्ट रूप कसे सुचले ? का श्रीपाद कृष्णांनी निर्माण केलेल्या काही पात्रांवरून ? "

" मी तुला आताच म्हणालो ना की माझ्या आसपासच्या जीवनातूनच तो आकारला आहे म्हणून. मला आता आठवत नाही; पण आरंभीच्या माझ्या लेखात तो कसा तरी येऊन हजर राहिलेला दिसतो. नंतर मी त्या ' मी 'चा शोध सुरू केला नि मला असे दिसून आले की, तो माझ्या आसपासच्या अनेक जिवंत माणसांतूनच कणकण एकत्र येऊन आकारतो आहे. "

" म्हणजे श्रीपाद कृष्णांचा सुदाम, पांडूतात्या यांच्याशी त्याचा काही वाङ्मयीन संबंध नाही. असलाच तर तो प्रत्यक्ष जीवनाच्या द्वारा आलेला आहे. "

" तुला कसं वाटतं पाहा ना ? "

" मला वाटतं की वाङ्मयीन परंपरेचा धागा शोधताना नेहमी वरवरची साम्ये पाहू नयेत. कारण या वरवरच्या साम्यांच्या पाठीमागे वेगवेगळ्या प्रेरणा, वेगवेगळी कारणे असण्याची अनेक वेळा शक्यता असते. चांगल्या दर्जेदार लेखन करणाऱ्या लेखकांच्या बाबतीत तर हे अधिक खरे आहे. ज्या काळात ते लेखक लेखन करतात तो काळ, भोवतालची सामाजिक, सांस्कृतिक परिस्थिती इत्यादी गोष्टी या प्रेरणांच्या पाठीमागे असतात...कोल्हटकरांचा काळ वेगळा, तुमचा काळ वेगळा. कोल्हटकरी संप्रदायाचं उपरणं तुमच्या विनोदाच्या गळ्यात घालण्यात कुठंतरी सरधोपटपणा आहे असं वाटतं."

" ......काहीसं खरं आहे. "

" ' खोगीरभरती ', ' नसती उठाठेव ' या संग्रहातील साहित्य आणि नंतरचे ' व्यक्ती आणि वल्ली ', ' बटाट्याची चाळ ' यासारख्या पुस्तकांतील साहित्य यातील विनोदाच्या दृष्टिकोणात काही फरक पडत गेला का ? "

" नाही बुवा. का ? "

" ' खोगीरभरती ', ' नसती उठाठेव 'मधील विनोद प्रामुख्यानं साहित्यप्रवृत्तीवर

पोसला आहे; असं वाटतं. त्यामुळं जेव्हा त्या साहित्यप्रवृत्ती भूतकाळात जमा होतात तेव्हा त्यावरील विनोदही भूतकाळात जमा होतो. उलट ' बटाट्याची चाळ ', ' व्यक्ती आणि वल्ली ' यांतील विनोद मानवी स्वभावाच्या अनेक विसंगतींवर आधारलेला असल्यानं तो केव्हाही वाचला तरी ताजा वाटतो...तुमच्या पहिल्या दोन पुस्तकांनंतरच्या लेखनात मानवी स्वभावातील विसंगतीवर अधिक भर आहे, असं दिसून येतं. "

" वस्तुस्थिती थोडीशी वेगळी आहे. ' खोगीरभरती ' आणि ' नसती उठाठेव ' – विशेषतः दुसरं पुस्तक – अगोदर प्रसिद्ध झालं नि ' व्यक्ती आणि वल्ली ' हे नंतर प्रसिद्ध झालं म्हणून तुला असं वाटत असेल. पण खरी परिस्थिती अशी आहे की, ' नसती उठाठेव ' आणि ' व्यक्ती आणि वल्ली ' मधील लेखन बहुतेक एकाच काळातील आहे. पण ' नसती उठाठेव ' मधील लेखांची जी जात आहे त्या प्रकारचं लेखन संग्रहाच्या बेजमीचं झालं म्हणून तो संग्रह प्रसिद्ध केला, आणि त्याच काळातील ' व्यक्ती आणि वल्ली 'मधील लेख असूनसुद्धा त्यांचा प्रकार थोडा वेगळा असल्यानं मी ते ' नसती उठाठेव 'मध्ये घालू शकलो नाही. स्वतंत्र संग्रहाचा ऐवज होईल एवढेही ते लेख नव्हते म्हणून तशा प्रकारचं लेखन नंतर आणखी झाल्यावर ' व्यक्ती आणि वल्ली ' हा संग्रह प्रसिद्ध केला. – दुसरं असं की जीवनातल्या अमुकच एका क्षेत्रातील दिसलेली विसंगती फक्त टिपत राहायचं असं मी कधीच केलं नाही. ज्या ज्या क्षेत्रात मी वावरलो, ज्याचा मी अनुभव घेतला त्या त्या क्षेत्रातील अनुभवच माझ्या लेखनात प्रगटतात. आता काय होतं. संग्रह करताना आपण काहीतरी एक विशिष्ट दृष्टी ठेवतो आणि तीनुसार लेख एकत्र करतो. त्यामुळं तुला तसं वाटत असेल. खरं म्हणजे हा घोटाळा क्रमवार संग्रह वाचत न जाता त्या त्या लेखांचा प्रसिद्धीचा काळ लक्षात घेऊन ते लेख वाचले की तुला असं काही दिसून येणार नाही. कारण आजही मी अनेक वेळा साहित्यातील प्रवृत्तींवर लेख लिहिले. अजूनही मला लिहायचे आहेत...आता हे खरं की मानवी स्वभावातील विसंगतीवर आधारलेला विनोद हा अधिक व्यापक असतो. सर्वांना तो जवळचा वाटतो. म्हणजे ' बटाट्याच्या चाळी ' चे प्रयोग पुणे-मुंबईबाहेर कुठंही, त्या वऱ्हाडात जरी झाले तरी ती माणसं सर्वांना आपल्यातलीच, आपल्या आसपासचीच वाटतात. "

" तुमच्या साहित्यावर असा एक आरोप केला जातो की ते कॉन्झर्व्हेटिव्ह आहे म्हणून. "

" मला माहिती आहे तो आरोप. माझं लेखनं नीट न वाचल्यामुळं किंवा नीट न कळल्यामुळं हा आरोप केला जात असावा. खरी गोष्ट अशी आहे की, जुन्या अनेक अनिष्ट चालीरीतींवर मी माझ्या पद्धतीनं टीका केलेली आहे. नव्या अनेक चांगल्या गोष्टींचा मी हिरीरीनं पुरस्कार केलेला आहे. जीवनातल्या चांगल्या, भल्या गोष्टींवर प्रेम करणारा मी माणूस आहे. मग ते नवं असो नाही तर जुनं असो. आता अनेकदा नव्या

गोष्टी केवळ फॅड म्हणून, फॅशन म्हणून विचार न करता स्वीकारल्या जातात नि त्या चमत्कारिक, उथळ दिसायला लागतात त्याला मी तरी काय करणार? कोणत्याही नव्या गोष्टीला सुधारणा म्हणणं हे जसं मूर्खपणाचं आहे तसं कोणतीही जुनी गोष्ट विचार न करता सोडून देणं, हेही तितकंच मूर्खपणाचं आहे. कॉन्झर्व्हेटिव्हचा यात प्रश्न येतो कुठं? तसा मी फॅडिस्ट सुधारणावादीही नाही नि जुनाट परंपरावादीही नाही. मी असलोच तर जीवनवादी आहे. चांगलं, सुंदर दिसेल त्यावर जीव तोडून प्रेम करणारा आहे. मग ते जुनं असो अगर नवं असो. इथलं असो अगर परदेशातलं असो."

"मीही या आरोपामुळे थोडा बुचकळ्यात पडलो होतो. एरवी तुमच्याशी बोलताना, गप्पा मारताना तुम्ही आता जे म्हणालात त्याचा पुष्कळ वेळा अनुभव आलेला आहे. जुन्या खुळचट चालीरीतींवर, धार्मिक समजुतींवर, वर्णव्यवस्थेवर, सांस्कृतिक मक्तेदारीवर तुम्ही अनेक वेळा तुटून पडलेले आहात. बहुजनसमाज नव्याने जागृत कसा होत आहे, त्यांचं साहित्य नीटपणे कसं समजून घेतलं पाहिजे, एवढंच नव्हे तर त्यांच्या सामाजिक क्षेत्रांतल्या अनेक चुकाही नीटपणे का आणि कशा समजून घेतल्या पाहिजेत; हेही तुम्ही पुष्कळ वेळा बोलला आहात...'बटाट्याच्या चाळी'तील अनेक जुन्या समजुती व प्रवृत्ती यांतील विसंगती दाखवून तुम्ही विनोद साधल्यावर शेवटी शेवटी 'त्या चाळीतील' काही चांगल्या गोष्टींचा निर्देशही तुम्ही केला आहे.–इथंही कुठं जुन्यांचा पुरस्कार नि सुधारणांना विरोध केला आहे असं वाटत नाही.–तरीही हा आरोप तुमच्यावर केला जातो याचं एक कारण मला दिसून येतं."

"कोणतं?"

"तुमच्या बहुतेक विनोदी लेखांत पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग पडतात. पूर्वार्धाचं प्रामुख्यानं विनोदी वृत्तीनं लेखन झालेलं असतं आणि उत्तरार्धात म्हणजे लेखाच्या शेवटी शेवटी गंभीरवृत्ती प्रगट झालेली असते आणि तिथे बहुधा काही चांगलं जुनं जातं आहे आणि त्या ठिकाणी नवं जे येतं आहे ते तितकंसं चांगलं नाही असा सूर पकडलेला जाणवतो. आणि त्यामुळं..."

"नशीब माझं!"

"का?"

"अरे, खरी गोष्ट अशी आहे की, मी सगळाच लेख गंभीरपणानं लिहिलेला असतो. तुला जो पूर्वार्धात विनोद वाटत असतो तोही मी गंभीरपणानंच केलेला असतो."

"म्हणजे कसं?"

"म्हणजे असं की तुला वाटणाऱ्या पूर्वार्धात जी विसंगती मी दाखवलेली असते ती गंभीरपणे विचार केल्यावरच माझ्या लक्षात आलेली असते. म्हणूनच मी तिथं विनोदाचं शस्त्र वापरलेलं असतं; टीका केलेली असते. आता वाचकाला तो नुसताच मनोरंजन करणारा विनोद वाटतो, याला मी काय करणार? माझ्यावरच्या आरोपाचं बीज या

अनुक्रमणिका

गफलतीतही कुठे तरी असण्याची शक्यता आहे. "

" असं होत असेल असं मलाही वाटतं. कारण बहुसंख्य वाचक विनोद हे समाजावर टीका करणारं आणि हसवणारं दुधारी शस्त्र म्हणून लक्षात न घेता केवळ मनोरंजनाचं, पोटभर हसण्यासाठीच केवळ जन्माला आलेलं साधन म्हणून त्याच्याकडं पाहात असावेत असं मलाही वाटतं. तुमचे टीकाकारही या गफलतीतून सुटले नसावेत ... एकूण, चांगल्या विनोदी साहित्याकडंही गंभीरपणानं पाहावं लागतं; तरच त्यातलं दुहेरी सामर्थ्य प्रत्ययाला येतं. नाही तर मग एकांगी आरोप येतात. "

" ... ..." ( सिगारेटचा झुरका चाललेला असतो. )

" तुम्ही गंभीर लेखन का करत नाही ? "

" अरे, मी हे गंभीरपणेच लिहिलेलं असतं.–तुला आताच सांगितलं ना. "

" तसं नव्हे; जीवनातील अनेक घटना–गोष्टींविषयी तुम्ही गंभीरपणे विचार करता. तोच गंभीरपणा तुमच्या साहित्यातून प्रगट न होता त्यातील विसंगतीवरच तुमचा भर अधिक असतो. "

" विसंगती हासुद्धा सुसंगतीचाच निर्देश करणारा प्रकार नाही का ? "

" ते खरं पण..."

" मी असंही म्हणेन की मला सुसंगतीपेक्षा विसंगतीच प्रथम जाणवत असेल. माझ्या स्वभावाचा तो भाग आहे. त्याला मी तरी काय करणार ? "

" तुम्हाला आरंभीच्या काळात विनोदी लेखन करण्यासाठी खास अभ्यास, तयारी अशी काही करावी लागली का ? "

" अभ्यास वगैरे काही नाही; पण विनोदी साहित्य मी अधिक आवडीनं वाचलं. आजही वाचतो...आणि तुला खरं सांगू का उगाच गंभीरपणाचा आव आणून लेखन करण्यातही काही अर्थ नाही. जीवनातलं खरंखुरं गांभीर्य जर कुठं प्रामाणिकपणे प्रत्ययाला येत असेल तर कवितेत...एरवी आपण गद्यलेखनात अनेक वेळा गंभीरपणाचा मुखवटा धारण करतो. शिवाय हा वृत्तीचा फरक आहेच. "

" अलीकडं फारसं लेखन होत नाही ? "

" खरं सांगायचं तर मी लेखनाच्या बाबतीत थोडा आळसच करतो. चांगलं वाचण्यात लेखनापेक्षा आणखी चांगल्या गोष्टी करण्यात छान वेळ जातो. चांगलं वाचलं की याच्याहून चांगलं लेखन आपलं कुठलं होणार आहे; असं वाटतं. अट्टाहासानं सारखं लेखन करतच राहिलं पाहिजे, काहीतरी साहित्यिकाचं करिअर साधलं पाहिजे, मोठा साहित्यिक झालं पाहिजे अशी महत्त्वाकांक्षाच नाही. त्यातूनही जेव्हा केव्हा लिहावंच असं वाटत असलं तर लिहितोच आहे की...अरे, जीवनामध्ये आनंद घ्यायला इतर पुष्कळच गोष्टी आहेत, मग काहीतरी लिहून रतीब चालू ठेवण्यात काय अर्थ आहे ! इतरांचं वाचत जाईन तसं हे अधिक कळतं. "

" तुम्ही मराठीतील अनेक साहित्यिक पिढ्या जवळून पाहिल्या आहेत. मराठी साहित्य पूर्वीइतक्याच आवडीने आजही भरपूर वाचता. पुष्कळ वेळा आपण त्यावर बोललेही आहोत.—त्याच्या आधारानं मराठी साहित्याची पुढची दिशा कशी असेल याविषयी काही अंदाज करता येईल का ? "

" म्हणजे नेमकं तुला काय म्हणायचं आहे ? "

" मला असं म्हणायचं आहे की, मर्ढेकरांच्या नंतर मराठी कवितेला एक दिशा मिळाली. गाडगीळ–गोखले, भावे–माडगूळकर यांच्या कथांनी मराठी कथेला एक नवी दिशा दिली. त्या त्या वेळी या लेखकांच्या मधील तशा प्रकारच्या शक्ती जाणवत गेल्या......पण आज मराठी कथा-कवितेच्या, कादंबरीच्या क्षेत्रात एखादाच अपवाद सोडता साहित्याला नवी दिशा देईल असा कोणी दिसतो का ? – अगदी मनातलं सांगायचं तर मला तरी तसा कोणी नवे वळण लावील असा खासा साहित्यिक दिसत नाही. अनेक चांगली लेखनं अधून-मधून चमकतात. पण सर्व साहित्यालाच आपली गवसणी घालील असा प्रवर्तक साहित्यिक किंवा त्यांचा गट (करंदीकर–पाडगावकर, गाडगीळ–गोखले इ. प्रमाणे) दिसत नाही. "

" त्याचं काय आहे; गेल्या बारा-पंधरा वर्षांत आपला मराठी समाजच अनेक प्रश्न, अनेक समस्या, अनेक राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक आंदोलनं यांनी इतका घुसळून निघत आहे की, मराठी समाजालाच आज नीटशी दिशा नाही. किंबहुना चारी दिशांनी तो विकासू, विस्तारू पाहतो आहे. समाजातले अनेक स्तर नव्याने जागृत होत आहेत. त्यामुळं अनेक घडामोडी होत आहेत; आणि साहित्य हे त्या त्या समाजाचं त्या त्या वेळचं प्रतिबिंब असतं. अशा अवस्थेत आज प्रवर्तक साहित्यिक निर्माण होणार कसा ? पूर्वीइतकं समाजाला स्थैर्य आहे कुठं आज ? स्थैर्याच्या पोटी काही निश्चित दिशा धरून विकास साधता येतो. आजच्या परिस्थितीत तसा साधता येणं कठीण आहे. "

" आज मराठीतील पांढरपेशा साहित्यिक ऐतिहासिक, पौराणिक, चरित्रात्मक विषय घेऊन विपुल प्रमाणात साहित्य-निर्मिती करत आहे. ते साहित्यही लोकप्रिय (पॉप्युलर) होत आहे. – याचं काही कारण सांगता येईल का ? "

" मध्यमवर्गीय जीवनाचीच आज थोडी वेगळी शोकांतिका झालेली आहे. पूर्वी मध्यमवर्गीयाला आपलं भवितव्य दिसत असे, जीवनाला स्थैर्य होतं. स्वातंत्र्यपूर्व काळात या मध्यमवर्गीय समाजात असे अनेक नेते, सुधारक, विचारवंत होऊन गेले की ते त्याला निरनिराळ्या क्षेत्रातले आदर्श वाटत असत. – आज ती स्थिती राहिली नाही. अनेक कारणांनी या समाजाला आज विफलतेची जाणीव होत आहे. त्याच्या जीवनात आज आदर्श ठेवावा असा कुणी हिरोच दिसत नाही. वर्तमान आणि भविष्यातही काही विशेष आशादायक जाणवत नाही...यामुळं ह्या पांढरपेशा समाजाचं मन इतिहास, पुराण, थोर व्यक्ती यांतील दिव्यतेत, भव्यतेत, काहीशा अद्‌भुततेत रमत

अनुक्रमणिका

असावं. तिथं कुठंतरी 'तो हिरो' शोधण्याचा हा प्रयत्न असावा...साहित्यात शेवटी कोगत्या ना कोणत्या स्वरूपात मनाचं प्रतिबिंब पडणारच रे. आता ग्रामीण साहित्य, दलित साहित्य हीसुद्धा आपल्या समाजात नव्यानं जागृत झालेल्या समाजमनाची प्रतिबिंबंच आहेत की नाहीत."

"......" मी गप्प होतो. बरीच चर्चा झालेली असते. चहा घेता घेता त्यांची मते मनाने निरखीत बसतो.

## साभार पोच

**महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघ प्रकाशन :** औरंगपुरा, औरंगाबाद. १. द्विबिंदु वर्गीकरण [ डॉ. शि. रा. रंगनाथन यांच्या 'कोलन क्लासिफिकेशन' या ग्रंथाचा संक्षिप्त अनुवाद ] : श्री. शांताराम गजानन महाजन, पृ. ९२, किं. २ रु. २. ग्रंथसूचि शास्त्र : श्री. ना. बा. मराठे, पृ. १३४, किं. ३ रु. ३. संदर्भ सेवा आणि संदर्भ साहित्य : श्री. ना. बा. मराठे, पृ. १३०, किं. ३ रु.

**पुणे विद्यापीठ :** गणेश खिंड, पुणे ७. १. महामानव रवीन्द्रनाथ, बा. भ. बोरकर, पृ. ६२, किं. ६ रु. ५० पैसे. २. मराठी शाहीर आणि शाहिरी वाङ्मय : श्री. य. न. केळकर, पृ. १४० किं. ७ रु. 3. Shri Aurolindo's Philosophy of Lige [ With special reference to Yoga, Social order and Education ] By : Kirect Joshi, pages 160, Price Rs. 2.

**मॅजेस्टिक बुक स्टॉल :** गिरगाव नाका, मुंबई ४. १. सूर राहू दे, श्री. शं. ना. नवरे, पृ. ९६, किं. ५ रु. २. निरभ्र : श्री. मधु मंगेश कर्णिक, पृ. ९८, किं.५ रु.३. ग्रीक आणि रोमन रंगभुमी, श्री. कृ. रा. सावंत, पृ. ८२, किं. ५ रु. ४. मुंबई दिनांक : श्री. अरुण साधू, पृ. २६८, किं. २० रु. ५. शिकार : श्री. मधुसूदन कालेलकर, पृ. ६६, किं. ६ रु. ६. पळा, पळा, कोण पुढे पळे तो : श्री. बबन प्रभू, पृ. ९९, किं. ६ रु.

**प्रकाशक :** श्रीकांत सीताराम पेंडसे, ६७ ए, उद्योगनगर सोसायटी, आयुर्वेद कॉलेज जवळ, आजवा रोड बडोदे. १. गुलाबाची फुले : श्री. श्रीकांत पेंडसे, पृ. १५३, किं. १५ रु.

**गो. य. राणे प्रकाशन :** गो. य. राणे, गो. य. राणे प्रकाशन, २०४०सदाशिव पेठ, टिळक रस्ता, पुणे ३०. १. सुगम मराठी व्याकरण लेखन : श्री. मो. रा. वाळंबे, पृ. २७२, किं. ७ रु. ५० पैसे.

अनुक्रमणिका

# बदलता पु.ल. वाढता आहे का ?

## दा. गो. देशपांडे

### हा तर श्रवणीय–प्रेक्षणीय

महाराष्ट्रात पु. ल. देशपांडे यांच्यासारखा प्रेक्षणीय आणि श्रवणीय साहित्यिक आणि कलावंत आज तरी नाही. तसेच ज्याचे नाव वाचताच किंवा ऐकताच रसिक मराठी माणसाचे कुतूहल सोत्साह होते ते व्यक्तिमत्त्वही पु. ल. चेच होय. वास्तविक गेली काही वर्षे पु. ल. ची साहित्य आणि नाट्यनिर्मिती ही थंडावली नसली तरी बरीच मंदावली आहे. या अवधीत अनेक साहित्यिक, नाटककार आणि नट आपल्या आविष्काराने मराठी कलाजगत गाजवून – वाजवून आहेत. असे असूनही पु. ल. या अक्षरांना उजळणाऱ्या आसामीचे आकर्षण आणि प्रभाव ही मुळीच ओसरलेली नाहीत. उलट पु. ल. चे अस्तित्व, उवाच आणि हुंकार यांनी प्रफुल्लित होणाऱ्या व्यक्ती आणि संस्था यांची संख्या वाढतेच आहे. ज्या साहित्य संमेलनाचे यंदा अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली आहे ते यापूर्वीच त्यांच्याकडे चालून येताना ते अन्य मान्यवर साहित्यिकांस मिळावे म्हणून ते बाजूस सरले. सारे साहित्यिकास मिळणारे मान झपाझप पदरात पाडून घेऊन आपला मान व प्रतिष्ठा वाढवून घेणारा हा प्राणी नव्हे. किंबहुना मान-मरातब पु. ल. च्या संपर्कात व साहचर्यात वावरून गौरवांकित होत चालले असे म्हटल्यासच ते अधिक यथार्थ ठरेल.

### पट असा विणत चालला

मी पु. ल. स प्रथम पाहिले ते पुण्यास (इ. स. १९४३ ते ४९) होतो त्या काळात. एके दिवशी मी आणि श्री. शरद गोखले लकीत बसलो असताना शरद माझ्या कानात कुजबुजला 'तो पाहा पु. ल. अगदी आणि पुरेपूर नाट्य व नाटक्या–' मी पाहिले ते खिशातून एकदोन पॉकेट बुक्स बाहेर डोकावत होती व हातातही एका पुस्तकाचे वाचन चालले होते. खरे सांगायचे तर पु.ल. च्या त्या 'अवतारावरून'

अनुक्रमणिका

प्रथमदर्शनी मला तो पुण्याचा एक नमुनाच वाटायचा! पण जाड भिंगातले ती भेदक, मिस्किल आणि बोलकी दृष्टी पाहिली आणि 'मानलिया!' असा स्वतःशीच उद्गार बाहेर पडला. नंतर कळले की, हा माणूस मूळचा पुण्याचा नाही आणि पण मूळचा कशाचा, कुठला आणि कुठपत हे जाणण्याचे माझे प्रयत्न व प्रयास अजूनही वर्तमान आहेत. तसे त्यानंतर पु.ल. शी भेटण्याचे, बोलण्याचे प्रसंग अधूनमधून आले, परंतु पु. ल. च्या निर्मितीशी परिचय सततच राहिला. इन्टर पास करून एलएल. बी. झालेला पु. ल., १९४२ च्या चळवळीशी समीकरण असलेला पु. ल., रांगणेकरांच्या नाटकात गौण भूमिका करणारा पु. ल., बोलपटात येऊ घातलेला पु. ल., 'अभिरुची'त मौलिक हजेरी लावणारा पु. ल., बी.ए. एम. ए. करून प्राध्यापकीकडे वळलेला पु. ल., बोलपटात नट, दिग्दर्शक, संगीतकार इ० सबकुछ बनून काही नवे करू म्हणणारा पु. ल., 'आकाशवाणी'वर आपल्या सर्जकतेने करमणुकीस जिवंतपणाची कळा आणणारा पु. ल., मुंबई मराठी साहित्य संघास आपली बहारदार नाटके देऊन उठाव देणारा पु. ल., आकाशवाणी सोडणारा पु. ल., बटाट्याच्या चाळीच्या एकपात्री प्रयोगाचे अभूतपूर्व युग निर्माण करणारा पु. ल. इ. इ. पु.ल. ची विविध रूपे मी पाहात आलो आहे. आणि आता बाबा आमटे, रुग्णालय यांना देणग्या देणारा दाता हे रूपही पाहात आहे. इतके करूनही पु. ल. पूर्ण झाला, संपूर्ण सापडला असे वाटत नाही. पु. ल. अजून विकसत आहे याचे हे लक्षण किंवा कलाक्षेत्रात त्याचे हरणासारख्या मोहक उड्या मारणेच त्याचा स्थायीभाव?

## पु.ल.च्या प्रेमात कसे पडता!

पु. ल. च्या प्रेमात पडणे नकळत (सगळ्या प्रेमासारखे) होते. एकदा मी मुंबईस केनेडी ब्रीजवरील चित्रकार दलालांच्या स्टुडिओत गेलो तेव्हा पाहिले की दलाल हरवले आहेत. काहीतरी वाचत आहेत. दलाल तसा फार सावध व सावधान कलावंत, पण त्यांचे मजकडे लक्ष जावयास दोनतीन मिनिटे जावी लागली. लक्ष जाताच एकदम सहर्ष उद्गारले, 'पु.ल.चा दिवाळी अंकाकरिता लेख चाळत होतो. चाळतानाच गालात स्नायूंची प्रतिक्रिया सुरू झाली. त्याचे असे साहित्य वाचताना हळूच गालात व मनात हास्याची उकळी फुटावयास सुरवात होते व पाहता पाहता मनुष्य जोरजोरात हसू लागतो—' कुंचल्याचे सम्राट दलाल यांनी केलेले वर्णन पु.ल.च्या साहित्याचे अचूक निदान होते. पु.ल.चे साहित्य त्या काळी वाचकास प्रथम आत ओढून घेई, नंतर सलगी करी व वाचकाला त्या साहित्याची संगत सोडू नये असे वाटावयास लावी. पहिल्यांदा विनोदाने नटलेले पु.ल.चे साहित्य निरनिराळी परिमाणे धारण करू लागले. सामाजिक आणि राष्ट्रीय जाण होतीच, पण मानवी जीवनात मानवी जगणे हे सूत्र अबाधित राहिले. त्याबरोबरच अनाठायी स्तोम, प्रस्थ व प्रचार यांचे विडंबन व टिंगल यांचा मुलामा

साहित्यास चढू लागला. भारतीय धार्मिक व नैतिक मूल्यांनी पारतंत्र्यातही आगणास जे आवरले–सावरले त्याची बैठक अभंग राहिली. या सर्वांत त्रिकाल संचारी राहिला डोळस बुद्धिवाद. या पोटीच बाहेरची थोरवी गाण्याइतकीच आपली आतली महत्ता आळवण्याची निकड जाणवली, पु ल.ची नाटके, स्फुट विनोदी लेख, व्यक्तिचित्रे आणि अनोखी प्रवासवर्णने यांत असा आवाज लागलेला आढळेल. म्हणूनच चित्तास भिडणारे व अंतःकरणास गुदगुल्या करणारे आवाहन त्याच्या आविष्कारात अनुभवास येते.

## तो आला आणि जिंकला !

पु.ल.चा विनोद, नाटके, एकपात्री प्रयोग, बोलपट, प्रवासवर्णने व व्यक्तिचित्रे यांनी मराठी साहित्य आणि जीवनात प्रवेश केला आणि प्रवेश करता करताच विक्रमी दाद मिळवली. काही काळ तर असा येऊन गेला की, पु.ल.च्या कोणत्याही कलात्मक आगमनाची वाचक-प्रेक्षक चातकासारखी प्रतीक्षा करायचा. मराठी माणसाला पु. ल. चे अक्षरशः वेड लागले होते असे म्हटले तरी ते अतिशयोक्तीचे ठरू नये. पु.ल.च्या रंगभूमीवरच्या प्रयोगांना उपस्थित राहण्याकरता शिफारसीने किंवा काळाबाजाराच्या भावाने तिकीट मिळवावे अशी अनिवार ओढ निर्माण झाली. ज्या अगदी बोटावर मोजणाऱ्या मराठी लेखकांच्या पहिल्या आवृत्तीच्या प्रती पाच हजारावर निघतात व हमखास खपतात त्यांत पु. ल. अग्रेसर झाला. हे यश अभूतपूर्व होय. या वाङ्मयीन कर्तबगारीने आणि यशाने मराठी माणसाच्या अपेक्षा वाढल्या, उंचावल्या. पु. ल. जे देईल ते पूर्वीपेक्षा अधिक सरस आणि आणखीन अभिनव व एक पायरी वर राहील अशी आस उघड उघड दिसू लागली. पु. ल. च्या साहित्य आणि नाट्यजीवनाचा उत्कर्षमय आलेख ऊर्ध्वमुखी झालेला असून त्याच्या कळसाची तो वाट पाहू लागला.

## थंड झाला नाही, मंदावला

पु. ल. सारख्या संवेदनक्षम प्रतिभावंताच्या हे लक्षात न येते तरच नवल. पण हे लक्षात येण्याने कदाचित दोन गोष्टी झाल्या; एक असे की, यशाची जाण होऊन प्रतिभावंताचा अहंकार फुंकरला गेला आणि दुसरे असे की लोकांच्या काय अपेक्षा आहेत याचे भान निर्माण झाले. सृजनात एक सृजनाचाच स्रोत सलग राहिला तर निर्मिती विनधोक होते. सृजनाची प्रक्रिया चालू असताना सृजनाने प्रमुदित होत जाऊन सृजन अनंत कलांनी कुसुमित होत जाणे निराळे आणि सृजन चालू असताना अहंकाराचा उद्भव होऊन ते काही क्षण अवरुद्ध होणे निराळे. दुसरे निर्लेप सृजनास मारक ठरते. अर्थात हा अहंकार सर्वसाधारण व सामान्यांचा नव्हे हे येथे स्पष्ट करणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे लोकांच्या अपेक्षांचे भानही निर्मितीच्या बाबतीत प्रतिभावंतांच्या गळ्यातील लोढणे

बनते. पु. ल. ची साहित्य आणि नाट्यनिर्मिती ही मंदावण्याच्या मागे अशा प्रकारची प्रक्रिया तर संभवली नसेल ?

## हे फुलावरचे वागडणे

प्रत्येक प्रतिभावंतास अबोधपणे कसली तरी प्रबळ ओढ आविष्कारास उद्युक्त करते व पुढे त्याचे सूत्र अधिकाधिक घन बनत जाते. यातूनच प्रतिभावंताचे बलस्थान साकारते आणि त्याच्या साहित्याचे विश्व बनते. काळाच्या अतीत जाणाऱ्या साहित्यिकांच्या साहित्यात मानवी स्वभावाच्या उभ्या-आडव्या धाग्यातून असे सूत्र प्रकटले व अक्षर झाले. पु. ल. च्या साहित्यात असे कोणते सूत्र पु. ल. ला प्रेरणा देऊन आहे याचा शोध घेऊ जाता असे वाटते की, पु. ल. चे या फुलावरून त्या फुलावर वागडणे व मध शोषणेच अजून चालू आहे. फार तर असे म्हणता येईल की, आपल्या देशातील ढासळती मूल्ये, आपला योग्य तो सांस्कृतिक वारसा जतन व संवर्धित करण्याचा अभाव आणि काहीतरी महत्त्वाचे हरवले आहे त्याचा तलास घेण्याची मध्यमवर्गीय भूमिका ही पु.ल. च्या साहित्य व नाट्यातून प्रकर्षाने आतापर्यंत ठमटून पडली. याने काही मर्यादाही जाणवतात. पु. ल. च्या साहित्यात मजेदार चित्रण असते. ते लज्जतदार करताना सुमार उंचीच्या माणसास खुज्याच्या शेजारी उभे करून त्यास उंची दिल्याचा आभास निर्माण होतो. बऱ्याच ठिकाणी ज्याला इंग्रजीत melodramatic म्हणतात तसा आशय देण्याचा प्रयत्न दिसतो. हे त्याच्या मराठीत अक्षय्य राहतील अशा काही व्यक्तिचित्रांनूनही स्पष्ट होते. अंतू बर्वातील पुरचुंडी किंवा दुसऱ्या व्यक्तिचित्रातला लहानग्याच्या मुठीतला लाडू ही याची साक्ष होत. हे शेवटी मनाला चटका लावून जातात यात संशय नाही. पण असा शेवट करावासा वाटला यात पु. ल. तील साहित्यिकावर कुठेतरी त्याच्यातील गटाने मात केली असे जाणवल्याखेरीज राहात नाही. अमेरिकन जीवनावर येथील मध्यमवर्गीयांना किंवा आपले तेच चांगले म्हणणाऱ्यांना बरे वाटावे असा जणू तो लेख लिहिला आहे. कारण त्याच अमेरिकन देशातले लोक आपल्या सर्वोच्च अशा पदावरच्या अध्यक्षास कोर्टात खेचणारी व त्यास राजीनामा द्यावयास भाग पाडणारी लोकशाही जतन करून आहेत याचा पुसटता निर्देशही पु.ल. च्या लेखात नाही.

## एक विचित्र सीमारेषा

जीवनाभिमुखता आणि विमुखता ही लेखकाच्या साहित्य विलासात फार निर्णायक असते. अर्थात याला संदर्भ शारीरिक श्रमाचा नाही. परंतु साहित्यिकाचा प्रत्यक्ष जीवनाशी जगता–जगवताना जो संबंध व संवाद चालू असतो त्याने त्याच्या साहित्यनिर्मितीचे पोषण होत असते. मनाच्या सतत उघडझापात आयुष्याच्या आव्हान व

आवाहन यांची देवाणघेवाण चालू राहते आणि असे सत्य साहित्य सर्जनास पूरक ठरते. हे केवळ मन निर्लेप व पारदर्शक राहिल्यानेच शक्य होते. साहित्यिक आणि कलावंतास जेव्हा यश मिळते तेव्हा त्याचबरोबर प्रतिष्ठा येते. यश आणि प्रतिष्ठेबरोबर साहित्यिकाच्या साहित्याच्या अलौकिक जीवनाबरोबरच एक लौकिक जीवन सुरू होते. या लौकिक जीवनाची माणसे वेगळी असतात. ती व्यवहारी असतात. चतुर असतात. लेखकाच्या जीवनात अशा माणसांचा संपर्क व साहचर्य ही वाढली की त्यांच्या लौकिक जीवनाचा विस्तार होऊ लागतो. लेखकाला लेखनाच्या दृष्टीने त्याचे म्हणून जे जग असते ते सुरक्षित आणि अश्राप राहणे आवश्यक असते. त्याच्या जगातील घटित, घटना, व्यक्ती, वल्ली, राग, लोभ, आशा-निराशा या महाभारतावर तो पोसत असतो. प्रेरित होत असतो. हे जग व्यवहारी नसते. नफा-तोट्याचे व मानमरातबाचे नसते. साहित्यिकाचे जीवनाभिमुख होणे याला अशी ही वस्तुनिष्ठ आणि व्यक्तिनिष्ठ परिमाणे आहेत. या दोन्हींना लौकिकावर अवलंबून राहावे लागत नाही. पण साहित्यिकाचा जेव्हा जीवनाबरोबरचा हा संबंध कमी होतो आणि लौकिक जीवनाचा प्रादुर्भाव व उपसर्ग वाढतो तेव्हा त्याचे सृजन नित्य नवलाईने आविष्कृत होत नाही. नव्या क्षितिजाचा वेध घेत नाही आणि मग त्याला जुन्या भांडवलावर गुजराण करावी लागते. पद्मश्री पु.ल. चा आजचा दात्याचा लौकिक आणि साहित्यनिर्मितीची रोडाई पाहिली की, मनात संशय येतो की पु. ल. च्या बाबतीत अलौकिक लौकिकाचा असमतोल तर आरंभला नाही ? साहित्यिकाला एकच नशा असते व ती सृजनाची. म्हणूनच आमच्या कवी बा. रा. कांतांनी म्हटल्याप्रमाणे लेखन हे साहित्यिकाचे शील आहे. या शीलाची मस्ती अशी असते की, प्रतिभावंत कुणाला मानत, जुमानत नाही. त्याची लागलेली जी धून असते त्यापासून त्याला कुणी परावृत्त करू शकत नाही.

## विसंगतीची मस्ती

पु. ल. तसा मस्त मनुष्य आहे. शब्द, ध्वनी, लय आणि सूर यांच्याशी सख्य असलेला कलावंत आहे. असा आज मराठीत दुसरा कुणी नाही. पु.ल.ला कुणास जवळ करावे आणि कुणाला दूर सारावे याचे अवधान आहे. विनाकारण व्यवधाने न लावून घेण्याचा खंबीरपणा आहे. आपल्या नावास आणि शब्दास टाळी व मुजरा आहे म्हणून पासरीभर लिहिण्याच्या मोहात न पडणारा हा लेखक आहे. सभा व उद्घाटने यांच्या सवंगात न सापडणारा विचारवंत आहे. मला एकदा पु.ल. म्हणाला की, स्वतःला कुणाच्या गटाचा न म्हणवून घेता साहित्य-संसार करता आला पाहिजे. पु. ल.च्या गटाचे स्वतःला समजणारे कमी नाहीत, परंतु पु. ल. ना एका गटाचा, ना एका संपादकाचा लेखक आहे. पु. ल. जिथे जिथे जे जे चांगले, हृद्य, सुंदर, सुरेल आहे तिथे तिथे ते ते सर्वांगाने घ्यावे अशा ओढीचा आहे. संगीत आणि साहित्य, नाट्य आणि काव्य

याबाबतीत त्याने कुणाला पटो वा न पटो अशी भूमिका उघडपणे घेतली आहे. कदाचित यामुळेच पु. ल.च्या साहित्यात ह्या शोधाचाच कलात्मक आविष्कार असून स्वतः पु ल. ते अंतिम जे मानवाचे आज पाथेय ठरेल ते गावावे या तडफडीत असावा. अशा माणसाचे जीवन सुसंगत कसे असावे ? जन्मभर गुलामी-सलामीचे सोयीप्रमाणे आरोह-अवरोह करणाऱ्या सरकारी अधिकाऱ्यासच तशी सुसंगती सुरेख जमू शकते. चैतन्यमय माणसास ते कदापि जमणार नाही.

## नुसता लेखक नाही

एक मात्र खरे की, लोकांच्या अपेक्षा वाढल्या याचे सोयरसुतक कलावंत केवळ लेखक असेल तर त्याला फारसे नसते. पण पु. ल. च्या पिंडात संगीत, काव्य, साहित्य आणि नाट्य यांचे असे काही अद्वितीय मिश्रण झाले आहे की, त्याला आपण लोकांपुढे येणार म्हणजे याची कल्पना केल्याखेरीज व दखल घेतल्याखेरीज पुढचे पाऊल निर्वेधपणे टाकता येत नाही. पु. ल. त्यात दिग्दर्शक व नट बावनकशी. परिणामतः प्रयोगाच्या प्रकटीकरणात केवळ धंदेवाईक बाजारीपणा तर येऊ द्यायचा नाही आणि नवे जे द्यायचे ते अगोदरच्यापेक्षा अधिक सरस हवे हा प्रश्न नाहीतरी सोडवणे कर्मकठीण. पु. ल. ला एकीकडे नवे प्रयोगांचे चिंतन व दुसरीकडे त्यांचे प्रत्यक्षात लोकांना आवडणारे अवतरण याची चिंता करावी लागत असेल तर ते कळण्यासारखे आहे. पण त्यामुळे त्याची निर्मिती अडखळावी व तीही त्याच्या चाहत्यांचा अंत पाहण्याइतकी हे मात्र उमजेनासे झाले.

## कळस हवा, कळस !

असे असले तरी मराठी माणूस मनोमनी असे मानतो की, पु. ल. च त्याच्या पदरात असे काहीतरी टाकील की, तो त्याच्या नाट्याचा, साहित्याचा आणि प्रयोगाचा कळस ठरेल. 'गुळाचा गणपती', 'तुझे आहे तुजपाशी', 'बटाट्याची चाळ' ही त्याच्या आविष्काराची (बोलपट, नाटक व एकपात्री प्रयोग) तीन रूपे मराठी माणसाच्या मनावर आजही अमिट आहेत. त्यांची चव एवढे नवे प्रयोग होत असूनही मनात, कानात व डोळ्यांत रेंगाळतेच आहे. कुणाचे नाटक थोड्यांनाच कळते, कुणाचा प्रयोग थोड्यांनाच आवडत नाही, आणखीन कुणाचे काही एका विशिष्ट वर्गापुरतेच मर्यादित आहे, कुणाचे काही कळावयास नवी जाण हवी — एक का दोन असे अनेक प्रताप आज मराठी रंगभूमीवर व साहित्यात मिरवतात किंवा मिरवले जातात. परंतु एकजात मराठी माणूस ज्याला उत्स्फूर्त 'वाह' म्हणेल अशी क्षमता असलेला पु. ल. एकच आहे. त्याच्या साहित्य व नाट्य यांचा कळस गाठण्याच्या दिशेने चाललेल्या अदृश्य दौडीस लवकरात लवकर मूर्त फळ येवो हीच माझ्यासारख्या त्याच्या डोळस वाचक-प्रेक्षकाची प्रार्थना !



# जगावेगळा मित्र : पु. ल. देशपांडे

## डॉ. सरोजिनी बाबर

देखणं अक्षर काढणं. मनापासून लिहिणं. भिंगातनं पाहणं. रसिकतेनं जगणं. हसावं असं बोलणं. नाटक करणं. आदबीनं वागणं. गावोगाव भटकणं. मनसोक्त पेटी वाजवणं. ऐटबाज पोषाख करणं, मित्रत्वाला जागणं. लोकांना शाबासकी देणं. पुरेपूर दान करणं. लोकांकडून वाहवा मिळवणं. बक्षिसं घेणं. टाळ्या मिळवणं ... असली काय काय तेगाराची लक्षणं लेवून येतेला आमचा मित्र आमच्या सगळ्यांत मोठा भारी. केव्हातरी कुठंतरी भेटतो. पण दिसला म्हणजे दमात तरी घेईल नाहीतर उगवत्या सूर्यचंद्रागत समाधानानं भेटून आमच्या आयुष्यात काहीतरी नवीनच उभं करून मोकळा होईल. अशा वेळी त्याचे डोळे असं काही बोलून जातील की, काळजानं ठावच सोडावा!

अगदी परवा परवाचंच सांगते. दिल्लीहून मुंबईला येत होतो आम्ही. तर अगोदर कसलाच पत्ता नसताना विमानतळावर आम्हाला नेणाऱ्या बसमध्ये स्वारी भेटली न् म्हणते कशी, "छान झालं भेटलीस ते.... सांगून टाक त्या लोकांना म्हणावं की, आज डिनरला सोन्याचं अंडं घालणारी कोंबडी पाहिजे!..." तशी मी पण ठोकून दिलं, "सांगीन!" म्हणताना पु. ल. नी आपल्या नजरेतून असा काय अभिप्राय व्यक्त केला की, बास!...माझं धाबं दणाणून गेलं. या माणसानं खरंच असा हट्ट घेतला वेड्यागत तर काय घ्या! परीकथेतलं विश्व साक्षात कसं निर्माण करायचं होतं मी? जीव उडून गेला ...

इतक्यात आम्ही पालम विमानतळावर पोचलो न् कुणीसंसं कुजबुजलं, "विमा उतरायचा का?" म्हणताना मी आमच्या या मित्राकडं मोठ्या कुतूहलानं पाहिलं तशी त्यांच्याकडून खाड्दिशी उत्तर आलं, "मुळीच नाही! ... आपण मेलो तर लाख रुपये आपल्या वारसाला मिळणार! न् जगलो तर आपले दहावीस खर्च होणार!... सांगितलाय कुणी हा धंदा! छट्! त्या लाख रुपयांसाठी वारस मंडळींत तंटा उभा करण्यापेक्षा आपण जगलेलंच काय वाईट?..." आणि आम्ही मग स्वतःशीच पोटभर

हसत तो विषय ढकलून दिला.

पु. ल. नी त्या वेळी आपणच जगायची केलेली भाषा लाख मोलाच्या गोष्टी सांगून गेली. साहित्य अकादमीचं बक्षीस मिळविलेले हे साहेब संगीत नाटक अकादमीच्या सभेला हजर राहून आल्यानं एक शानदार लकेर अवचितच गुणगुणून गेले... स्वरांशी, शब्दांशी आणि भावभावनांशी गुजगोष्टी करीत स्वतःलाही विसरून जाणाऱ्या या रसिकानं जगायचं तर स्वतःसाठी या जाणिवेतल्या भावनेनं केलेली ही भाषा आपण आपल्याच जिवावर जगायची हिंमत धारण करताना आपल्या जिवावर इतरांनाही जगवायला निघायचा केलेला निर्धार व्यक्त करून गेल्यानं मी सहजीच बोलून गेले, "शाबास!..."

पण ते पु. ल. नी ऐकलं. म्हणून त्यांनी "काय झालं?"

"काही नाही!" खरं ते बोलून गेले, पण त्यातून पु. ल. नी एक मोठा प्रश्न मला विचारला, "काही नाही? मग एक विचारू का? उत्तर देणार?" मी त्या उप्पर नुसतीच त्यांच्याकडे पाहात राहिले. त्यांनी मग गंभीर चेहरा करीत मला विचारलं, "बायका जेव्हा म्हणतात की, कसंसंच होतंय तेव्हा ते नेमकं काय होत असतं?" म्हणताना मी खुद्‌किनी हसले न् गप्प राहिले. त्यासरशी या कल्पनेला खुलवणारी हास्याची सुंदर कारंजी मग पु. ल. नी अशी उभी केली न् एकेक मासलेवाईक किस्से असे ऐकवले की, त्या नादात आम्ही विमानात बसून मुंबईच्या सांताक्रूज विमानतळावर केव्हा उतरलो त्याचा पत्ताही लागला नाही!...सोन्याची अंडी घालणारी कोंबडी खायची विसरली न् मग सगळंच मुसळ केरात गेल्यागत मला पु. ल. नी पुन्हा सुनावलं, "पुढच्या वेळेला हे मी खपवून घेणार नाही!"......

पण मग पुढची अशी वेळ आली तेव्हा आणखीनच गंमत चालून आली. आपल्या मनानं. ध्यानीमनी नसताना.

म्हणजे त्याचं असं झालं की, दिल्लीतल्या विठ्ठलभाई पटेल होस्टेलच्या अंगणात सभा भरलेली. त्यासाठी दिल्लीतली मराठी माणसं आलेली. १ मे चा महाराष्ट्र दिन साजरा होतेला. रंगमंचावर तमाशातली बाई आपल्या साडीच्या पदराचा पंखा नाचवीत झोकात पुढं येतेली. ढोलकं कडाडतेलं. पैंजण घुंगुर घुमतेले. त्यामुळे पु. ल. एकदम खुशीत येऊन "वा!" म्हणाले न् रसिकतेची एकदम दाद देतेले. तशी शेजारी बसलेल्या ना. यशवंतरावांनी त्यांना कानात सांगितलं, "आक्का आलीय!" त्यासरशी एकदम मागं वळून पु. ल. नी अशा काय नजरेनं माझ्यावर राग प्रगट केला की, कोठून आपण इथं आलो असं मला झालं!...माझ्या तिथल्या उपस्थितीचं त्यांना त्या वेळी वावडं वाटलं असावं म्हणून दुसऱ्या दिवशी विमानानं मुंबईला येताना पु. ल. नी वेगळाच विषय काढला. लोकगीतांबद्दल बोलणं सुरू केलं!...झालं गेलं विसरून लोकगीतांमधील शब्दांची न् स्वरांची मिजास चर्चेचा विषय होऊन बसली. म्हणता म्हणता ब्रह्मानंदी

अनुक्रमणिका

टाळी लागली. पु. लं. मधला हाडाचा रसिक जागा झाला......

पुं. ल. ना गाण्याचं फार वेड. फार म्हणजे फारच. मागं एकदा अशीच गंमत झाली. पु. ल. त्या वेळी पुण्याच्या आकाशवाणीकडे होते की मुंबईहून काही ध्वनिमुद्रणासाठी या आकाशवाणीच्या स्टुडिओत आलेवते, मला नक्की ठाऊक नाही. तर लोकगीतांचं ध्वनिमुद्रण संपलं न् मी माईकसमोरून उठले. स्टुडिओचं दार उघडलं तशी धावत येऊन पु. ल. नी मला पोटभर शाबासकी दिली, "अशीच गा. आपण खूष आहोत. उगीच राजकारणात शिरलीयस! गायचं. खूप गायचं"......

हा माणूस मधी बंगालमधे जाऊन तिथं राहून आला. का? तर लोकसंगीत टिपून घ्यायला! धन्य आहे या पुरुषोत्तमाची. आलं मनात की, एखाद्या विषयात किती रमून जाईल हरी जाणे. मग तो विषय कोणताही असू दे.

मला वाटतं ६५–६६ साल असेल त्या वेळी. सीमा प्रश्नावर जोरात वादळ उठलेलं. मी त्या वेळी महाराष्ट्राच्या विधान परिषदेची सभासद. तशी ह्या साहित्यांनी दम भरला, "आज भाषण झालंच पाहिजे!"...आणि त्या दिवशी सभागृहात तो विषय चर्चेला येणार होता तर आली की स्वारी जातीनं ती चर्चा ऐकायला!...रामा शिवा गोविंदा! मुकाट्यानं मी भाषण केलं न् साहित्यिकांनाही राजकारणात शिरल्याशिवाय होत नाही याची त्यांना खात्री पटवून दिली. पु. ल. त्या दिवशी खूष झाले. पण त्यांनी मग एक दिवस फार म्हणजे फारच मजा आणली.

लोकसाहित्याच्या पुस्तकाचं प्रकाशन मी त्यांच्या शुभहस्ते करावं म्हटलं. सौ. सुनीता वहिनींना आग्रहानं बोलावलं, समारंभाची जागा आमदारनिवासातील सभागृहाची. माझं रहाणं आमदारनिवासात. पु. लं. चं राहणं लांब वांद्र्याला की कुठंसं! तशी त्यांना घ्यायला कोण जाणार? कोडं पडलं. मग म्हटलं या तुम्हीच वेळेवर! तर काय सांगावं देवा? भाषणाच्या प्रारंभालाच त्यांनी माझा उद्धार केला, "समारंभाच्या पाव्हण्याला कोणी घ्यायला जातात, कोणी गाडीघोडं धाडून वाट पाहतात तर कोणी तुमचे तुम्हीच या म्हणतात!...आज माझा मीच आलोय!..." माणसांनी हास्याचा गदारोळ उसळवीत टाळ्या पिटल्या. मला मेल्याहून मेल्यागत झालं. पांढराफट्ट चेहरा पडला माझा...तशी मग पु. ल. नी ते ओळखून पुस्तकाची वाहवा अशा काय झोकात मांडली की, मीही लोकांच्याबरोबर हसले!...हिरमुसणं पळून गेलं माझं...

असा हा आमचा मित्र मोठा स्वभावाचा. मानसन्मानाचा. विचारांच्या देववेडीचा. म्हणून कुठं मानापानाचं अध्यक्षपद निघालं की मी त्यांना अभिनंदनाचं पत्र धाडते. लगेच कुठून तरी उत्तर येतं. दोनच ओळींचं. पण मला दांडगा आशय सांगणारं. मित्रत्व चौपदरी गुंफणारं. जिव्हाळ्यानं माखलेलं. पदरी नेहमी बाळगावं असं. म्हणून मनात येतं साहित्य संमेलनाचं अध्यक्षपद पु. ल. ना मिळालं तर पु. ल. मोठे झाले की, ते अध्यक्ष झाले म्हणून ही साहित्य सभा मोठी झाली!

# पु. ल. देशपांडे : एकांकिका–लेखन

डॉ. वि. भा. देशपांडे

मराठी एकांकिका-लेखनाचे मूळ संस्कृत आणि इंग्रजी नाट्यवाङ्मयाशी जाऊन भिडते. परंतु एकांकिका हा स्वतंत्र, स्वयंपूर्ण आणि सामर्थ्यवान वाङ्मयप्रकार आहे याची जाण मात्र गेल्या वीस-पंचवीस वर्षांतच आलेली आहे. तत्पूर्वी झालेले एकांकिका-लेखन विखुरलेल्या अवस्थेत आहे. तुटक स्वरूपात आहे. गेल्या काही वर्षांत ज्या लेखकांनी मराठी एकांकिका संपन्न आणि समृद्ध करण्याचा प्रयत्न केला त्यांमध्ये पु. ल. देशपांडे हे एक महत्त्वाचे नाव आहे.

एकांकिका वाङ्मयप्रकाराची वाङ्मयीन आणि प्रायोगिक शक्ती पु. ल. देशपांडे यांनी जाणली, आणि तिला रंगभूमीत प्रतिष्ठा मिळवून देण्याचे मौलिक कार्य केले. त्यांच्यावर पूर्वी या कार्याला प्रारंभ झालेला आपल्याला आढळतो. विशेषतः गडकऱ्यांनी लिहिलेला 'सकाळचा अभ्यास', 'दीडपानी नाटक', दत्तू बांदेकरांनी लिहिलेला 'कुत्रा आणि उपाशी मुलगा', अनंत काणेकरांच्या 'धूर आणि इतर एकांकिका', मो. ग. रांगणेकरांच्या 'तुझं माझं जमेना', 'सतरा वर्षे', 'फरारी', माधव मनोहरांच्या अनेक एकांकिका – विशेषतः 'आजोबांच्या मुली', शामराव ओक, वि. मा. दी. पटवर्धन इ. पु. लं. च्या समकालीन एकांकिका-लेखकांमध्ये एक मातबर नाव म्हणजे विजय तेंडुलकर आणि त्यानंतरची अनेक नावे सांगता येतील. या सर्व नावांमध्ये पु. लं. च्या नावाला एकांकिका-लेखनात विशेष महत्त्व का प्राप्त झाले हा शोध घेणे महत्त्वाचे आहे. तो शोध घेणे म्हणजेच त्यांच्या एकांकिका-लेखनाच्या सामर्थ्याचा आणि मर्यादांचा शोध घेणे आहे.

संख्येच्या दृष्टीने विचार केला तर आपल्या असे ध्यानात येईल की, त्यांच्या एकांकिका थोड्या आहेत. सहज नावानिशी सांगता येण्याजोग्या आहेत. (प्रस्तुत लेखात फक्त पुस्तकरूपाने प्रसिद्ध असलेल्या एकांकिकांचाच विचार अभिप्रेत आहे.) (१) सारं कसं शांत शांत (२) छोटे मासे मोठे मासे (३) सदू आणि दादू (४) विठ्ठल तो

अनुक्रमणिका

आला आला (५) नाही आसू नाही माया (६) सांत्वन (७) माझी गाठ धरते (८) पृथ्वी गोल आहे (९) सारी त्यांची कृपा (१०) पूर्वज (११) शांभवी : एक घेणे.

एकांकिकांच्या नावांकडे आपण नजर टाकली तरी त्यांमधील विषयविविधता सहजपणे आपल्या ध्यानात येईल. एका विशिष्ट विषयाभोवतीच त्यांची एकांकिका फिरत राहिलेली नाही. याचे एक महत्त्वाचे कारण म्हणजे भोवतालच्या जीवनातील अनेक सूक्ष्म गोष्टींचे निरीक्षण. त्या निरीक्षणातून नाट्य टिपण्याची-शोधण्याची धडपड. 'छोटे मासे'...मध्ये एका खेडेगावातील एस. टी. स्टॅंडचे वातावरण आहे. तिथे घडलेले लहानसहान प्रसंग आहेत. तर 'विठ्ठल तो...' मध्ये देवळातले वातावरण आणि भक्तीचा विषय आहे. 'सांत्वन' मध्ये सधन प्रतिष्ठित समाजातील जीवनातले खोटेपण आहे. 'नाही आसू...' मध्ये शिक्षकांच्या जीवनातले काही क्षण टिपलेले आहेत. अशा विविध विषयांतील जीवननाट्य पकडण्याची शक्ती त्यांच्यामध्ये आहे. कोणताही लेखक आपल्या कलाकृती-साठी किती आणि कोणत्या प्रकारचे विषय निवडतो याला मर्यादित अर्थाने का होईना निश्चितच महत्त्व आहे. याचे कारण त्याच्या विषय-निवडीमागे त्याच्या जीवन-निरी-क्षणाची आणि दृष्टिकोणाची साक्ष असते. ज्या सामाजिक संदर्भाशी लेखकाचे साहित्य लिप्त असते त्या समाज-मनाशी तो किती जवळीक साधून आहे याचाही आपल्याला अंदाज येतो. त्या दृष्टीने सांगावयाचे झाले तर पु. लं. चे जीवन-निरीक्षण, अवलोकन मराठी साहित्यिकांत तरी विशेष मोलाचे आणि आगळेपणाचे आहे. त्या अवलोकना-पोटीच त्यांच्या एकांकिका-लेखनात विविधता येऊ शकली.

मानवी जीवनाचे अवलोकन ढोबळ मानाने अनेकजण करतात. पण जाणिवेने, संवेदनक्षमतेने करणारे फारच अल्प असतात. केलेल्या अवलोकनातील जीवननाट्य समर्थपणाने आविष्कृत करण्याचे कसब तर थोड्यांमध्येच असते. ते पु. लं. कडे आहे. त्यांच्या एकांकिका-लेखनात विषयविविधता जशी आहे तशीच व्यक्तिविविधता आहे. ती विविधता असण्याचे प्रमुख कारण म्हणजे माणूस शोधणे आणि तो बहुरूपाने व्यक्त करणे ही त्यांच्या साहित्याची प्रतिज्ञा आहे. कोणत्याही श्रेष्ठ साहित्यकारांची हीच प्रतिज्ञा असते, असावी लागते. पु. लं. च्या एकांकिकांमधील माणसांचे व्यक्तिदर्शन आपल्याला तेच सांगते. व्यक्तिदर्शन घडवीत असताना ते त्या व्यक्तीला लहानसहान तपशिलासह आपल्यासमोर साकारतात. व्यक्तीचा पोषाख, सवयी, लकबी, शब्द यांच्यासह ती व्यक्तिरेखा समूर्त होते. हा सारा तपशील सूक्ष्म अवलोकनाशिवाय तर अशक्यच असतो. तो तपशील नाट्यरूप होतो तेव्हा त्यातील वास्तवाशी आपले जवळचे नाते प्रस्थापित होते, एक प्रकारची जवळीक निर्माण होते. त्या साऱ्याच व्यक्तींचा आपला निकटचा परिचय असल्याचा भास होतो. यातच त्या व्यक्तिरेखनाचे सामर्थ्य सामावलेले असते. मग त्या व्यक्तिरेखांच्यामधील आपल्या ध्यानात राहतात कोरान्ने

मास्तर, मेमसाहेब, सदू–दादू, विठ्ठल, भटजी, गुंडूबुवा वगैरे. पुष्कळ अशा काही व्यक्तिरेखा जरी सांगितल्या तरी एक गोष्ट निश्चित आहे ती म्हणजे एकांकिकेत नाटका-प्रमाणे एखाद्याच व्यक्तीच्या अंतरंगदर्शनाचा भाग प्रामुख्याने नसतो, तर विविध व्यक्तींचे दर्शन एकाच वेळी आपल्याला घडते. पु. लं. च्या एकांकिकेत बहुपात्रांचा वापर आहे. त्यांच्या एकांकिकेतील व्यक्तिरेखा ह्या व्यक्तिचित्रांपेक्षा व्यंगचित्रांकडे झुकणाऱ्या आहेत. त्यांच्या एकूणच साहित्यातील व्यक्तिचित्रांबद्दल आपल्याला हेच म्हणता येईल. व्यंगचित्रांना व्यक्तिरेखांच्या इतके बंदिस्त रूप नसते, तशी अपेक्षाही नसते.

अभिव्यक्तीच्या दृष्टीने पु. लं. च्या एकांकिका-लेखनाने केलेली कामगिरी महत्त्वपूर्ण आहे. उपरोध, उपहास, विडंबन, विनोद इत्यादींच्या साह्याने त्यांनी आपल्या एकांकिकांचा आविष्कार घडवला. त्यांच्यापूर्वी गडकरी, दत्तू बांदेकर, शामराव ओक, चि. मा. दी. पटवर्धन आदींनी एकांकिका आविष्कारासाठी विनोदाचे तंत्र वापरले होते. पण ते मर्यादित अर्थाने प्रभावी ठरले. समर्थपणाने, सजगतेने विनोदाचा वापर मराठी एकांकिकेत पु. लं. नीच यशस्वी रीत्या केला. समाजातल्या विविध क्षेत्रांत, स्तरात, व्यवहारात ज्या ज्या ठिकाणी विसंगती असते त्या त्या ठिकाणी विनोदाला विनासायास निमंत्रण लाभते. पण तेही क्षण पकडण्याचे सामर्थ्य असावे लागते. ते पु. लं. च्या निरीक्षणकलेत आहे. त्यामुळे एकूणच मानवी जीवनातील विसंगती त्यांनी हेरल्या आणि उपहास, उपरोध, अतिशयोक्ती यांच्या द्वारा व्यक्त केल्या. नित्य जीवनातील विसंगती–दर्शनाबरोबरच साहित्य, नाट्य, संगीत यांतील परंपरांची, नवतेची यथाशक्य विसंगती हेरली. त्यातले गंभीर ताण दुसऱ्या टोकापर्यंत ताणून त्याची दुसरी विनोदी बाजूही नाट्यांकित केली. त्याची दोन-तीन उदाहरणे पाहण्यासारखी आहेत. ‘सदू आणि दादू’, ‘शांभवी : एक घेणे’, ‘पृथ्वी गोल आहे’ इ० त्यांच्याच शब्दात ते विडंबनरूप पाहण्यासारखे आहे. काही भाष्य करण्यापेक्षा त्यांचे शब्दच खूप काही सांगून जातात.

(१) **‘शांभवी : एक घेणे’** – एक द्रव्य नाट्य. हल्ली सघनता हा नवनिर्मितीचा नवावश्यक घटक आहे. आशयघनता आणि आकृतिघनता. परंतु मानवाची पावले अणुध्वंकडून हायड्रोजन बॉम्ब किंवा ज्वलध्वंच्या दिशेने पडू लागली आहेत. अशा काळाचे स्वागत हे घनाऐवजी द्रवाने होणे आवश्यक आहे. नवीन वाङ्मय हे घनाशयातून निघून जलाशयात पडणे अपरिहार्य आहे. ‘देणे’ हा गतयुगाचा धर्म तर ‘घेणे’ हा नवयुगाचा. प्रस्तुत नाट्यविषय ‘शांभवी’ हा असल्यामुळे ‘घोट्य’ आहे. आस्वाद, मग तो वाङ्मयकृतीचा का असेना, चोष्य असेल, लेह्य असेल आणि घोट्यही असेल. वाङ्मय जीवनाच्या विविध स्तरांतून जाते. द्रवनाट्य जीवनपटाखालून जाते. हा स्तर अस्तररूप आहे. हीच द्रवनाट्याची अस्मिता आणि

विस्मिताही.

(२) **पृथ्वी गोल आहे** (चार प्रसंगी नेटक) (आश्वासन :–या नेटकाचा प्रयोग करायची कुणाचीही बिशाद नाही.) **नेटक या नवीन नाट्यप्रकाराची चर्चा :** नाटक – नाटिका – नाटुकले – नाटकी – नाटक्या इतके नाटक ह्या मूळ शब्दाचे अनेक तंत्रविशेष आज चालू आहेत. 'नेटक' हा असाच नवीन नाट्यतंत्राविष्कार आहे. नेटकाचा आद्यप्रणेता कोण या विषयावर अजून चर्चा होण्याइतका तो प्रकार जुना झालेला नाही. नेटकाचे वैशिष्ट्य हे की, तो प्रकार दृश्य वा श्राव्य नसून वाच्य आहे. काही कुत्सित टीकाकार तो प्रकार अर्वाच्य आहे असेही म्हणतील. कोणत्याही नव्या गोष्टीची सुरुवातीला कुचेष्टा होते. नेटकात अंक किंवा प्रवेश नसून प्रसंग असतात. आयुष्यात तरी अंकापेक्षा आणि त्यातील प्रवेशांपेक्षा केवळ प्रसंगच अधिक नसतात का? त्या दृष्टीने नेटक हे अधिक जीवनस्पर्शी आहे. लेखकाने ते नेट धरून लिहायचे असते आणि 'प्रियवाचकाने' नेट धरून ते शेवटपर्यंत वाचायचे असते. जीवनातही जन्माला येताना नेट धरूनच यावे लागते आणि शेवट होईपर्यंत नेट धरावा लागतो. असो. नेटकाच्या वाचकाला इतकी विद्वत्तापूर्ण आणि अर्थगंभीर प्रस्तावना पुरे झाली.

(३) 'सदू आणि दादू' हा फार्स तर नवनाट्यातील संकेतांवरची खास विनोदी टीका-टिप्पणी आहे.

पु. लं.च्या एकांकिकेचे स्वरूप पाहताना प्रायोगिक यशाचाही विचार महत्त्वाचा आहे. त्यांच्या एकांकिकांतील व्यक्तिचित्रण, अभिजात स्वरूपाचा विनोद, संवादातील सहजता, नेपथ्य–सजावट इत्यादींतील आटोपशीरपण अशा अनेक विशेषांमुळे प्रयोगाची रंगत हुकमी ठरते. त्याच कारणाने त्यांच्या एकांकिकांचे प्रयोग शेकड्यांनी झालेत आणि आजही होत आहेत. एकांकिका लेखनपूर्व काळात त्यांच्या डोळ्यासमोर प्रयोगाचे चित्र स्पष्ट होत असावेसे वाटते. सुदैवाने त्यांच्या एकांकिकांच्या पहिल्या प्रयोगांना मातब्बर कलाकार लाभले. त्यामुळे त्या प्रयोगांना लाभलेली कलात्मक उंची ही त्यांच्या पुढच्या एकांकिका-लेखनास प्रोत्साहित करणारी ठरली.

विषयातील विविधता, वस्तुरचनेतील तंत्रशुद्धता आणि प्रयोगक्षमता ही पु. लं.च्या एकांकिकेची खास वैशिष्ट्ये सांगता येतील. त्याच्या जोडीला त्यांनी निर्विष असा विनोद कोणत्याही कारणाने अभिरुचीच्या मर्यादा न सोडता वापरला. उपहास, उपरोध, विडंबनाचे शस्त्र वापरताना त्या विनोदाला टिंगलीचे, टवाळीचे अरूप येऊ दिले नाही. अवतीभवतीच्या जीवनात अवलोकन करीत असताना डोळ्यांसमोर विशिष्ट व्यक्ती असल्या तरी त्या व्यक्तींचे मूळचे व्यक्तिविशेष कोणालाही रक्तबंबाळ न करता साहित्य-रूप झाले. वास्तव सत्याचे आणि वाङ्मयीन सत्याचे भान राखले गेले. स्वाभाविकच त्यातून निर्माण झालेली व्यंगचित्रे ही श्रेष्ठ साहित्याची खूण झाली. पु. लं. ची एकांकिका मराठी एकांकिकेतील एक महत्त्वाचा टप्पा बनली.

त्यांच्या नाट्याविष्कारातील श्रेष्ठता भावत असतानाच आपल्याला त्यातली कालसापेक्षता जाणवते. पंधरा-वीस वर्षांपूर्वी जे विषय, व्यक्ती, प्रसंग आणि विनोद ताजे वाटले ते कदाचित आज तितके जवळचे वाटणार नाहीत. काहींचा आविष्कार परंपरागत वाटेल. जुना वाटेल. पण त्यातला तत्कालीन नवतेचा प्रयत्न, त्यामागची सुजाणता नाकारता येणार नाही. आज या साऱ्या एकांकिकांकडे साहित्य म्हणून पाहताना जाणवते ते असे की, विविध विषय, प्रसंग आणि नमुनेदार माणसे आणि त्यांची व्यंगचित्रे पु. लं. नी आपल्याला दिली. पण जे त्यांच्या एकांकिका-लेखनाचे बलस्थान किंवा सामर्थ्य आहे तीच मर्यादाही आहे. अनेकदा ती व्यंगचित्रे म्हणून आपल्याला सुखावतात ( अर्थात ही कामगिरीही सामान्य नाही ) पण ती त्यापलीकडे जाऊन अधिक सघन स्वरूपाचा नाट्यानुभव प्रकट करताना दिसत नाहीत. आपल्या जाणिवा, अनुभूती रुंदावत नाहीत. त्यांची लेखणी मूळ विषयाला, व्यक्तिमनाला स्पर्शण्याचा प्रयत्न करते पण नाट्यानुभावाची पूर्णता आणू शकत नाही. आशय आणि अभिव्यक्ती यांची एकरूपता जाणवते ती ‘ सदू आणि दादू ’ यामध्येच ! तसेच विडंबनाचा उत्तम नमुना म्हणून ‘ शांभवी : एक घेणे ’ चा आवर्जून उल्लेख करावा लागेल. आज ज्या उणिवा जाणवतात त्याचे एक कारण असे असू शकेल की, त्यांनी ज्या विनोदाच्या आश्रयाने एकांकिका आविष्कृत केल्या त्याच आवर्तात ते गुंतले असावेत !

गेल्या पंधरा-वीस वर्षांत मराठी एकांकिकेला नवे वळण आणि गतिमानता देण्यात दोन नावे डोळ्यांसमोर येतात : एक म्हणजे पु. लं. चे आणि दुसरे म्हणजे विजय तेंडुलकरांचे ! तेंडुलकरांनी जीवनातील भावणारे गंभीर ताण आपल्या एकांकिकांमधून निरनिराळ्या पद्धतीने समर्थपणाने व्यक्त केले. जीवनातील विविध भावभावनांचे विदारक दर्शन घडवीत घडवीत थेट जीवनसत्याचा शोध घेण्याचा त्यांनी यत्न केला. आशयाला बेधडकपणे भिडणारी त्यांची लेखणी स्वतःचा सुंदर आविष्कार घेऊनच उभी ठाकली. तेंडुलकरांनी गंभीरपणाने जीवनशोध घेतला तर पु. लं. नी विनोदाच्या अंगाने जीवनातील अर्थपूर्णता आणि अर्थशून्यता शोधण्याचा यत्न केला. तिथेच मराठी एकांकिका एका नव्या वळणावर आली. तिची वाट स्पष्ट झाली.

आता मराठी एकांकिका मराठी मनात – रंगभूमीवर स्थिरावली आहे, प्रतिष्ठित झाली आहे. तिला स्वतःचे रूप गवसले आहे. नवनवीन रूपांचा ती शोध घेत आहे. महेश एलकुंचवार, चिं. त्र्यं. खानोलकर, वृंदावन दंडवते, विद्याधर पुंडलीक, वसुधा पाटील, सतीश आळेकर इत्यादी अनेक लेखक मराठी एकांकिकेच्या कक्षा रुंदावत आहेत. तिची मनोविश्लेषणाची आणि जीवनदर्शनाची शक्ती वृद्धिंगत करीत आहेत. अशा वेळी ज्यांनी या एकांकिकेची नवी वाट स्पष्ट केली अशा पु. लं. कडून अधिक अपेक्षा आहेत. गेल्या काही वर्षांत त्यांच्या लेखनात आलेली अंतर्मुखता, जीवनदृष्टीतील सखोलता, विनोदनिर्मितीतील कारुण्याचे दर्शन ह्या मराठी साहित्याच्या दृष्टीने

अमोलिक गोष्टी आहेत. म्हणूनच असे वाटते की, बदलत्या जीवनाच्या नव्या जाणिवा, त्यांतील अर्थपूर्णता आणि अर्थशून्यता त्यांनी एकांकिकारूपाने अभिव्यक्त करावी. यांच्या एकांकिकांच्या आशयाचा प्रवास आजच्या सामाजिक सुख-दुःखाशी येऊन भिडावा. हा प्रवास अवघड आहे हे तर निश्चितच. म्हणूनच पु. लं. कडून आम्ही तो अपेक्षितो !

## साभार पोच

**साहित्य प्रसार केंद्र**, साहित्य प्रसार केंद्र, सीताबर्डी, नागपूर १२ (१) लिटमस् (कवितासंग्रह) : श्री. शिरीष गोपाळ देशपांडे पृ. ५५ किं. ५ रु.

**संजय प्रकाशन** : सौ. ललिता शं. भावे, संजय प्रकाशन, ९१७/२२, फर्ग्युसन कॉलेज रोड, पुणे ४ (१) आली ज्ञानामाउली घरा : प्रा. विमल लेले, पृ. १३६ किं. १० रु.

**पुणे विद्यार्थीगृह प्रकाशन** : श्री. प. भ. कुलकर्णी, पुणे विद्यार्थीगृह प्रकाशन, १७८६, सदाशिव पेठ, पुणे ३०, (१) असे ही प्रीत जगावेगळी : प्रा. विमल लेले, पृ. ८०, किं. ५ रु.

**महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स** : १२, रॅम्पार्ट रोड, मुंबई १. (१) आबासाहेब गरवारे गौरव ग्रंथ : पृ. १७२.

**अरुणप्रभा प्रकाशन**, (वैयक्तिक), श्री. रंगनाथ नरहर होनप, संचालक अरुणप्रभा, १५६२, सदाशिव पेठ, पुणे ३०. (१) रंग ढंग (स्फुट कविता संग्रह), रंगनाथ, पृ. ९६, किं. ३ रु.

**विदर्भ संशोधन मंडळ**, श्री. ग. त्र्यं. देशपांडे, विदर्भ संशोधन मंडळ, पश्चिम हायकोर्ट मार्ग, नागपूर १. (१) विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक १९७३ : प्रा. मधुकर रामदास जोशी, पृ. २५६, किं. ८ रु.

अनुक्रमणिका

# पु. ल. देशपांडे—एक समृद्ध व्यक्तिमत्त्वाचा कलावंत

डॉ. वि. रा. करंदीकर

त्या घटनेला आता चोवीस-पंचवीस वर्षे झाली. १९४९ च्या सुमाराची गोष्ट आहे. श्री. पु. ल. देशपांडे त्या वेळी एम्. ए. चा अभ्यास करण्याच्या निमित्ताने सांगलीला विलिंग्डन महाविद्यालयाच्या समोर असलेल्या एका बंगल्यामध्ये खोली घेऊन राहिले होते. प्रा. शं. के. कानेटकर ऊर्फ कवी गिरीश हे तेव्हा त्या महाविद्यालयामध्ये मराठी विभागाचे प्रमुख होते. एके दिवशी सकाळी अकराच्या सुमारास नेहमीप्रमाणे गिरीश झरझर महाविद्यालयाच्या इमारतीकडे चाललेले असताना पुलंनी त्यांना आपल्या खोलीतून पाहिले. विद्यार्थ्यांबद्दल नितांत प्रेम बाळगणाऱ्या आणि निवृत्तीच्या सीमेवर पोचलेल्या गिरीशांच्या त्या प्रेरक दर्शनाने तरुण पुलंचे मन हेलावले. त्यांनी आपली भावना एका काहीशा दीर्घ अशा कवितेमध्ये शब्दबद्ध केली. गिरीशांच्या निवृत्तीच्या निमित्ताने त्यांचा एक भव्य सत्कारसमारंभ त्यानंतर लवकरच विलिंग्डन महाविद्यालयामध्ये साजरा झाला. त्या समारंभात पुलंनी आपली कविता भावपूर्ण स्वरात म्हणून दाखवली. ती कविता हे त्या समारंभाचे एक आगळेच आकर्षण ठरले.

हाडाचे शिक्षक आणि प्रकृतीने कवी असलेल्या गिरीशांच्या जीवनातील गौरवाची व सफलतेची बाजू कोणती हे पुलंनी म्हटलेल्या त्या कवितेमध्ये व्यक्त झालेच, पण त्या-बरोबर त्यांच्या सुसंस्कृत व गुणग्राहक मनोवृत्तीचे दर्शनही तीमध्ये घडले. त्या वेळच्या उदयोन्मुख साहित्यिकांच्या वर्तुळामध्ये पुलंचा समावेश त्यापूर्वीच झालेला होता, तर कवी गिरीशांची पिढी मावळतीकडे झुकलेली होती. पूर्वक्षितिजावरील बालसूर्याच्या प्रभेने रोमांचित होण्याचा धुंद अनुभव आपण घेत असल्याच्या क्षणी संध्याछायेत शिरत असणाऱ्या मागच्या पिढीतील माणसांचे कर्तृत्व जिव्हाळ्याने टिपण्याचे भान राहणे हे केवळ अपवादानेच आढळते. पुल हे अशा अपवादांपैकी एक आहेत याचा प्रत्यय त्या कवितेमुळे आला. मनाचा हा धर्म ही देखील एक रसिकताच आहे. पुलंच्या रसिकतेचा हा विशेष त्यांच्या आयुष्यामध्ये आजवर त्यांची साथ करीत आला आहे. आपले

अनुक्रमणिका

आजोबा, श्री. ऋग्वेदी यांच्यावर त्यांनी लिहिलेल्या कौटुंबिक जिव्हाळ्याने भरलेल्या लेखामध्ये तो दिसतो. ' बटाट्याची चाळ ' यासारख्या ललित कृतीच्या अखेरीस कलावंताच्या अलिप्त समरसतेने लिहिलेल्या स्वगतात त्याची चाहूल लागते. संगीत-नाटक अकादमीचे उपाध्यक्ष म्हणून मास्तर कृष्णरावांसारख्या जुन्या पिढीतील गायकांचा सन्मान करतेवेळच्या कर्तव्यभावनेला त्याच विशेषामुळे ओलावा लाभतो.

नव्याचे आणि जुन्याचे सारख्याच समरसतेने स्वागत करू शकणारी पुलंची ही संवेदनशीलता साहित्य किंवा संगीत या कलांपुरती मर्यादित नाही, किंबहुना अनेकांगी रसिकता हे त्यांच्या समृद्ध व्यक्तिमत्त्वाचे एक विलोभनीय असे अंग आहे. सौंदर्यास्वादाच्या विविध रंगांची एक मैफलच जणू त्यांच्या जीवनात जमून गेलेली आहे. त्यांच्या बैठकीत बसून तासामागून तास चालणाऱ्या गप्पांचा आस्वाद ज्यांनी घेतलेला आहे त्यांना हा अनुभव आलेला आहे. पुल त्रिखंडात फिरून आलेले आहेत, भिन्नभिन्न क्षेत्रांतील अनेकानेक व्यक्ती त्यांनी जवळून पाहिलेल्या आहेत, आठवणींच्या कैक निजा त्यांच्या खिशात आहेत. गप्पांच्या ओघात बहुरंगी अनुभवांचे हे भांडार त्यांच्या जीवंत वाणीतून आणि बोलक्या डोळ्यांमधून खुले होऊ लागले की, खुर्चीवर एका जागी बसून दहापंधरा मिनिटांत साऱ्या जगाचा फेरफटका मारून आल्याचा प्रत्यय आणून देणाऱ्या चित्रवाणीवरील एखादा सुंदर कार्यक्रम पाहिल्याचा आनंद बैठकीतील मंडळींना मिळतो. मानवी स्वभावातील बऱ्यावाईट अशा सर्व प्रवृत्तींशी त्या गप्पागोष्टीत वर्दी लागते. दांभिकपणा आणि ढोंग या जीवनातील उबग आणणाऱ्या गोष्टी, पण विनोदाचा हलकाफुलका स्पर्श झाल्यामुळे त्यांनाही या मनमोकळ्या गप्पांमध्ये काही एक रमणीय रूप लाभते.

पुलंच्या संवेदनाशीलतेतील या चौरसपणाची साक्ष त्यांच्या लेखनात देखील आपल्याला मिळू शकते. रत्नागिरीच्या मधल्या अळीचा जणू प्रतिनिधी असा ' अंतू बर्वा ' ते शब्दांनी रेखाटू शकतात, त्याचप्रमाणे इंदूरचे रामूभय्या दाते यांची साऱ्या जीवनाला व्यापून राहणारी रसिकता हा देखील त्यांच्या रसिकतेला जाग आणणारा विषय होतो. जीवनात हरघडी आढळणारी विसंगती ते खेळकरपणाने पाहतात म्हणून ते उत्कृष्ट विनोदी लेखन करू शकतात आणि सुसंस्कृत अभिरुचीमधील स्निग्ध शांत सौंदर्य ते समजू शकतात. त्यामुळे त्यांचा तो विनोद कधी थिल्लर होत नाही. लोकांनी हसावे हे खरे, पण त्यासाठी आपण हास्यास्पद होण्याची आवश्यकता नाही; हे अवधान पुलंनी सदैव राखलेले आहे. विनोदाच्या या जाणिवेबरोबरच सर्वसामान्य माणसाबद्दल, त्याच्या अशरणतेबद्दल, त्याला भोगाव्या लागणाऱ्या दुःखाबद्दल एक सूक्ष्म अशी कणव पुलंच्या अंतःकरणात जागी असते. ' बटाट्याची चाळ ' किंवा ' असा मी असा मी ' यांसारख्या त्यांच्या कृतीत केवळ विनोदच आहे अशी समजूत करून घेतली तर फसगत होण्याचा संभव आहे. समाजाबद्दल खरेखुरे प्रेम मनात जागे नसेल तर विनोदी लेखन करता येणार नाही, अशी पुलंची धारणा आहे. व्यापक सहानुभूती अंतःकरणात असेल तरच

पाऊल न घसरता विनोदाच्या फसव्या भूमीवरून सुखरूपपणाने चालता येते. पुल तसे सुखरूप चालू शकतात.

ललितवाङ्मयाच्या कोणत्या ना कोणत्या प्रकारात ज्यांनी नाव घेण्याजोगी कामगिरी केली आहे अशा लेखकांची साहित्य संमेलनाच्या अध्यक्ष पदासाठी निवड केली जाते किंवा साहित्याचे मूल्यमापन करणाऱ्या, त्यातील कस शोधणाऱ्या समीक्षकांची त्या स्थानी योजना होते. पुलंचे महत्त्वाचे वैशिष्ट्य असे की, त्यांची कलेच्या क्षेत्रातील कामगिरी केवळ साहित्यापुरती मर्यादित नाही. व्यक्तिचित्रे, प्रवासवर्णने किंवा विनोदी लेख याप्रमाणे नाटक हा देखील साहित्याचा एक प्रकार. 'तुझे आहे तुजपाशी'—ने मिळवलेले यश साऱ्या महाराष्ट्राला परिचित आहे. पण पुल हे केवळ नाटककार नाहीत, ते तितकेच कुशल नाट्यदिग्दर्शक आहेत. नाटकाच्या प्रयोगातील बारीकसारीक खाचाखोचा ते जाणतात आणि 'बालगंधर्व रंगमंदिरा'सारखी वास्तू उभी राहत असेल तर तेथे कोणकोणत्या सोयी झाल्या पाहिजेत हे ते सांगू शकतात. पुलंचा नाटकाशी असलेला संबंध अशा बाह्य उपांगांपुरताच मर्यादित नाही. नाट्यकलेचा प्राण म्हणजे अभिनय, ती कलाही ते जाणतात. 'बटाट्याची चाळ' किंवा 'असा मी असा मी' अशा एकपात्री प्रयोगांनी अभिनयातील आपल्या कौशल्याची ग्वाही त्यांनी पटवलेली आहे. रंगभूमीवर केवळ एक साधा पडदा उभा करून तऱ्हेतऱ्हेची वेषभूषा किंवा नेपथ्य यांचे विशेष साहाय्य न घेता आणि प्रकाशयोजना आदी पूरक साधनांचा फारसा बडिवार न माजवता पुल आपले प्रयोग केवळ अभिनयकौशल्याच्या बळावर यशस्वीपणे सादर करतात. केवळ वैशिष्ट्यपूर्ण हालचाली आणि आवाजातील हुकमी फेरबदल यांच्या साहाय्याने भिन्नभिन्न प्रवृत्तींची आणि स्वभावाची माणसे ते रंगमंचावर साकार करतात, त्यांच्या निरनिराळ्या लकबींचे आणि मुद्रांचे यथार्थ दर्शन घडवतात. अभिनयाच्या सामर्थ्यावर एका व्यक्तीने दोन दोन हजार प्रेक्षकांना तीन साडेतीन तास रंगमंदिरातील आपल्या आसनावर खिळवून ठेवावे हे यश केवळ विस्मयकारक आहे. मराठी रंगभूमीवर अशा प्रकारचे यश दुसऱ्या कोणा कलावंताला अद्याप लाभलेले नाही. या साऱ्या अभिनयातील बारकावाही तितकाच थक्क करणारा आहे. साधे वाहनातील गतीचे उदाहरण घ्या. मुम्बईतील घोड्याची बग्गी आणि पुण्यातील टांगा, खडखड करीत जाणारी ट्रॅम आणि संथ लयीत जाणारी टॅक्सी, जागोजाग अडत नि थांबत जाणारी बस आणि सुसाट वेगात धावणारी आगगाडी, अशा निरनिराळ्या वाहनांत बसल्यानंतर व्यक्तीच्या हालचालीवर व बोलण्यातील चढउतारावर कोणता परिणाम होईल याची विविध चित्रे पुल रंगभूमीवर मूर्तिमंत उभी करू शकतात. ही किमया सहजासहजी साधणारी नाही.

नाट्यकलेइतकीच संगीताची जाणकारी पुलंच्याजवळ आहे. वाद्यसंगीतही ते जाणतात, केवळ जाणतात एवढेच नव्हे तर गोविंदराव टेंबे यांची आठवण व्हावी अशा कुशलतेने हार्मोनियमवर त्यांची बोटे फिरतात. 'वाऱ्यावरची वरात' या प्रयोगातील एक प्रसंगात

पुल पेटीवर असे सूर सहजपणे काढतात की, काही काळ ती 'वरात' थांबली आणि पेटीचे सूरच वाऱ्यावरून येत राहिले तरी चालेल अशी दाद प्रेक्षकांच्या मनोमनी उमटते. नव्याजुन्या अनेक गायकांची 'गायनी कळा' पुलंनी आपल्या लेखांतून समजावून दिलेली आहे. डॉ. वसंतराव देशपांडे किंवा मल्लिकार्जुन मन्सूर यांसारख्या कलावंतांवर त्यांनी लिहिलेले लेख या दृष्टीने पाहण्यासारखे आहेत. कुमार गंधर्वांच्या गळ्यातून निघणाऱ्या सुरातील नितळ सच्चेपणा पुलंनी आम्हांला समजावून सांगितला आहे. शास्त्रीय संगीताच्या क्षेत्रामध्ये कुमारांनी काही नवी दिशा शोधली आहे ही गोष्ट आता मान्य झाली आहे. हे नावीन्य आरंभी हेरण्याचे चातुर्य ज्या चार-दोनच व्यक्तींनी दाखवले त्यामध्ये पुल हे एक आहेत. त्या त्या कलेतील आनंद जाणीवपूर्वक कसा लुटावा हे सर्वसामान्य जिज्ञासू रसिकाला समीक्षकामुळे समजते. पुलंनी हे वाटाड्याचे काम फार समर्थपणाने केलेले आहे. हे सारे करीत असताना त्यांनी कोणत्याही विशिष्ट गायकीचा अभिनिवेश धरलेला नाही. संगीताच्या साधनेमध्ये भिन्नभिन्न वाटा असू शकतात आणि त्या त्या वाटेने गेल्यावर निरनिराळ्या प्रकारचा पण तितकाच विलोभनीय आनंद आपणाला मिळू शकतो अशी त्यांची धारणा आहे. त्यामुळे आजच्या पिढीतील कुमार गंधर्वांच्या संबंधी ते जितक्या उमाळ्याने लिहितात, तितक्याच उत्कटतेने मागच्या पिढीतील बालगंधर्वांच्या रंगभूमीवरील गायकीबद्दल ते लिहू शकतात.

भिन्नभिन्न कलांची ही जाणकारी पुलंना त्या त्या कलांच्या विशिष्ट सौंदर्याचे आकलन करताना उपयोगी पडते. साहित्यिकाची प्रतिभा त्यांच्या ठिकाणी आहे, त्यामुळे संगीताचा आनंद कसा घ्यावा हे केवळ संगीत जाणणाऱ्या गायकाहून अधिक परिणामकारकपणे त्यांना सांगता येते. तंबोऱ्याच्या तारा जुळवणे हे प्रियाराधन करण्यासारखे आहे, असे ते चटकन लिहून जातात. याच्या उलट संगीत किंवा अभिनय या क्षेत्रांतील आपली जाणकारी ते साहित्याच्या कामी लावू शकतात. गडकरीदर्शनाचा त्यांचा कार्यक्रम या दृष्टीने सहज आठवण्यासारखा आहे. अशीच आणखीही उदाहरणे आहेत. 'सेंटर फॉर इंडियन रायटर्स' या संस्थेच्या वतीने फर्ग्युसन महाविद्यालयामध्ये केशवसुत आणि पु. शि. रेगे यांच्या काही कविता पुलंनी काही दिवसांपूर्वी वाचून दाखवल्या. ती ती कविता वाचण्याची विशिष्ट ढब, स्वरातील चढउतार आणि मुद्रेवरील आविर्भाव यांच्या साहाय्याने त्यांनी केशवसुतांच्या कवितांतील आवेश आणि गांभीर्य जितक्या परिणामकारकपणे व्यक्त केले, तितक्याच प्रभावीपणाने पु. शि. रेगे यांच्या कवितांतील भावनांचा नाजूकपणा, त्यांच्या आंदोलनातील सूक्ष्मता आणि आशयातील आर्तता श्रोत्यांच्या हृदयापर्यंत पोचवली. अर्थात साहित्य, संगीत आणि अभिनय अशा तीनही कलांमध्ये ज्यांना गती आहे अशा पुलंनी हे साधले यात नवल वाटण्यासारखे काही नाही, ही गोष्ट त्यांना सहजसाध्य होती.

कलात्मक सौंदर्याचे विश्व हे कित्येक वेळा कल्पनेच्या राज्यातील असते, तसेच काही वेळा ते केवळ ऐंद्रिय संवेदनांच्या आकलनात सामावलेले असते. वास्तव जीवनाशी त्याचा

अनुक्रमणिका

प्रत्यक्ष असा काही संबंध नसतो, ते सारे विश्व जणू वेगळेच असते. स्वरांचा रमणीय मेळ किंवा फुलांचा सुंदर गुच्छ अशा गोष्टींचा संबंध प्रत्यक्ष जीवनाशी असला तरी तो फार फार थोडा असतो. पुलंची संवेदनशक्ती ही सौंदर्याच्या अशा कल्पनागम्य किंवा केवळ विशुद्ध संवेदनांनी बनणाऱ्या विश्वात रममाण होऊ शकते, पण त्याचबरोबर व्यवहारातील वास्तवतेचा रोकडा स्पर्शही त्यांना तितक्याच उत्कटतेने जाणवतो आणि जणू सुंदरतेचेच एक वेगळे रूप घेऊन प्रतीत होतो. अमेरिकेत प्रवास करीत असताना त्यांनी पाहिलेल्या कुठल्या तरी छोट्या गावाची एकंदर रचना भोवतालच्या टेकड्यांच्या रांगा, भूप्रदेशाचा चढउतार आणि निसर्गातील वनश्री यांच्याशी सुसंवाद साधणारी कशी आहे हे ते रसिकपणाने वर्णन करतात, त्याचप्रमाणे भौतिक दृष्टीने अतिशय समृद्ध अशा अमेरिकेतील जीवनाची एक प्रकारे 'उद्ध्वस्त धर्मशाळा' कशी होत आहे याचे भेदक चित्रही ते उभे करतात. शांतिनिकेतनला जाऊन राहिले तर रवींद्रांचे संगीत व त्यांची गीतांजली या दोहोंचा आस्वाद ते घेतात, त्याचबरोबर बंगालमध्ये गेल्या शतकात घडून आलेल्या प्रबोधनाचा मागोवाही घेऊ पाहतात. निखळ सौंदर्याचे जग पुलंच्या मनाला वेध लावू शकते, विचारांचे गंभीर विश्वही त्यांना आकर्षित करते आणि त्यामुळेच त्यांचे मन अमेरिकेतील विस्कटत चाललेल्या जीवनाचा किंवा बंगालमधील प्रबोधनाचा अन्वयार्थ लावू पाहते.

ही प्रक्रिया येथेच थांबत नाही. वास्तवातील घडामोडींच्या अशा चिंतनातून आणि विचारांच्या अशा आकलनातून एकूण जीवनाचाच काही अर्थ माणसाच्या मनात उभा राहू लागतो आणि नकळत काही मूल्ये अंतःकरणात स्थिर होतात. या मूल्यांचे प्रतिबिंब आचारात उमटले तर त्या व्यक्तीच्या जीवनाला एक निराळीच समृद्धी प्राप्त होते. अशा समृद्धीचाही काही प्रत्यय पुलंच्या ठिकाणी येतो. विदर्भ साहित्यसंघाच्या निवडणुकीत ग्रेस कवीवर काही अन्याय झाला अशी समजूत झाली तर त्याबद्दलची परखड प्रतिक्रिया ते 'महाराष्ट्र टाइम्स' मधून व्यक्त करतात, हा त्या समृद्धीचा एक सहज दिसणारा परिणाम म्हणता येईल. भूदानयज्ञासारखी प्रतिभाशाली कल्पना सत्यसृष्टीत उतरण्याची धडपड करणाऱ्या आचार्य विनोबाजींच्या पदयात्रेत ते काही काल सहभागी होतात आणि जयप्रकाशांच्या बिहारमधील आंदोलनाने क्षणकाल प्रभावित होऊन, भ्रष्टाचाराचे निर्मूलन व्हावयाचे असेल तर आपणांपैकी प्रत्येकाने एखादे न् एखादे व्रत घेतले पाहिजे असे एक सौम्य आवाहन ते 'माणूस' मधून करतात. हे त्या मूल्यात्मक समृद्धीचेच पुढचे आविष्कार होत. जीवनाच्या या साऱ्या रूपामध्ये पुलंना सौंदर्याचाच एक वेगळा आविष्कार जाणवतो, त्यांच्या सर्वस्पर्शी रसिकतेला जणू अविषय असा कोणताच नाही. सौंदर्य हे सदैव एक रमणीयतेचेच रूप घेऊन आपणास सामोरे येते असे ते मानीत नाहीत. जीवनात साफल्याचा कोणताच रस्ता न सापडलेल्या एखाद्या अभागी व्यक्तीच्या अबोल दुःखाचे रूप घेऊन कधी ते येते, तर कधी हास्यास्पद अशा विसंगतीचे रूप घेऊन समोर उभे राहते. दुःखितांबद्दल हृदयामध्ये जाग्या होणाऱ्या अथांग करुणेचे रूप कधी ते धारण

करते, तर कधी अन्यायाविरुद्ध सर्व सामर्थ्यानिशी उभ्या ठाकणाऱ्या ध्येयवादी पुरुषाच्या रूपाने ते अवतीर्ण होते. अवश आणि करुण, भव्य आणि उदात्त, मानवजीवनाचे कोणतेच रूप पुलंनी अव्हेरलेले नाही. सौंदर्याची ती सारी रूपे त्यांना सारखाच मोह घालीत आली आहेत. मानवजीवनातील उदात्त गोष्टीमध्ये साठवलेले सौंदर्य खऱ्याखुऱ्या उत्कटतने जाणवले तर त्याचा काही स्पर्श त्या व्यक्तीच्या जीवनालाही होऊ शकतो. पुलंच्या बाबतीत हेही घडलेले आहे. पुलंच्या कलेने त्यांना अमाप पैसा मिळवून दिला. त्यातील लाखांमध्ये मोजावी अशी रक्कम त्यांनी एका स्वतंत्र प्रतिष्ठानात गुंतवली आहे आणि व्याधिग्रस्तांचे दुःख कमी करण्यासाठी तिचा विनियोग होत राहावा अशी व्यवस्था केली आहे. कलावंतांमध्ये असे उदाहरण केवळ दुर्मिळ होय.

असे हे भिन्न भिन्न कलांतील मर्म जाणणारे, विचारांच्या प्रदेशात थोडीफार मुशाफिरी करणारे आणि अनेकांगी रसिकता असणारे पुल या महिन्यात इचलकरंजी येथे भरणाऱ्या सुवर्णमहोत्सवी साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष म्हणून नियुक्त झाले आहेत. त्यांच्या या निवडीत अनपेक्षित असे काहीच नाही. स्वतः पुलंनादेखील ही घटना मोठ्या 'अपूर्वाई'ची वाटेल असे नाही. अशा प्रकारचे अनेक मानसन्मान त्यांच्या वाट्याला यापूर्वी येऊन गेले आहेत. आयुष्याच्या ज्या रस्त्यावरून ते आजवर चालत राहिले आहेत त्या मार्गावर हा मुक्काम केव्हातरी लागणार हे सर्वजण जाणून होते. पुण्याहून आगगाडीने मुंबईस चाललेल्या प्रवाशाला वाटेत लोणावळा किंवा कर्जत हे स्टेशन लागणार हे जितके अपेक्षित आहे, तितकेच साहित्यसंमेलनाचे हे अध्यक्षपद पुलंच्या बाबतीत स्वाभाविक आहे. त्यामुळे ही निवड झाल्याची बातमी समजल्यावर आश्चर्य कोणालाच वाटले नाही, अपेक्षापूर्तीचा आनंद मात्र सर्वांना झाला. संमेलनाच्या यशाची ग्वाही पुलंच्या या निवडीमध्ये आपोआपच मिळून गेली.

अनेक अर्थांनी पुलंचे आजवरचे जीवन समृद्ध झालेले आहे. जीवनाच्या आरंभीच्या काळात त्यांनी जी काही वणवण केली असेल तीही मागे वळून पाहिल्यावर जमेचीच बाजू वाटावी असे भाग्य नंतरच्या काळात त्यांच्या वाट्याला आले आहे. आपल्या आंतरिक प्रवृत्तीशी जुळेल आणि आपल्या अंगी असलेल्या आत्मीय गुणांना वाव मिळेल, त्यांचा स्वाभाविक परिपोष होईल असा व्यवसाय लाभणे हे जीवनातील एक भाग्य आहे. पुलंना ते भाग्य लाभले आहे. आपला स्वतःचा सूर सापडलेले असे आयुष्य सहजासहजी पाहावयास मिळत नाही. महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे नुकत्याच पुण्यामध्ये झालेल्या भव्य सत्कारात पुलंनी असे उद्गार काढले की, "शब्दांमध्ये, रंगांमध्ये, सुरांमध्ये असलेले सौंदर्य जाणण्याची, त्यांतील आनंद घेण्याची कुवत ज्या शक्तीने मला दिली तिचा मी अतिशय ऋणी आहे." खरे आहे. निरनिराळ्या माध्यमांच्या द्वारा प्रकट होणारे सौंदर्य पाहावे, जाणावे, त्यांचा आस्वाद घ्यावा, यासाठी त्यांचे मन स्वभावतःच आसुसलेले होते. नियतीने त्यांच्या जीवनाची घडी अशी बसवून दिली की त्यांची ती इच्छा

बरकतीत असतो. जमिनीत पुरलेले गुप्तधन काहींना दिसते म्हणतात, अशा माणसाच्या शोधात अर्धेअधिक आयुष्य ( वाया ) घालवूनही तो आम्हाला या जन्मी अजून कुठे दिसला नाही, परंतु तुम्हाआम्हांस सहजासहजी न दिसणारे दोष फटकन ज्याला दिसतात असा विरळा माणूस मात्र विनोदी लेखकाच्या रूपाने आमच्या अवतीभोवती वावरत असतो, हे मात्र एक विदारक सत्य आहे. तो लांब राहून आमची निंदा करीत राहिला तर एका दृष्टीने बरे असते. कारण त्याचा एकतर समाचार तरी घेता येतो किंवा याचे घर शेजारी असावे, या कल्पनेचे निदान समाधान तर लाभते. पण लिहायला लागणे आणि कळायला लागणे या दोन्ही गोष्टी ज्यांच्या बाबतीत, अगदीच विद्वान टीकाकाराचा शब्द वापरायचा म्हणजे, एकसमयावच्छेदेकरून किंवा आमच्या तुमच्या भाषेत एकदमच संभवतात असा विनोदी लेखक आपल्यावर प्रेम करण्याचा बहाणा करीत आपल्या असल्यानसलेल्या टोप्या उडवायला लागला की, प्रेमाच्या राज्यात एका हाताने टाळी, सॉरी एका ओठाने चुंबन, वाजत नसल्याने आमच्या त्याने केलेल्या नरमगरम थट्टेलाही हसून साजरे राहण्याखेरीज गत्यंतरच राहत नाही. आपल्या निकटच्या आवडत्या, संबंधित माणसाच्या दोषांकडे दुर्लक्ष करावे, हा व्यवहारी माणसांचा उपजत शहाणपणा त्यांच्यात ओतायला ब्रह्मदेव क्वचितकुठे विसरतो आणि विनोदी लेखकाचा जन्म होतो. या त्याच्या छिद्रान्वेषी वृत्तीमुळेच विनोदी लेखक नोकरीत वा व्यवसायात एका ठिकाणी फार दिवस टिकत नसावा; तो टिकला असेल तर तो खरा विनोदी लेखक नव्हे असे खुशाल समजावे ! या त्याच्या व्यावसायिक अस्थिरतेचा धोका पुन्हा माणूस नावाच्या धोपटमार्गी प्राण्यालाच फार असतो ! नव्या व्यवसायाची नवी क्षितिजे त्याच्या दृष्टिक्षेपात येतात आणि पु. लं. सारख्या ' अंतरी नाना कळा ' मुळातच असल्या तर आमची दाणादाण उडते ! वाल्मीकीच्या शोकालाच जसे श्लोकत्व प्राप्त झाले तसे त्याच्या ' कळा' नाच कलेचे रूप प्राप्त होते. कळा आमच्या कला त्याची एवढेच खरे असले तरी या कळा पुत्र जन्माच्या आशेने सोसणाऱ्या मातेच्या आनंदाच्या वगैरे वगैरे जातीच्या असतात असे कुणीसे म्हटल्याचे वाचल्याचे स्मरते. ( हा कुणीसा शोधून नच सापडल्यास अस्मादिकांच्या नावावर त्याची नोंद करण्यास हरकत नसावी ! ) आपल्यासारख्याच दोषांनी युक्त असलेल्या किंवा आपल्याच दोषांना हसताहसता चुकून कुठे आत्म-प्रत्ययाचा साक्षात्कार झाला तर पुत्रजन्माच्या अपेक्षेने पुन्हा पुन्हा कळा सोसणाऱ्या मातेला आपल्याच जातीची लोकसंख्या वाढवायला आपणच कारणीभूत झाल्याचे दुःख होऊन उपरती झाल्यामुळे जसा चेहरा होता तसा याही प्रसंगी झाल्यास नवल नाही. 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव ' असा आशीर्वाद देताना ज्येष्ठ व्यक्तींचा चेहरा हसरा का असतो हे कळायला फार पावसाळे पाहावे लागतात कारण ( दुसऱ्यांच्या ) अष्टपुत्रांना सौभाग्यवती पुरवणारी हो, असाही हा आशीर्वाद असू शकतो, हे नंतर लक्षात येते !

दुसऱ्यांच्या दोषांकडे दुर्लक्ष करण्यासाठी नजर पामराची असावी लागते, काहींची तर

संसराच्या रामरगाड्यात जवळजवळ मरूनच जाते. पण जन्मतःच सारे काही पाहण्याची, ऐकण्याची, संगती शोधण्याची एक विलक्षण नजर घेऊनच काही माणसे जन्मास येतात. कुण्या आत्म्यासाठी कुठेतरी पिंड दिला जात असताना त्या पिंडाच्या रोखाने कुठल्या तरी अज्ञात कावळ्याने झेप का घ्यावी ? आणि समोर अन्नाचा गोळा ठेवला असता त्याकडे तासनतास ढुंकूनही न पाहता त्याने त्या मृतात्म्याच्या जिवंत समंधांच्या, नव्हे संबंधियांच्या, पोटांत गोळा का उठवावा ? आपल्या मुलाची नजर तीव्र व्हावी म्हणून आया कावळ्याच्या अंड्यांच्या शोधात असतात असे म्हणतात. त्यापासून तयार केलेल्या काजळाने आपल्या ' बाळा 'चे डोळे कौतुकाने त्या माखतात. परंतु पुरुषी नजरेने बायकांचा क्षणोक्षणी उपहास करणाऱ्या विनोदी लेखकाच्या वाट्याला 'मेऽऽल्याची नजरच कावळ्याची ' असे अपूर्वाईचे कौतुक येते !

ह्या कौतुकघेण्या व काज(व)ळभरल्या नजरेने हा लेखक सावधपणाने वावरायला लागतो तेव्हा औचित्यविसंगतीचे नमुने त्याला ठायीठायी दिसायला लागतात आणि विनोदाचा कलि नलाच्या न भिजलेल्या पावलांतून शिरलेल्या कलीसारखा त्याच्या डोक्यात शिरतो. हा विनोदाचा कली आहे हे लक्षात घेण्यासारखे असते. केतकीच्या गर्भात लपलेल्या सर्पासारखे फाजील विनयाच्या आत दडलेले ढोंग दिसल्यानंतर थोर महात्म्यांच्या ' गोपनीयां 'ची वाच्यता करू नये, या सावरकरी महामंत्राच्या तो स्वतःला वाराही लागू देत नाही, वा स्वतःशी फाजील कठोर होण्याच्या प्रकारातील सूक्ष्म अहंकाराच्या दर्शनाने अशा व्यक्तीबद्दल चिपळूणकरी आदराच्या भावनेलाही तो बळी पडत नाही. अशा वेळी विनोदाचा आश्रय करून तो सत्वनिष्ठ नळाच्याही तोंडचे पाणी पळविण्यास कमी करीत नाही, तेथे इतर अल्तूफाल्तू येरूंची काय कथा !

विनोदाचा कलि डोक्यात शिरला की, त्यामुळे ज्याची फजिती करावयाची अशा व्यक्तीची सत्त्वपरीक्षा होऊन त्या दिव्यामुळे ती व्यक्ती उजळून निघते. ही दृष्टी अर्थातच उपहासाची असते. तिच्यापुढे दोषरूप कलि निष्प्रभ होतो आणि नलाच्या श्रेष्ठत्वाचे भान येते. याउलट केवळ दोषरूप कलीचेच थैमान सुरू होऊन विनोदाच्या मान्यात सापडून संबंधित व्यक्ती घायाळ होते, तेथे उपरोधाचे राज्य सुरू होते. हा उपरोध राजकिय क्षेत्रात त्याच्या दाहकतेमुळे व गनिमी काव्याच्या तंत्रामुळे मोठा प्रभावी ठरतो.

मराठीतला अव्वल दर्जाचा विनोद या उपरोधाच्या वाटेने खुल्ला नाही, आणि जो काही थोडाबहुत खुलला तो बदलत्या राजकारणाच्या झुळकीने केव्हाच सुकून गेला. त्यातल्या गूढोक्तीमुळे त्याची आस्वाद्यक्षमता कमी होऊन त्याची वाताहतच फार झाली.

सुदैवाने गालीकुचाळीच्या, व्यक्तिनिंदेच्या वाट्याला न जाता शेकडो वर्षांच्या रूढीच्या वातावरणाने दगडासारख्या घट्ट बनलेल्या सनातनी समाजावर विनोदाची संतत धार धरून या दगडाला मऊ बनविण्याचे कार्य कोल्हटकरांपासून अनेक लेखकांनी सातत्याने केले आहे. विनोदपीठाचे शंकराचार्य म्हणून श्रीपाद कृष्णांचे स्थान अबाधित असले

असला तरी स्वतः लेखक आणि हा त्याचा 'मी' यांमध्ये नेहमी बरीचशी गफलत होते. काल्पनिक स्वरूपातला 'असा मी असा मी' मधला किंवा 'बटाट्याच्या चाळी'तला 'मी' आणि प्रत्यक्षातला 'गणगोत' वा 'अपूर्वाई', 'पूर्वरंग' यातला 'मी' यांतल्या शैलीच्या दृष्टीने आविष्कारात जो मूलभूत भेद असायला हवा तसा तो लेखक कुठे ठेवीतच नाही. या दोन्ही प्रकारांतला 'मी' म्हणजे स्वतःकडे मुद्दाम वेड पांघरून बावळटपणा घेणारा, 'बायको' यां संस्थेची सदैव थट्टा करणारा असाच राहतो. दोन्हीकडे तीच अतिशयोक्ती, तशीच व्यंगपूर्ण मांडणी, तोच अतिरिक्त कल्पनाविलास, तशीच मायावी साखरपेरणी आणि कौतुकयुक्त थट्टा! 'व्यक्ती आणि वल्ली' मधल्या व्यक्ती आणि 'गणगोत' मधल्या व्यक्ती यांमध्येही काल्पनिक वा प्रत्यक्ष यांची अशी काही गमतीची सरमेसळ होते की, काल्पनिक व्यक्ती या प्रत्यक्षापेक्षाही प्रत्यक्ष वाटतात आणि प्रत्यक्ष नात्यागोत्याच्या व्यक्तींच्या चित्रणातील विनोदी लेखनशैलीमुळे काहींवेळा ती काल्पनिक स्वरूपातली वाटायला लागतात.

असे होण्याचे कारण, लेखकाने विनोदाचा आश्रय केवळ हास्यरसनिर्मितीसाठी न करता या माध्यमातून आपल्या अवतीभोवतीच्या जगाचे मूल्यात्मक दृष्टीने चित्र करण्यासाठी घेतला हेच प्रामुख्याने असते. विनोद हा जीवनाकडे पाहण्याचा एक दृष्टिकोण असतो आणि विनोदनिर्मितीसाठी ज्या प्रकारच्या वृत्तीचा पु. ल. देशपांडे यांनी एकदा स्वीकार केला, त्याच वृत्तीने त्यांचे सर्व प्रकारचे लेखन झालेले आढळते. त्यामुळे कोणत्याही वाङ्मयप्रकाराचा त्यांनी स्वीकार केला तरी त्यांचे लेखन 'विनोदी' या एकच व्यापक अशा होल्डालमध्ये सामावून जाते आणि त्यांनी वापरलेल्या निरनिराळ्या वाङ्मयप्रकारांतील पृथगात्मतेच्या सीमारेषा पुसून जातात.

विनोदी लेखन सदैव उत्फूर्त असते आणि विडंबन हा बिनभांडवली धंदा असतो, अशी एक विलक्षण चुकीची समजूत कित्येकांच्या मनामध्ये रुतून बसली असते. आपल्या प्रत्येक विनोदी लेखासाठी आपल्या डोळ्यातून टिपे गाळावी लागली आहेत, अशा अर्थाचे उद्गार कोल्हटकरांनी एके ठिकाणी काढले आहेत. विनोदी लेखकाला कराव्या लागणाऱ्या तपश्चर्येशी त्यातून जाणीव होते. सातत्याने विनोदी लेखन करणाऱ्या देशपांड्यांचे लेखन आज तुलनेने खूपच आहे. खूप लिहूनही त्यांनी आपल्या लेखनाला सातत्याने एक विशिष्ट पातळी ठेवण्यात यश मिळविले आहे. त्यासाठी त्यांना कराव्या लागणाऱ्या तपश्चर्येची व परिश्रमांची जाणीव त्यांचे लेख वाचताना आल्याशिवाय राहत नाही. एखाद्या विषयाचा पाठपुरावा सातत्याने करून दमदारपणाने त्याचे नितांतसुंदर शिल्प ते घडवीत राहतात. कल्पकतेच्या अभावाने त्यांच्या लेखातील काही भाग कुठे कमीउणा झाला आहे, उतरला आहे असे कधी होत नाही. शब्दांच्या अंतरंगांचा वेध घेत, आपण निवडलेल्या विषयाभोवती रुंजी घालीत आणि कोटित्वाच्या अनेक प्रकारांनी वाचकांना दिपवीत पल्लेदारपणाने ते विषयाचा आणि वाचकाच्या मनाचा एकदमच कब्जा

घेतात. सदैव चमकदार खेळ करणाऱ्या आणि क्रीडांगणावर असेपर्यंत स्वतःकडे लक्ष खेचून घेणाऱ्या क्रिकेटपटूप्रमाणे त्यांच्या प्रतिभेचा हा विलास असतो आणि अधूनमधून मारलेल्या चौकार षट्कारांच्या फटक्यांप्रमाणे कोटित्वाचा अखंड विलास ते साधीत राहतात. कोटित्व हीच मुळी कल्पनाविलासाची एक बौद्धिक लीला असते. तिच्यामध्ये काही वेळा लेखक वाहून जातो. परंतु हा विलास किती प्रकारच्या श्रुतसंदर्भांनी देशपांड्यांच्या लेखनात नटलेला असतो हे पाहण्यासारखे आहे. या विलासाने मन खिळून टाकले तरी त्यांच्या विशिष्ट लकबींचा, विशिष्ट आवडीनिवडींचाच ते सातत्याने उपयोग करीत राहतात. आजोबा आजींची हृद्य चित्रे रंगविणारे पु. ल. आपल्या खाद्यजीवनाचा आलेख रंगविताना, सहजगत्या ' हवे ते हवे त्यावेळी आणि हवे तितके खाऊ न देणारी ती आई ' अशी आईची जराशी कठोर (कारण सत्य म्हणून) व्याख्या करतात, किंवा बायकोच्या हातचे बाहुले असलेल्या पतिराजांचा बाहेरचा उसना पराक्रम रंगवून हटकून हसविण्याची एकही संधी न सोडणाऱ्या या लेखकाची खोलवरची मनोगते शोधायला फ्राइडची काही आवश्यता नाही.

त्यांच्या जिव्हाळ्यातील विषयांतही डावे उजवे कळायला वेळ लागत नाही. ' तुझे आहे तुजपाशी ' तील जीवनसन्मुख वृत्तीचे अर्थगांभीर्य आणि जीवनविन्मुख अवडंबरातील अर्थशून्यता यांचे मनोहारी द्वंद्व उभे करताना प्रत्यक्षातील काही व्यक्तींच्या वैशिष्ट्यांचा आरोप नाटकातील व्यक्तिचित्रणांवर त्यांच्या नेहमीच्या शैलीत केला गेल्यामुळे अगदी जवळपास वावरलेल्या दोन व्यक्तींमधील आवडनिवड स्पष्ट होत गेली आणि काकाजी-वरच्या लोभामुळे आचार्यांचा बळी दिला गेला. तीव्र विडंबनामुळे धक्का पोचलेले देशपांडे यांच्या लेखातील हे टोकाचे उदाहरण मानावे लागेल.

तरल कल्पनाविलास आणि वैचारिक भूमिका यांमुळे देशपांड्यांच्या अवलोकन क्षेत्रां-तील अनेक प्रकारची विश्वे मध्यमवर्गीय महाराष्ट्रीयांच्या तुलनेने नाट्यपूर्ण स्वरूप धारण करून अवतरतात. सुरुवातीची कौतुकाची नवलाईची भावना ओसरून मूल्यभावनेने लेखक त्याकडे पाहावयास लागतो तेव्हा या तुलनात्मक नजरेने दुहेरी कार्य साधते. युरोप-अमेरिकेचे, आशिया खंडातील नव्या संस्कृतीचे, नव्या जगाचे दर्शन घेत असताना लेखकाच्या मनासमोर सदैव महाराष्ट्रातला मध्यमवर्ग तरळत जातो आणि तुलनेने त्याच्या गुण-दोषांचे माप त्याच्या पदरात टाकीत टाकीत त्याचे अनुभवविश्व विस्तारीत आणि त्याला नवा अर्थ देत त्याचा विलास चालू राहतो. कौतुक, कुतूहल संपल्यानंतर, त्या पोटी करावयाच्या विडंबनाची हौस भागल्यानंतर तो वैचारिक भूमिकेने त्याचे विदारक विश्लेषण करू पाहतो. ' एक वेपत्ता देश ', ' एक शून्य मी ' अशा अलीकडच्या लेखां-मध्ये ही त्याची वाढती प्रवृत्ती लक्षात येते.

या प्रकारामध्ये नेहमीच एक धोका असतो. अशा प्रकारच्या वैचारिक लेखांची चाल गंभीर ठेवल्याने त्याचा होणारा परिणाम आणि ती व्याजगंभीर ठेवण्याने होणारा

परिणाम यांतील फरकाकडे डोळे झाकून चालत नाही. सतत व्यंगोक्तिपूर्ण, विडंबनात्मक लिहिणाऱ्या विनोदी लेखकाचे व्याजगंभीर वा वैचारिक लेखनाकडे ' नाटकी ' म्हणून पाहण्याची एक सवयच वाचकांना लागते आणि वैचारिक दृष्टीने त्याचा परिणाम अशा-वेळी हरवून जातो. कोल्हटकरांनी आपल्या गंभीर लेखामध्ये व्याजगंभीरता येऊ दिली नाही. विनोदी लेखनाची आणि गंभीर लेखनाची चाल पूर्णपणे वेगळी ठेवून दोन्हीकडे इष्ट तो परिणाम साधण्यात त्यांची लेखणी कुठेही उणी पडली नाही.

पु. ल. देशपांडे यांना ते कितपत साधते हे पाहावयाचे आहे!

## साभार पोच

**हिंदु-धर्म संस्कृती मंदिर प्रकाशन** : श्री. प्र. मु. सकदेव. कार्यवाह हिंदुधर्म संस्कृति मंदिर, इंदिरा निवास. धंतोली. नागपूर १२. १. शिवरायाचे आठवावे रूप : ( काव्य ) श्री. सुरेश देशपांडे, पृ. ६९ किं. ३ रु.

**साधना प्रकाशन** : श्री. सुरेश शंकर पटवर्धन साधना प्रकाशन १७२, द. सदर बाजार सोलापूर १. १. तीव्र होता पाठमोरी : ( काव्यसंग्रह ) शंकर गोविंद पटवर्धन पृ. ४५ किं. ३ रु.

**ओज प्रकाशन** : सौ. अरुंधति हेडा, ओज प्रकाशन, राजन निवास रुक्मिणी नगर, अमरावती १. महानुभावदर्शन : पुरुषोत्तम नागपुरे, पृ. १७० किं ८ रु.

**उषाज्योति प्रकाशन** : सौ. लीलावती अनंत जगताप. उषा ज्योति प्रकाशन अंबाजीराव बंगला. न्यू उस्मानपुरा, औरंगाबाद. १. ' इये मराठीचिये नगरी ' गांधीजी : प्रा. अनंतराव जगताप, पृ. २२३ किं. ८ रु,

**सविता प्रकाशन** : श्री. देवदास ह. देशमुख. अंजनगाव सुर्जी १. उद्रेक. ( काव्यसंग्रह ) : श्री. राम देशमुख, पृ. ४८ किं. ३ रु.

**अनंत प्रकाशन** : श्री. क. मा. साळुंखे; ग्रंथपाल, वि. पा. महाविद्यालय. वैजापूर १. वाटा ( काव्यसंग्रह ) श्री. ज. रा. नेवाडकर, श्री. क. मा. साळुंके, उत्तम बाबरसकर. बी. आर. वाव. पृ. २७ किं. ४ रु.

# ‘ विविधज्ञानविस्तारा’तील काव्यविचार ( १८६७-१९३७ )

## वा. ल. कुळकर्णी

नाटक आणि कथाकादंबरी यांच्यावरील विचाराच्या मानाने ‘ विस्तारा ’तील काव्य-विचाराने त्याची अधिक पाने व्यापिली आहेत. यासंबंधात असे दिसते की, ‘ विस्तार-कर्ते ’ हे जरी नव्या वळणाच्या कवितेपेक्षा जुन्या वळणाच्या कवितेला थोडे अधिक अनुकूल होते असे वाटत असले, इतर काव्यदोषांपेक्षा वृत्तदोष, छंददोष, शब्ददोष, व्याकरणदोष, रचनेचे शैथिल्य इत्यादींविरुद्ध त्यांचा विशेष कटाक्ष असला आणि केशव-सुतांपेक्षा त्यांना मोगरे हे एवढ्यासाठीच अधिक प्रिय असले तरी त्यांनी काव्यपरीक्षा आणि काव्यविवेचन करताना आपली वृत्ती केवळ पुराणाभिमानी ठेवलेली नव्हती; एवढेच नव्हे तर मराठी कवितेच्या प्रांतात जे नवे लेखन आपल्याबरोबर नवे प्रश्न घेऊन अवतरत होते त्याची त्या प्रश्नासह दखल घेण्याचा ‘विस्तारा ’ने सतत प्रयत्न केला आणि कवितेसंबंधीच्या नवविचारांना सतत स्थान दिले. ‘ विस्तारा ’च्या अगदी पहिल्याच वर्षाच्या पुस्तकात ‘विस्तारा ’चे संपादक रा. भि. गुंजीकर यांचा ‘ मराठी कविता ’ नावाचा लेख आहे ( जाने. १८६८ ). या लेखात ‘ मराठी कवितेच्या ध्वनीमध्ये आणि व्यवहारी भाषणाच्या ध्वनीमध्ये ’ कसा फरक पडतो ते गुंजीकरांनी उदाहरणे देऊन दाखविले आहे. हा फरक पडण्याचे त्यांच्या दृष्टीने मुख्य कारण असे की, व्यवहारामध्ये मराठी बोलताना आपण अनेकदा स्वरान्त शब्द व्यंजनान्त उच्चारतो. विशेषतः अन्त्य अकाराचा लोप होऊन अनेक शब्द व्यंजनान्त आहेत असा भास होतो. तेव्हा ‘ अशा प्रकारचे न्यून आपल्या भाषेतून काढून टाकून व्यवहारी भाषा व कवितेतील भाषा एक करण्याचा यत्न करणे ‘ अवश्य ’ कसे आहे ते ‘ विस्तार ’कर्त्यांनी स्पष्ट केले आहे. हे न्यून दूर करण्यासाठी ‘ व्यवहारातील भाषेत जसे आपण बोलतो त्याप्रमाणे कवितेत शब्द घालावेत काय ’ हा प्रश्न लेखकाने उपस्थित केला असून त्याची अत्यंत मोकळ्या मनाने सर्वांगीण चर्चा केली आहे व या अवघड प्रश्नाचा अधिक विचार विद्वज्जनांनी करावा असे लेखाच्या शेवटी सुचविले आहे. त्या काळी एका अगदी सहजासहजी लक्षात न येण्याजोग्या परंतु मराठी कवितेच्या विकासाच्या

अनुक्रमणिका

लेखापूर्वीच मोरोपंतादी पंडितकवींच्या संबंधात जी टीका-प्रतिटीका 'विस्तारा'च्या जन्मापासून 'विस्तारातू'न, 'निबंधमाले'तून व इतर नियतकालिकांतून प्रसिद्ध होत होती तिजमधूनच खरोखर कवितेला यमकाची आवश्यकता आहे काय या प्रश्नाच्या चर्चेला प्रारंभ झाला होता. कुंट्यांसारख्यांनी 'प्रासहीन कविते' ( Blank Verse ) संबंधी जे कुतूहल निर्माण केले होते त्यामुळे ह्या प्रश्नाला अधिकच खतपाणी मिळत होते. तशात केशवसुत व त्यानंतर मुख्यतः एकनाथ पांडुरंग रेंदाळकर यांनी निर्यमक कविता-लेखन मध्यंतरीच्या काळात करण्याचा प्रयत्न केला आणि निर्यमक रचनेसंबंधीच्या या वादाला विशेषच धार आली. या वादामध्ये 'विस्तारा'च्या अनेक लेखकांनी भाग घेतला. त्यांत भास्कर बहिरो महाबळ, गो. दा. पाध्ये, द. मा. कुलकर्णी, ए. पां. रेंदाळकर, वि. वि. साठे, ना. म. भिडे यांचे अभ्यासलेख विशेष लक्षणीय आहेत. या वादाला निमित्त झाले ते छोटेसे : रेंदाळकरांच्या निर्यमक कविता वाचून

कवी सारे बंधमुक्त झाले
महानंदानें वृक्षराजि डोले
फुल्ल सुमनांचे पुंज सांडतात
पौरनारीनर हार गुंफितात

ही दिंडी विष्णु विनायक साठे यांनी रचली व तिला 'धर्मविचार' मासिकाच्या संपादकांनी उचलून धरले. ह्यावरून सदर चर्चेला विशेष तोंड फुटले. 'विस्तारा'च्या ४३ व्या पुस्तकात ( १९१२ ) वर उल्लेखिलेल्या सर्व लेखकांनी लेखन केले आहे. कुलकर्णी, पाध्ये व महाबळ या तिघांनीही निर्यमक रचनेला मनःपूर्वक विरोध केला असून संपादकांनीही चर्चेचा समारोप करताना तात्यासाहेब केळकरांच्या वर उल्लेखिलेल्या लेखाचा जो निर्वाळा दिला आहे त्यावरून 'विस्तार'कर्तेही निर्यमकतेच्या विरुद्ध आहेत हे स्पष्ट होत आहे. रेंदाळकरांनी मात्र कुळकर्णी यांच्या लेखाला उत्तर देताना आपली भूमिका स्पष्ट शब्दांत मांडली आहे. ती त्या काळी 'विस्तारा'च्या बहुसंख्य वाचकांना कितपत पटली असावी याबद्दल शंका असली तरी ती रेंदाळकरांच्या द्रष्टेपणाची द्योतक असल्यामुळे आज आपणांस गौरवास्पद वाटावी अशीच आहे. ते म्हणतात, " आता, कदाचित मजसारख्या कवीच्या निर्यमक कविता वाचून त्या वाचकांस नीरस वाटत असतील. तो माझा दोष आहे. यमकाभावाचा नाही. देवाच्या दयेने मराठीचा लवकरच एखादा राष्ट्रीय कवी निर्माण होईल, आणि त्याच्या निर्यमक कविताही लोक मोठ्या प्रेमाने वाचून माना डोलवितील. अशा भावी कवीचा मार्ग सोपा व्हावा म्हणून मजसारख्या कवीची खडी रस्त्यावर पसरावी लागते." ह्याच वेळी स्वातंत्र्यवीर सावरकर आपल्या वैनायक वृत्ताला जन्म देत होते याची कल्पना रेंदाळकरांना होती की नव्हती याची कल्पना नाही; परंतु रेंदाळकरांच्या मुखाने जणू भविष्यवाणीच बोलत होती असे वाटल्यावाचून राहत

नाही. निर्यमक कवितेच्या 'विस्तारा'तील आक्षेपकांनी अशीही भीती व्यक्त केलेली आढळते की, निर्यमक कवितेच्या मागोमाग छंदांचा अडथळा दूर करणारी कविता डोके वर काढणार नाही कशावरून ! सदर आक्षेपकांची ही 'भीती' काळाने (सुदैवाने) खरी ठरवली हे आपण पाहतोच. परंतु या वादात निर्यमकतेच्या बाजूने खंबीरपणे उभे राहिले ते 'विस्तारा'चे समर्थ समीक्षक ना. म. भिडे हे. आपल्या 'प्राचीन व अर्वाचीन कविता' या सुप्रसिद्ध लेखात ('विस्तार' पुस्तक ४६, वे १९१५) भिडे यांनी रेंदाळकरप्रणीत निर्यमकतेचा पुरस्कार करताना पुढील उद्गार काढले आहेत: "नुसत्या निर्यमकतेचेच्रसे काय पण उद्या सध्या प्रचलित असलेल्या छंदांचे बंधनही प्रतिबंधक भासून एखादा सोपा नवीन छंद सुरू होणार नाही हे तरी आज कोणी सांगावे ? नुकतीच एका आधुनिक मराठी कवीने इंग्रेजी धर्तीवर आवातप्रचुर कविता लिहिलेली आमचे पाहण्यात आली आहे.[1] तीच पद्धत पुढे कधी काळी सुरू होणार नाही याची आज हमी देता येणे कठीण आहे. जिवंत समाज व जिवंत भाषा यांचे प्रगती हे जर लक्षण आहे, तर ती होत असताना जुनी चाल नष्ट होईल अशी त्याबद्दल हाकाटी करण्यात अर्थ नाही." ना. म. भिडे यांचा हा लेख 'विस्तारा'च्या ज्या पुस्तकात आलेला आहे त्याच पुस्तकात श्री. ल. य. पुरोहित यांचा 'आधुनिक व जुनी आणि समयक व निर्यमक कविता' हा लेख 'विस्तारा'ने छापला असून तो निर्यमकतेचे खंडण करणारा आहे. 'विस्तारा'च्या निष्पक्षपाती धोरणाचा उत्तम प्रत्यय आपणांस ह्या निर्यमकतेसंबंधीच्या वादातही येतो.

'विस्तार'कर्त्यांना केशवसुतप्रणीत नवी कविता जरी फारशी प्रिय नसली व त्यांचे मत लेंभे-मोगरे आदी कवी हेच आदर्श काव्यलेखन करीत होते असेच असले तरी त्यांनी आपले हे मत 'विस्तारा'तील काव्यचर्चेच्या आड कधीच येऊ दिले नाही. ज्याप्रमाणे 'विस्तारा'ने वि. मो. महाजनी यांच्या 'कुसुमांजली'मधील भाषांतरित कवितांना स्थल देऊन (१८८३–१८८४) अर्वाचीन मराठी कवितेच्या मुळाशी असलेल्या नवप्रवृत्तींना एका परीने प्रत्यक्षपणे चालना दिली त्याचप्रमाणे वेळोवेळी ह्या नवप्रवृत्तीं-मागील संकल्पना ज्या अभ्यासलेखांतून स्पष्ट केल्या गेल्या त्या लेखांना स्थान देऊन आपल्या वाचकांना त्या समजावून घेण्यास मदत केली. येथे ज्या लेखाचा प्रथम उल्लेख करावासा वाटतो तो 'विस्तारा'च्या १८८८ सालच्या जानेवारी-फेब्रुवारी या जोड अंकात आलेला आहे. 'कवी, कविता आणि पद्यरचना' हे त्याचे शीर्षक असून त्याखाली लि. आ. म. (म्हणजे लिहून आलेला मजकूर) असे छापलेले असल्यामुळे तो संपादक किंवा त्यांचे साहाय्यक यांनी लिहिलेला नाही हे उघड आहे. अर्वाचीन मराठी कवितेच्या प्रारंभकाळातच हा लेख लिहिला गेला आहे हे लक्षात घेतले आणि

---

१. ही कविता कोणती व कोणाची याचा शोध लागू शकला नाही.

यात व्यक्त झालेल्या विचारांचे त्याच काळातील केशवसुतांच्या कवी व काव्य यासंबंधीच्या कवितांमधील विचारांशी असणारे लक्षणीय साम्य[1] डोळ्यापुढे आणले की त्याचे अर्वाचीन मराठी कवितेच्या इतिहासातील महत्त्वपूर्ण स्थान डोळ्यात भरते. हा लेख संपूर्णपणे उद्धृत करणे येथे अशक्य आहे; परंतु त्यातील पुढे दिलेले उतारे पुरेसे बोलके आहेत असे वाटते. "कवी कथेचा किंवा गाण्याचा कर्ता असतो म्हणून ग्रीक लोक कवीस 'कर्ता' म्हणत...कवी हा निवळ 'कर्ता' नव्हे तर त्यापेक्षाही अधिक आहे असे आढळेल. जेथे सामान्य जनास काही दिसत नाही तेथे कवीस सौंदर्य, उदात्तत्व, लीला आणि वैभव ही दिसतात म्हणून इटली देशात त्यास 'शोधक' या अर्थाचे नाव देत. इंग्लिश भाषेत बर्न्स याने 'डेझी' या नावाच्या फुलास उद्देशून काही पद्ये केली आहेत. ती इतकी रमणीय झाली आहेत की त्यायोगे त्याचे नाव सर्वांस प्रिय झाले आहे; आणि आणखी हजारो वर्षे होईल. त्या कवितेवरून दिसून येते की त्यास त्या फुलांत अनंत वस्तू सापडल्या आहेत. त्या सर्वांस एखाद्या सामान्य मनुष्याने 'डेझी' एवढेच नाव दिले असते; परंतु या कवीस त्या फुलांच्या पाकळ्यांत रत्ने–प्रेम, दया, कोमलपणा इत्यादी मनोवृत्तींस दाखविणारी रत्ने–सापडली आहेत. ती रत्ने शब्दरूप सोन्याच्या कोंदणात जडवून चिरकाल प्रकाशण्यासाठी आंग्लकवितादेवीच्या मुकुटात जणो कवीने लाविली आहेत." "खरा कवी याहूनही अधिक आहे. त्यास गुप्तवस्तू पाहणारा, भविष्यवादी आणि ईश्वरी व मानवी वस्तूंचा ज्ञाता असे म्हटले तरी साजणार आहे. 'ज्ञाता' हे नाव कवीस खरोखरच योग्य होईल. कारण मानवी अंतःकरणातील गूढ मनोवृत्तींचा आणि अत्यंत गहन मनोविकारांचा तो 'ज्ञाता' आहेच. एवढेच नव्हे तर सृष्टीमध्ये पडून राहिलेल्या अज्ञात वस्तूंचा–की ज्या वस्तू, सृष्टीचे अवलोकन करून ईश्वरविषयक ज्ञान जो सर्वांस कळवितो त्याच्याच अंतःकरणास अंशतः समजतात त्या वस्तूंचा कवी 'ज्ञाता' होय...नवीन तत्त्व कळविणे ज्या कवीच्याने होत नसेल त्याने स्तब्ध राहावे हे चांगले. सृष्टीत गुप्त राहिलेली तत्त्वे आणि सौंदर्य, त्याचप्रमाणे अनुसरण्यास सुलभ अशी शुद्ध मानवी स्वभावाची

---

१. 'प्रतिष्ठान' मासिकाच्या मार्च १९६६ च्या अंकात सदर लेख उद्धृत करून हे विचारसाम्य दाखविण्याचा प्रस्तुत लेखकाने प्रयत्न केला आहे. जिज्ञासूंनी तो अवश्य पाहावा. नी. व. भवाळकर यांनी 'विस्तारा'च्या शेवटच्या अंकाला जी लेख-सूची तयार करून जोडली आहे तिजमध्ये ह्या लेखापुढे लेखकाचे नाव 'देशपांडे' (नावाची आद्याक्षरे नाहीत) असे दिले आहे. परंतु त्यातील, बाह्य सौंदर्यापेक्षा विचारांचा जोरकसपणा व्यक्त करणारी भाषा व त्यात व्यक्त झालेले कवी आणि काव्य यासंबंधीचे विचार लक्षात घेतल्यावर हा लेख काव्यलेखनाकडे नुकत्याच वळलेल्या व कवी व त्याचे कार्य यासंबंधी विशेष चिंतन करू पाहणाऱ्या तरुण केशवसुतांचा तर नव्हे ना अशी एक पुसटशी शंका मनाला चाटून जाते.

परिपूर्णता समाजाच्या मनासमोर ठेवणे कवीचे कर्तव्य आहे." "कवी हा कर्ता, शोधक, पाहणारा व ज्ञाता आहे एवढेच नाही, परंतु तो जर 'खरा कवि' या नावास योग्य असेल तर तो 'प्रेम करणारा' पाहिजे. ईश्वरावर, बाह्य सृष्टीवर, स्त्रिया व बालके यांवर, आणि सुन्दर, शुद्ध व सत्य वस्तूंवर त्याने प्रेम केले पाहिजे; त्याच्या प्रतिभेचे मूळ प्रेम पाहिजे. त्याच्या गायनाचा विषय पुनः पुनः का होईना पण प्रेम पाहिजे. आजपावेतो जी जी मोठी काव्ये झाली त्यांचा एकच व अवश्य आधार प्रेम आहे." "परकीय इतिहासावलोकनाने कळून येते की, कवितेचे अत्यंत प्राचीन, साधे आणि मनोविकाराने रसरसलेले रूप म्हटले म्हणजे वल्कीस्वरूप (lyrical) होय. जेव्हा कवीची प्रतिभा अत्यंत शुद्ध, अनावर आणि ईश्वरीं असते तेव्हा ती या स्वरूपात अवतीर्ण होते. कवितेचे हेच प्राचीन स्वरूप चिरकाल टिकणारे आहे." या महत्त्वपूर्ण लेखातील आणखी उतारे देण्याचा मोह होतो; परंतु उद्धृत केले आहेत त्या उताऱ्यांवरूनही लेखकाची कवितेसंबंधीची भूमिका काय होती व ती केशवसुतांच्या भूमिकेशी किती मिळती-जुळती होती याची वाचकांना सहज कल्पना येण्यासारखी आहे.

'विस्तारा'ने प्रत्यक्ष नवकवितेच्या प्रकाशनाला फारसे महत्त्वाचे स्थान दिलेले नसले तरी तिच्या आगमनासाठी व स्वागतासाठी योग्य असे वैचारिक वातावरण निर्माण करण्यास निश्चित मदत केली. १८८३ साली महाजनींची 'कुसुमांजली'तील भाषांतरित कविता क्रमशः प्रसिद्ध करीत असताच 'विस्तारा'ने पांडुरंगशास्त्री पारखी यांच्या 'षड्ऋतुवर्णन' या पुस्तकाचे परीक्षण केले आहे. त्यात संस्कृत काव्यामधील सृष्टिवर्णने कशी सांकेतिक असतात हे स्पष्ट करताना 'विस्तार'कत म्हणतात, "तथापि बहुतेक संस्कृत कवींची वर्णन करण्याची रीती एकच आहे. सर्वांच्याही वर्णनात एकदा ठरून गेलेल्या गोष्टी पुनः पुनः येतात. अलंकारांचा चमत्कार मात्र प्रत्येकाच्या वर्णनात निरनिराळा. उंच उंच पहाडांचे, त्यावरील बर्फाचे, खवळलेल्या समुद्राचे वगैरे वर्णन जसे इंग्रजी कवितेत आढळते त्या प्रकारचे संस्कृत कवितेत नजरेस येत नाही. इंग्रजी कवितेतील ऋतुवर्णन स्वभावोक्तिरूप असते व संस्कृत कवितेतील ऋतुवर्णनात इतर अलंकारांची गर्दी दिसून येते." या विवेचनाचा शेवट करताना 'विस्तारा'ने म्हटले आहे, "महाराष्ट्र कवितेने इंग्रजी झगा परिधान न केला म्हणून आंग्लभौम कवितावधूची मनोहर व ऐटदार वृत्ती आपल्या अंगी आणण्यास का झटू नये हेही आम्हांस समजत नाही. आमच्या मते मराठी कवितेत अलंकारांचा किंवा संस्कृत शब्दांचा प्रयोग वाजवीपेक्षा फाजील नसावा; व तिने संस्कृत कवितेचेही अनुकरण केले पाहिजे असे नाही. इंग्रजी कवितेचे जेवढे गुण मराठी कवितेत उतरण्यासारखे आहेत तेवढे उतरण्याविषयी मराठी कविता रचणारांनी झटले पाहिजे. आमच्या मते असा कोणी प्रयत्न केल्यास त्यास यश येणार नाही असे नाही...आपल्या रीतीभातीस जुळणारे असे इंग्रजी कवितेतील विचार मराठीत उतरले पाहिजेत. ज्याप्रमाणे आपल्या मातेशी संबंध न ठेवणे अनुचित, त्याप्रमाणेच इंग्रजी

कवितेस स्पर्श केला असता आपल्यास विटाळ होईल ही वृथा भीती बाळगणेही अयोग्य होईल. आजपर्यंत संस्कृत काव्यग्रंथांची भाषांतरे किंवा संस्कृत कवितेच्या नमुन्यावर लिहिलेली मराठी काव्ये बरीच प्रसिद्ध झाली आहेत; परंतु इंग्रजी कवितेतील सौंदर्य मराठी कवितेत आणण्याचा प्रयत्न कोणी फारसा केलेला आढळत नाही. याकडे मराठी भाषेचे हितचिंतक लक्ष देतील तर बरे होईल."

'विस्तारा'ने ह्याप्रमाणे इंग्रजी भाषेतील कविता मराठी वाचकांनी आणि कवींनी अभ्यासावी, तिच्यातील सौंदर्याचा आस्वाद घ्यावा अशी सूचना अनेकदा आपल्या काव्यचर्चेमधून केली. १८९७ साली गणेश जनार्दन आगाशे यांचा 'मराठी भाषेची सांप्रतची स्थिती व तिच्या उत्कर्षाचा इतिहास' हा महत्त्वपूर्ण लेख तीन अंकांमधून प्रसिद्ध झाला आहे. त्यात इतर अनेक वाङ्मयविषयक प्रश्नांची चर्चा करीत असता 'सध्या काव्यग्रंथ कमी का' या प्रश्नाचा विचार आगाशे यांनी केला आहे व शेवटी म्हटले आहे, "वर्डस्वर्थ व तदनुयायी कवींनी इंग्रजी भाषेच्या कविसंप्रदायात जो नवीन प्रकार चालू केला तोच प्रकार पूर्वीची बंधने तोडून आमच्या इकडे घेतला पाहिजे. हे काम काही लहानसान नाही. या कामी यश येण्यास विशाल बुद्धी पाहिजे; एवढेच नाही तर जनोपहास सोसण्याचेही धैर्य अंगी असले पाहिजे. पौराणिक कथानकांची लोकांत आवड नाहीशी झाली आहे व काव्य लिहिणारांची श्रद्धाही शिथिल झाली आहे. लौकिक विषयावर लिहावे तर तशा प्रकारचे लोकोत्तर सामर्थ्य नाही. अशा स्थितीत काव्यज्योतीला ग्रहणावस्था आल्याचे आम्हांस नवल वाटत नाही." या लक्षणीय विवेचनानंतर ज्या लेखमालेकडे आपले लक्ष जाते ती नी. ब. भवाळकर यांची असून 'कविता, तिचे स्वरूप, पर्यवसान आणि अध्ययन' या नावाने ती १९०२ साली 'विस्तारा'त पाच लेखांकांतून प्रसिद्ध झालेली आहे. या लेखमालेचा पूर्वार्ध विशेष लक्षात घेण्याजोगा आहे. भवाळकरांनी 'Youth and Age'– by Coleridge, 'Philosophy of the Beautiful'–by Prof. Knight, 'Studies in Poetry and Philosophy : Wordsworth'– by Principal Sharp, 'Essays in Criticism'– by Matthew Arnold ( 1st series and 2nd series. ), 'The Idea and Aim of Poetry'– by Prof. R. Scott, 'Literary Essays' by F. W. H. Myres and R. H Hutton, 'An Essay on Dramatic Poesie'– by Dryden, 'Advancement of learning'– by Lord Bacon, 'Preface to Lyrical Ballads' – by William Wordsworth, 'Poetics'– by Aristotle, 'Defence of Poetry'– by Shelly, 'Studies in Literature'– by John Morley, 'Transcripts and Studies', 'The Interpretation of Literature'– by Prof. E. Dowden, 'Literary Studies : Wordsworth, Tennyson and Browning or Pure, Ornate and Grotesque Arts in English Potry'

–by Walter Bagehot या ग्रंथांचा व ग्रंथकारांचा आपल्या निबंधात केवळ उल्लेख केलेला नाही तर काही ठिकाणी आपण या ग्रंथकारांच्या लेखनाचा अनुवाद करीत आहोत असे स्पष्ट म्हटले आहे. वर उल्लेखिलेले समीक्षक व त्यांचे वाङ्मयचर्चात्मक लेखन भवाळकरांनी वाचलेले आहे, ते सर्व त्यांना लक्षात घेण्याजोगे वाटत आहे व त्याचा परिचय 'विस्तारा'च्या वाचकास करून देणे अगत्याचे आहे असे वाटल्यावरून ते ही लेखमाला लिहीत आहेत हे ती वाचीत असता जाणवल्याखेरीज राहात नाही. ही लेखमाला केशवसुत, रे. टिळक, तांबे इत्यादींचे काव्यलेखन ज्या काळात चालू होते त्याच काळात लिहिली जात होती ही गोष्ट आपण नजरेआड करू शकत नाही. ती लिहिणारा लेखक संस्कृत साहित्यशास्त्राशी परिचित आहे; एवढेच नव्हे तर संस्कृतमधील रसविचार, रीतिविचार इत्यादींची पाश्चात्त्य काव्यविचाराशी सांगड घालण्याचा तो प्रयत्न करीत आहे याची साक्ष निबंधात–विशेषतः त्याच्या उत्तरार्धात आपणांस पटल्यावाचून राहात नाही. या दृष्टीने त्याने वैदर्भी, गौडी इत्यादी रीतींची Pure Ornate Grotesque या कल्पनांशी घातलेली सांगड लक्षात घेण्याजोगी आहे; परंतु ऐतिहासिक दृष्ट्या या लेखमालेतील कवितेच्या स्वरूपासंबंधीचे विवेचन मला विशेष महत्त्वाचे वाटते. त्या मानाने कवितेचे 'पर्यवसान' व 'अध्ययन' यासंबंधीचे विवेचन काव्यप्रकृतीवर तितकासा नवा प्रकाश टाकण्याजोगे उतरलेले नाही. ते थोडेसे सरधोपट व पारंपरिक कल्पनांना पोषक असे आहे. परंतु कवितेचे स्वरूप, तिला जन्म देणाऱ्या प्रतिभेची कार्यपद्धती यांसंबंधी केलेले विवेचन तत्कालीन काव्यचर्चेचे एकंदर स्वरूप लक्षात घेता वेगळे आहे. येथे मी सदर विवेचनातील केवळ काही विधाने उद्धृत करीत आहे. त्यावरून सदर विवेचनाच्या स्वरूपाची थोडीफार कल्पना येईल : "कविहृदय नुसते रम्य असल्याने कार्यभाग उरकत नाही. याशिवाय आणखी एक अग्न्युत्पादक मंथनदंड–काव्यात्मा शोषण करून घेऊन त्याचे कवितारूपाने चिरस्थायी स्फटिक पाडणारी एक रसायनशक्ती– साध्य असावा लागतो. आणि याला साहित्यकार 'प्रतिभा' असे म्हणतात. कविता ही अत्यनुरागप्रसवा आहे, हा ईश्वरी प्रेरणेचा कंटरव आहे, ही स्वैर व निगूढ पवनाने प्रज्वलित होणारी ज्वाला आहे; आणि तो उन्माद, तो प्रवाह आणि ती प्रेरणा ईश्वरदत्त प्रतिभा होय", "कविता ही चिरयौवना देवता आहे. हिच्या लीला, विलास, शृंगार सदैव नवे व कालानुरूप असतात.", "ईश्वरविषयक विचार, बाह्यसृष्टीची प्रतिकृती, मनुष्याच्या अनेक व्यापारांची व प्रवृत्तींची पारख आणि मनाच्या विविध व संकीर्ण अवस्थांचे वर्णन या चार गोष्टींशी साधारणतः कवितेचा परोक्ष किंवा अपरोक्ष असा संबंध असतो.", "सृष्टीच्या बाह्यरचनेत गूढार्थ भरलेला आहे; आणि हा साधारणतः जनसमाजाला न समजणारा गूढ अर्थ प्रकाशित करून मनास रिझवेसे त्याचे स्वरूप जगापुढे मांडणे हे (पाश्चात्त्य साहित्यकारांच्या मते) कवीचे कर्तव्य आहे," "प्रतिभाशक्ती रसज्ञता (taste) आणि चेतना

( sensibility ) या दोन मानसिक शक्तींच्या संयोगापासून झाली आहे. रसज्ञता ही बुद्धिविषयक आहे आणि चेतना ही विशेषतः विकारविशिष्ट आहे.", " ही मर्मज्ञता जिला प्रिन्सिपल शार्प The Vital Soul असे म्हणतात, ती नुसती बुद्धिविषयक, विकारप्रचुर अथवा कल्पनामय नसून त्यात तिहींचे संमेलन होते. या सर्वांचा कवीच्या मनावर सारख्याच तीव्रतेने संस्कार घडतो, आणि त्यामुळे कवीची दृष्टी वस्तुतः पदार्थांच्या बाह्य स्वरूपाकडे न झुकता त्यांचे अंतरंग निरखून सारांश ग्रहण करते आणि आजमितीस जगाच्या दृष्टीआड असलेल्या किंवा संशयावृत्त गुणधर्मविशेषाचे ती विवरण करते. ", " बाह्यसृष्टीतल्या लुप्त किंवा अज्ञात गोष्टींचा उलगडा लावणे, व्यवहारात प्रचलित असलेल्या वस्तूंचे नवे व रम्यतर स्वरूप लोकांपुढे मांडणे, त्यातील नवी अंगे स्पष्ट करून परस्परसंबंध वाढविणे, आणि मनुष्याच्या अन्तःकरणात सृष्टिसौंदर्य निरखण्याची व त्यापासून आल्हाद पावण्याची लालसा-भावना उत्पन्न करून ती वृद्धिंगत करणे, तसेच सात्त्विक आणि नैतिक सृष्टीत यावत्कालपर्यंत उपेक्षित किंवा अदृष्ट असलेल्या सत्यबीजाचे प्रवर्तन करणे; हृदयस्थ वृत्तींना उदात्त व गंभीर विषय स्फुरविणाऱ्या वस्तूंची ओळख पटवून तद्विषयक गोडी लावणे; पदार्थमात्रांच्या बाह्यविकृतींना झिडकारून मूलतत्त्व गाठण्याबद्दलची मनात जिज्ञासा व शोधकता रुजविणे, आपल्या मनोविकारांना शुद्ध, सत्य आणि उदात्त वळण देऊन काळाचा किंवा प्रसंगविशेषाचा तडाखा चुकवून चिरकालीन शाश्वतीकडे मनाचा ओढा लावणे, आणि विषयपटलावृत पार्थिव वस्तूंतले शाश्वत बीज–अन्तर्भूत असलेले अक्षय्य तेज–अन्तर्यामी प्रगट करणे हे महत्कार्य, भाषेची शाश्वती आहे तोपर्यंत निःसंदेह महाकवींच्या हातून होईल. " हे उतारे आणखी देता येणे शक्य आहे; परंतु त्याची आवश्यकता नाही. भवाळकर हे आंग्ल समीक्षकांच्या विचारांचा मराठीत अनुवाद करीत असल्यामुळे त्यांच्या विवेचनात भाषेची सफाई नाही; परंतु त्यांना जी मते पटली आहेत व म्हणूनच ज्यांचा ते अनुवाद करीत आहेत ती केशवसुतांच्या कवी आणि काव्य यासंबंधीच्या कवितांमधून व्यक्त होणाऱ्या विचारांशी मिळतीजुळती आहेत हे सहज लक्षात येण्यासारखे आहे. भवाळकरांनी लेखामध्ये वर्डस्वर्थने Lyrical Ballads या आपल्या संग्रहाला लिहिलेली प्रस्तावना वाचण्याची ' विस्तारा'-च्या वाचकांना आग्रहपूर्वक शिफारस केली आहे.

१९०८ साली ' विस्तारा'ने कृष्णाजी पांडुरंग लिमये व कृष्णाजी गोविंद किनरे यांनी संपादिलेल्या ' काव्यदोहन ' या कवितासंग्रहाचे परीक्षण केले आहे. हे परीक्षण मुख्यतः सदर संग्रहाला बाळकृष्ण अनंत भिडे यांनी जी विवेचक प्रस्तावना लिहिली आहे तिचा परामर्श घेणारे आहे. भिडे यांनी सदर प्रस्तावनेत अर्वाचीन मराठी कवितेचे प्रशंसनीय वेगळेपण तिच्या कोणकोणत्या विशेषांत आहे ते दाखविले आहे; व ह्या कवितेवर घेतल्या जाणाऱ्या आजगावकरांसारख्यांच्या आक्षेपांचे ( ' इंदुप्रकाश–मे १९०७ ) खंडन केले आहे. त्याचप्रमाणे ह्या प्रस्तावनेत भिडे यांनी काव्य, चित्र, शिल्प व नाट्य यांच्यातील

साम्यभेद स्पष्ट केले असून काव्य ही कला इतर कलांप्रमाणेच नीतिबोधासाठी अवतरत नाही, तिचा आस्वाद घेण्यास रसिकता अंगी असावी लागते, ' काव्याचा उद्‌भव प्रबळ मनोवृत्तींत आहे व त्या प्रबळ मनोवृत्ती वाचकश्रोतृवृंदांत उसळू लावावयाच्या हे त्याचे कार्य आहे ' हे स्पष्ट केले आहे. आपल्या परीक्षणात भिडे यांचे म्हणणे उचलून धरताना ' विस्तारा'ने म्हटले आहे, " प्राचीन कवींनी प्रायः गाळलेले किंवा गौण विषयांत ढकललेले असे भाग – म्हणजे सृष्टीचे उदात्त व मनोरम स्वरूप, सृष्टीच्या अन्तरात्म्याशी मानव जीवात्म्याची तादात्म्य वृत्ती, मनुजांवर या संसारात येणाऱ्या नाना प्रसंगांनी एकाकी असताना अथवा समाजात असताना क्षुब्ध अथवा शांत होणाऱ्या मनोवृत्तींच्या नानाविध संवेदना, कल्पनेचे तरंग, स्वातंत्र्यस्पृहा, समाजोन्नती व्हावी एतदर्थ आशावंत प्रयत्न " याकडे अर्वाचीन कवींनी विशेष लक्ष दिले आहे; केशवसुतांनी ' तुतारी ' व ' कवितेचे प्रयोजन ' यासारख्या कविता लिहून कवितेची योग्यता व तिचे कार्य स्पष्ट केले आहे इत्यादी मुद्दे ' विस्तारा'ने भिडे यांच्या प्रस्तावनाधारे प्रतिपादले आहेत.

या लक्षणीय परीक्षणलेखानंतर तीनचार वर्षांनी ' विस्तारा'ने प्रो. गो. वि. तुळपुळे यांचा ' वर्डस्वर्थचे सृष्टिविषयक विचार ' ( १९१२ ) हा लेख प्रसिद्ध केला. वर्डस्वर्थचे विचार भारतीय विचारांशी कितपत मिळतेजुळते आहेत याचा सदर लेखात मुख्यतः तपशीलवार विचार केलेला असला आणि केशवसुतादी मराठी कवींनी जी निसर्ग व मानव यांचे संबंध लक्षात घेऊ पाहणारी कविता याच काळात लिहिली तिची तुळपुळे यांनी वर्डस्वर्थच्या विचारांच्या अनुषंगाने सदर लेखात दखल घेतलेली नसली तरी वर्डस्वर्थच्या कवितेकडे मराठी काव्यवाचकांचे व कवींचे लक्ष वेधण्याचे कार्य ह्या लेखाने थोडेफार साधले असेच म्हणावे लागेल. ह्याच सुमारास लक्ष्मणशास्त्री लेले यांनी कवी सुमंत यांच्या ' मौक्तिकमाला ' या काव्यसंग्रहाचे परीक्षण केले आहे ( १९१३ ). हा परीक्षणलेखही ' विस्तारा'ने केलेल्या काव्यविचाराच्या संदर्भात लक्षात घेण्याजोगा आहे. त्यात लक्ष्मणशास्त्री लेले यांनी Lyric ची वैशिष्ट्ये नमूद केली आहेत : ती पुढील होत : ( १ ) " यात एकच एक विचार किंवा प्रसंग प्रधान असतो. त्याला पोषक अशा गोष्टी कवी केव्हा केव्हा अनुषंगाने सांगतो. ( २ ) बाह्य सृष्टीतील पदार्थांविषयीच्या स्वतःच्या भावनाच मुख्यत्वेकरून यात कवी अभिव्यक्त करतो. म्हणून ते काव्य भावनाप्रधान असते. अशा दृष्टीने याला इंग्रजी वाङ्मयात Subjective Poetry असे नाव दिले आहे. याच्या उलट Objective Poetry किंवा Epic नामक काव्य होय. यात कवी बाह्य वस्तूचे यथावत वर्णन करतो, आपल्या भावनांना स्वैर विहार करू देत नाही. ( ३ ) यातील रचना आवेशयुक्त व रसभरित असून तिच्यातील शब्द कोमल, ललित, प्रसन्न व हृदयंगम असतात. ( ४ ) पद्याची चाल द्रुत किंवा द्रुत आणि विलंबित असते. ( ५ ) पद्य लघु असते. कारण त्याचा विषय एकच विचार किंवा प्रसंग असतो. " ही वैशिष्ट्ये सांगून लेलेशास्त्री

म्हणतात, "ईश्वर आणि धर्म, नीती आणि तत्त्वज्ञान, प्रेमोत्सव प्रसंग, विनोदप्रकार इत्यादी विषयांच्या अनुरोधाने इंग्रजी लिरिकल काव्याला वैचित्र्य आले आहे." लेलेशास्त्री एवढे म्हणून थांबलेले नाहीत; प्राचीन मराठी काव्यात जिला 'लिरिकल' --लेलेशास्त्री हाच शब्द योजतात त्याला मराठी प्रतिशब्द योजीत नाहीत--म्हणता येईल अशी कविता कोणती हा प्रश्न उपस्थित करून ते म्हणतात, "जुनी मराठी भक्तिपर पदे, पोवाडे, लावण्या, कटिबंध, आरत्या, अभंग, दिंड्या इत्यादी रचनाविशेष बराचसा इंग्रेजी लिरिकल काव्याच्या स्वरूपाचा आहे.' लेलेशास्त्री यांनी Lyric[1] ची नमूद केलेली वैशिष्टये बरीचशी पुस्तकी थाटाची असली व ती नमूद करताना ते केशवसुतप्रणीत मराठी कवितेचा उदाहरणादाखल फारसा उल्लेख करीत नसले तरी काव्याच्या संबंधीची विचारधारा कोणत्या दिशेने धावत होती याची या परीक्षणलेखावरून सहज कल्पना येण्यासारखी आहे. येथे आणखी एका लेखाचा उल्लेख करतो; एवढ्यासाठी की काव्याच्या प्रकृती-संबंधीच्या प्रश्नांचा विचार करतानां तो इंग्रजी समीक्षकांच्या विचारांच्या अनुषंगाने करणे इष्ट आहे हा समज हळूहळू कसा बळावत होता हे लक्षात यावे म्हणून. हा लेख म्हणजे रा. ना. ब्रह्मनाळकर यांनी कोलरिजच्या Biographia Literaria Chap. xv च्या आधारे लिहिलेला 'प्रतिभावान कवीची लक्षणे' हा निबंध होय. या निबंधात ब्रह्मनाळकरांनी कोलरिजच्या विचारांचा केलेला अनुवाद वर उद्धृत केलेल्या विचारांना पूरकच आहे. (ब्रह्मनाळकरांच्या विचारांत एक विसंगती मात्र जाणवते : त्यांचा संस्कृत व पाश्चात्त्य साहित्यविचारांशी परिचय असला, आणि इंग्रजी रोमँटिक कवि--समीक्षकांची काव्यविषयक मते ते प्रतिपादिताना दिसत असले तरी त्यांना मोगरे यांची कविता केशवसुतांच्या कवितेपेक्षा अधिक काव्यात्म वाटते, केशवसुतांची 'सतारीचे बोल' कर्कश वाटते, व तिच्यापेक्षा मोगरे यांची 'सह्याद्रि' वाचण्याची शिफारस ते वाचकांना करताना आढळतात : पाहा : 'कै. मोगरे व रे. टिळक यांच्या कवितेवरून व्यक्त होणारे अर्वाचीन मराठी काव्याचे स्वरूप '(१९१६) मोगरे यांच्या कवितेच्या संदर्भात ह. ना. आपटे आणि ब्रह्मनाळकर यांचा झालेला वाद (१९१७) लक्षात घेण्याजोगा आहे. त्यात हरिभाऊंनी मोगरे यांच्या कवितेबाबत पुढील मार्मिक विधान केले आहे : 'इंग्रजी कवींमध्ये पोपचे बरेच व टेनिसनचे कित्येक गुण मोगरे यांच्या काव्यात आढळतात. आंग्ल कवींच्या काव्यग्रंथांच्या वाचनाने आलेल्या नवीन स्फूर्तीच्या अनुषंगाने व संस्कृत कवींच्या धर्तीवर

---

१ 'लिरिक' या शब्दाला प्रतिशब्द कोणता वापरायचा याबद्दल या काळात बराच मत-भेद दिसून येतो. 'वीणाकाव्य,' 'वैणिक', 'वीणागीत,' 'भावगीत' याबरोबरच 'लहरी-काव्य' व 'तरंगकाव्य' हेही शब्द प्रतिशब्द म्हणून योजलेले आढळतात. हे शेवटचे दोन शब्द श्री. रामराव बाळकृष्ण कीर्तिकर यांनी 'वीणाकाव्य' (१९२१) या आपल्या छोट्या लेखात सुचविले आहेत.

मराठी काव्ये निर्माण होऊ लागली. या शेवटल्या कोटीतल्या काव्यात मोगरे यांच्या काव्याची प्रमुखत्वाने गणना होते. ' )

'विविधज्ञानविस्तारा'त अनेकांनी काव्यविचार केला. सर्वांनीच तो अभ्यासपूर्वक व साक्षेपी वृत्तीने केला; परंतु त्यात ना. म. भिडे यांनी केलेला काव्यविचार त्यातून व्यक्त होणाऱ्या नव्या काव्यदृष्टीमुळे विशेष लक्षणीय वाटतो. हा काव्यविचार त्यांच्या 'प्राचीन व अर्वाचीन कविता' ( १९१५ ), 'अर्वाचीन मराठी कवी व काव्ये '( 'विस्तारा'ची पन्नाशी : निबंधसंग्रह. ), 'केशवसुतांची कविता '–परीक्षण. ( म. सा.पत्रिका : १९१९ ), 'चतुर्दशपद सुनीत ' ( १९२४ ), गीति काव्य ( १९२९ ), 'भाव-गीतिकेची दोन जुळी बाळे : संगीतक व ललितक' ( १९३३ ) ह्या लेखांतून मुख्यतः व्यक्त होतो. बाळकृष्ण अनंत भिडे ह्यांनीही 'विस्तारा 'त भरपूर काव्यविचार केला आहे. त्याचा आपण यथा-काल परामर्श घेणारच आहोत; परंतु ना. म. भिडे यांची जुन्या व नव्या मराठी कवींकडे पाहण्याची जी सारखीच बरीच अचूक काव्यदृष्टी दिसते तशी बा. अ. भिडे यांच्या काव्य-समीक्षात्मक लेखनात दिसत नाही. आपल्या 'प्राचीन व अर्वाचीन कविता ' या लेखनात ना. म. भिडे यांनी तुकारामाच्या कवितेसंबंधी केलेले विवेचन आपले लक्ष प्रथम वेधून घेते. 'दासबोधा 'ला काव्य म्हणण्यापेक्षा 'प्रबंध ' म्हणणे अधिक यथार्थ होईल असा अभिप्राय देऊन भिडे म्हणतात, 'तुकाराम ही व्यक्ती व त्याची कविता ही दोन्हीही एकच होत. ज्ञानेश्वर व मुक्तेश्वर या व्यक्तींपासून त्यांची कविता वेगळी होऊ शकेल, परंतु तुकारामात तसे करता येत नाही...अलंकारविहीन, जाड्याभरड्या वस्त्रांनी आच्छादित परंतु स्वतंत्र बाण्याची व प्रबल मनोवृत्तींची अशी तुकारामाची कविता कोणाचे मन आकर्षून घेणार नाही ? धन्य त्या तुकारामाची की ज्याने आपल्या कवितेचे स्वैर विहार दाबून तिला अलंकाराच्या जड पाशांनी बद्ध करून टाकले नाही. ' भिडे यांची वाङ्मय-व्यवहाराच्या स्थितिगतीची समज चांगली असल्यामुळेच मोरोपंतांच्या काळातील मराठी कवितेसंबंधी बोलताना ते म्हणतात, 'कवितेच्या अपकर्षकाली चित्रकाव्यासारखी कविता निपजू लागते असा एक साधारण ढोबळ नियम आहे...कवितेच्या उतारवयात तिचे जीवन म्हणजे एक यंत्र बनते...१८व्या शतकातील महाराष्ट्र-रमणीप्रमाणे मराठी कवितेचे आन्तरगुणांकडे दुर्लक्ष होऊन डामडौल, नीटनेटकेपणा, वगैरे बाह्य गोष्टींकडे जास्त लक्ष वेधू लागले '. याच दृष्टिकोणातून भिडे यांनी मुक्तेश्वर, श्रीधर, महिपती, राम-जोशी इत्यादी कवींच्या कवितेचे परीक्षण केलेले असल्यामुळे ते लक्षणीय उतरले आहे. अर्वाचीनांकडे वळताच केशवसुतांच्या कवितेसंबंधी बोलताना भिडे म्हणतात, 'कवितेचा विषय कितीही हलका अथवा नीरस असो, त्याने काही आकस्मिक कारणाने का होईना पण कवीच्या अंतःकरणाच्या आतील पडद्यापर्यंत प्रवास करून त्यास जर उच्च भावनांची जाणीव करून दिली तर मूळ विषयाची नीरसता तात्काल नाहीशी झालीच म्हणून समजावे. ' आपले म्हणणे स्पष्ट करण्यासाठी त्यांनी केशवसुतांच्या

'म्हातारी', 'फुलपाखरू', 'रांगोळी घालताना पाहून' या कवितांचा व टिळकांच्या 'वनवासी फुला'चा उल्लेख केला आहे. निबंधाच्या शेवटी भिडे 'वीणाकाव्या'च्या स्वरूपाकडे वळले आहेत. 'या काव्यात केवळ मनोवृत्तीशी खेळ असल्यामुळें कवीची त्या वृत्तीशी एकतानता झाल्यावाचून त्यात रसाचा परिपोष दिसून येणार नाही' असा त्यांचा अभिप्राय आहे. 'वीणाकाव्य' हे बोलीभाषेच्या जवळ कसे असते हे स्पष्ट करून भिडे अन्त्य यमकाकडे वळतात. वीणाकाव्याला यमक पूरक व पोषक ठरते या मताचे ते आहेत. "वीणाकाव्ये ही स्फुट व ललितस्वरूपी गानकाव्ये असल्यामुळे त्यास सुरेलपणादी विशेषांची आवश्यकता आहे; त्यात गतिविरोधाची भीती नाही. परंतु उद्गारकाव्य 'अंतःकरणाच्या खळाळीसरसे बाहेर पडणारे' असल्यामुळे त्यास वरील गुणांची आवश्यकता नाही. महाकाव्यात विचारांचा ओघ एकसारखा पुढे पुढे वाहावा लागत असल्यामुळे त्यात समवर्णाच्या आकांक्षेने उत्पन्न होणारा गतिविरोध खपत नाही." या उताऱ्यावरून भिडे हे वीणाकाव्य व उद्गारकाव्य म्हणजे Song आणि Pure Lyric असा भेद करीत असावेत अशी शंका येते; व ही शंका खरी असेल तर ते त्या काळाच्या मानाने बराच प्रगल्भ काव्यविचार करीत होते असे वाटते. परंतु हा विचार ते किंवा त्या काळचे इतर काव्यसमीक्षक पुढे नेत नाहीत; त्यामुळे जवळजवळ १९४० पर्यंत मराठी काव्यमीमांसक Song आणि Pure Lyric यांत गल्लत करीत राहतात. तांबे-रविकिरणमंडळाच्या काळात हा वैचारिक गोंधळ कळसाला पोचलेला दिसतो. या काळात सगळेच जण 'भावगीत' असा एकच एक शब्द उपयोजू लागतात व त्यात 'झपूर्झा'बरोबर 'डोळे हे जुल्मी गडे'चाही अंतर्भाव करतात. भिडे त्यांच्या वरील विवेचनात ही चूक टाळू पाहात आहेत असे दिसते व म्हणूनच त्यांच्या काव्यदृष्टीचे कौतुक वाटते. याच लेखात भिडे केशवसुत, रेंदाळकर, नागेश प्रणीत निर्यमकतेचा कोणत्या शब्दांत पुरस्कार करतात ते अगोदरच्याच एका परिच्छेदात दाखविले असल्यामुळे त्याची येथे पुनरुक्ती करीत नाही.

'विस्तारा'त केशवसुतांच्या कवितेचे एकच व तेही एकपानी परीक्षण आढळते (१९१९). ते भवाळकरांच्या सूत्रांवरून गं. गो. कानिटकरांचे असावे असे दिसते. केशवसुतांच्या कवितेवरील दुसरे परीक्षण ना. म. भिडे यांचे असून ते 'विस्तारा'न्तर्गत 'महाराष्ट्र–साहित्य–पत्रिके'त (म्हणजे एका अर्थाने 'विस्तारा'तच) आहे. ना. म. भिडे यांनी याखेरीज 'विस्तारा'च्या पन्नाशीनिमित्त निघालेल्या निबंधसंग्रहात जो 'अर्वाचीन मराठी कवी व काव्ये' नावाचा लेख लिहिला आहे त्यातही केशवसुतांच्या कवितेची मार्मिक चर्चा केली आहे. 'विस्तारा'तील इतर काव्यविषयक चर्चात्मक लेखांतून केशवसुतांच्या कवितेचे अधूनमधून उल्लेख आढळतात; परंतु त्यात कोठेही ना. म. भिडे यांच्याइतकी अचूक काव्यदृष्टी आढळत नाही. ना. म. भिडे यांचा परीक्षणलेख (तो 'विस्तारा'ची सोळा पाने आहे) केशवसुतांच्या कवितेच्या हरिभाऊंनी काढलेल्या

आवृत्तीच्या निमित्ताने लिहिलेला आहे. ह्या आवृत्तीपूर्वी केशवसुतांच्या काही कविता 'अभिनव काव्यमाले'च्या पहिल्या भागात समाविष्ट करण्यात आल्या होत्या. ना. म. भिडे यांनी 'वीणा' या नावाची जी काव्यमाला संपादित केली होती तिच्या पहिल्या झंकारात केशवसुतांच्या २५ कविता संग्रहित केल्या होत्या. त्या 'वीणा'तेच त्रोटक परीक्षण म्हणजे वर उल्लेखिलेले 'विस्तारा'तील कानिटकरांनी केलेले परीक्षण. भिडे यांनी आपल्या परीक्षणलेखात केशवसुत या मनाचा घेतलेला शोध बराचसा अचूक आहे. केशवसुतांच्या कवितेतून व्यक्त होणारी त्यांची जीवनदृष्टी भिडे यांनी नेमकी हेरली आहे व तिचे स्वरूप साधार स्पष्ट केले आहे. कवितेची प्रकृती व तिचे प्रयोजन यासंबंधीची केशवसुतांची भूमिका त्यांनी विशद केली असून केशवसुतांनी मराठी कवितेस कोणकोणत्या बाबतींत नवे वळण लावले ते समजावून सांगितले आहे. 'झपूर्झा,' 'हरपले श्रेय,' 'म्हातारी,' 'वातचक्र' या केशवसुतांच्या सर्वोत्तम कविता आहेत हे त्यांनी ओळखले आहे. सदर लेखात भिडे यांनी केशवसुतांच्या कवितेच्या भाषेचा केलेला विचारही लक्षणीय आहे. ही भाषा कोठे मुलायम व कोठे खडबडीत होते ते त्यांनी दाखविले आहे व त्याचबरोबर केशवसुतांनी केलेल्या निर्यमक रचनेचे रहस्यही स्पष्ट केले आहे. केशवसुतांचे आगरकर, कानिटकर, रानडे यांच्याशी असलेले वैचारिक नाते त्यांच्या लक्षात आले आहे; त्याच-प्रमाणे केशवसुतांच्या कवितेत इंग्रजी कवितेतील कल्पना, विचार इत्यादींचे प्रतिध्वनी कोठे कोठे उमटले आहेत हेही त्यांनी दाखविले आहे. शेवटी केशवसुतांचे धाकटे बंधू सीतारामपंत दामले, त्यांचे मित्र किरात, फडणीस, का. रा. मित्र, रहाळकर यांनी आपणाजवळ असलेली केशवसुतांसंबंधीची माहिती प्रसिद्ध करावी अशी त्यांना विनंती केली आहे; आणि केशवसुतांच्या कवितेप्रमाणेच कुंटे, दत्त, विनायक, माधवानुज, टेमरे यांची कविता संग्रहित होणे कसे आवश्यक आहे ते सांगितले आहे. भिडे यांनी 'विस्तारा'च्या पन्नाशीच्या निमित्ताने प्रसिद्ध झालेल्या "ग्रंथ पहिला उत्तरार्ध:" निबंधावली यातील 'अर्वाचीन मराठी कवि व काव्ये' या आपल्या लेखात अर्वाचीन काळातील तोपर्यंतच्या सर्वच कवींच्या काव्यलेखनाचा चिकित्सक परामर्श घेतला आहे. एका परीने हा लेख म्हणजे अर्वाचीन मराठी कवितेच्या वाटचालीचा अत्यंत साक्षेपाने काढलेला पहिला लक्षणीय आलेख आहे असे म्हणावयास हरकत नाही. या लेखात केलेले केशवसुतांच्या कवितेचे विश्लेषण वर उल्लेखिलेल्या परीक्षण–लेखातील विश्लेषणाला पूरक असेच आहे. जिज्ञासूंनी ते अवश्य नजरेखालून घालावे.

भिडे यांची काव्यप्रकृतीची समज जशी बरीचशी अचूक आहे तशीच परीक्षणकार म्हणून असलेली त्यांची दृष्टीही अभ्यासू व वस्तुनिष्ठ आहे. याच लेखातील एक उदाहरण देतो; मुकुंद गणपत पाटील यांच्या 'कुलकर्णी-लीलामृत' या काव्यावर त्या काळात बरीच कडक टीका झाली होती. तात्यासाहेब केळकरांनी तिच्यात पुढाकार घेतला होता. भिडे यांनी ह्या काव्यासंबंधी पुढील उद्गार काढले आहेत : "हे समग्र काव्य ओवीबद्ध आहे.

अनुक्रमणिका

राजकीय दृष्ट्या काव्य निर्माण करण्यास कर्त्याचा काहीही-हेतू असो, तिकडे दुर्लक्ष करून कलेच्या दृष्टीने पाहिले तर ते काव्य अप्रतिम साधले आहे, असेच कोणाचेही मत होईल. काव्यात कुलकर्ण्यांच्या अनेक गमतीच्या लीला वर्णिल्या आहेत. भाषापद्धती जुन्या वळणाची योजली असून जागोजाग भाविकपणाचा आविर्भाव आणला आहे. काव्यातील विशेषणे साभिप्राय व सयुक्तिक आहेत. अशा थाटात प्राचीन श्रीधर कवींच्या काव्याचे विकृतानुकरण किंवा विडंबन या दृष्टीनेच त्या काव्याचे महत्त्व विशेष आहे. असली काव्ये इंग्रजी, बंगाली व संस्कृत या भाषांतूनही आढळून येतात. मिल्टन कवीच्या Paradise Lost काव्याची Splendid Shilling मधली नक्कल प्रसिद्ध आहेच; परंतु त्यापेक्षाही जास्त प्रसिद्धीस आलेले काव्य बुड्ल्वसने लिहिलेले 'स्त्रियांवरील निबंध' नामक कवितांचे चोपडे होय. त्यात पोप कवीच्या Essay on Man चे विकृतानुकरण केले आहे. बंगकवी मधुसूदन दत्त यांच्या 'मेघनादवध' काव्याचे 'छुछुंद्रावध' हे विडंबनकाव्य होय. तशीच 'चहागीता' व 'काकदूत' ही संस्कृत काव्ये 'भगवद्गीता' व 'मेघदूत' यांची विडंबने होत. याच धर्तीचे 'कुळकर्णीलीलामृत' हे काव्य झाले आहे." भिडे यांच्या साक्षेपी अभ्यासू वृत्तीचा व वस्तुनिष्ठ समीक्षादृष्टीचा हा उतारा निदर्शक आहे. मला वाटते विडंबनकाव्याचे स्वरूप समजून सांगण्याचा हा मराठीतील पहिलाच प्रयत्न असावा.

ना. म. भिडे यांनी आपला 'गीतिकाव्य' हा लेख बंकिमचंद्र चतर्जी यांच्या 'गीतिकाव्य' या लेखावरून लिहिला असून त्यात गीतिकाव्य हे 'रचना, विषय आणि उद्गार' या बाबतींत इतर काव्यांहून कसे वेगळे पडते व 'त्याची ओळख पटण्यास भावनोत्कटता व प्रसन्नरचना ही मुख्य साधने' कशी आहेत ते स्पष्ट केले आहे; परंतु त्यांचा काव्यचर्चात्मक एक महत्त्वाचा लेख म्हणजे 'भावगीतिकेची दोन जुळी बाळे : संगीतक व ललितक' हा होय. हा 'विस्तारा'च्या १९३३ च्या पुस्तकात असून तो दोन लेखांकांतून आलेला आहे. या लेखात भिडे यांनी 'भावगीत ऊर्फ वीणागीत' याचे दोन प्रकार मानले आहेत : (१) आत्मलक्ष्यी अगर आत्मनुभावात्मक आणि (२) वस्तुलक्ष्यी अगर अन्याविर्भावात्मक (नाट्यगीत.) यांतील पहिल्या म्हणजे आत्मलक्ष्यी भावगीताचे त्यांनी दोन प्रकार मानले आहेत : पहिला भावगीतिका (पारिजातकीय ऊर्फ जानकीगीते) व दुसरा भावचिंतनिका (पद्मजातीय ऊर्फ शांतागीते). यानंतर त्यांनी भावगीतिकेचे संगीतक व ललितक असे दोन प्रकार केले असून भावचिंतनिकेचे सुनीत, सूक्त, सुभाषित, उद्देशिका, गुंजनिका व आर्तस्वनिका असे सहा पोटप्रकार मानले आहेत. संगीतक व ललितक यांतील स्वरूपभेद त्यांनी पुढील शब्दांत वर्णिला आहे : ते म्हणतात, 'संगीतकामध्ये जी आत्मनिष्ठ भावना उदित होते ती शब्दांच्या ध्वनिमाधुर्यामुळे व ललितकात (जी) भावना (उदित होते ती) शब्दाच्या अर्थसौंदर्यामुळे खुलते.' त्यांनी संगीतकाचे उदाहरण म्हणून 'मधुकर वनवन फिरत करी गुंजारवाला'

या पदाचा उल्लेख केला असून ' सौभद्रा'तील ' माझ्या मनिचे हितगुज सारे ' या पदाचा उल्लेख ललितकाचे उदाहरण म्हणून केला आहे. ना. म. भिडे यांचे वीणकाव्याचे आत्मलक्ष्यी आणि वस्तुलक्ष्यी हे विभाजन लक्षात येण्यासारखे असले तरी ते ' माझ्या मनिचे हितगुज सारे ' सारख्या नाट्यगीताचा समावेश आत्मलक्ष्यीमध्ये कसा करतात ते कळत नाही. ते स्वतःच वस्तुलक्ष्यीला प्रतिशब्द म्हणून नाट्यगीत हा वापरताना दिसतात व असे असूनही ' माझ्या मनिचे ' या पदाला आत्मलक्ष्यी भावगीतिकेचे बालक म्हणून संबोधतात तेव्हा आश्चर्य वाटते. परंतु काही असले तरी त्या काळच्या इतर काव्य-मीमांसकांपेक्षा भिडे कवितेसंबंधी अधिक निर्दोष समज व्यक्त करतात असेच त्यांच्या एकंदर काव्यचर्चात्मक लेखनावरुन म्हणावेसे वाटते. ( ना. म. भिडे यांनी ' मोत्यांची माळ ', ' महाजनांची कविता ', ' अनंततनयांची कविता ', ' अभिनवकाव्यमाला भाग २ ', ' हृदयतरंग ', ' सांजवात ' इत्यादींचे ' विस्तारा 'तून परीक्षण केले आहे; परंतु त्यात लक्षणीय असा काव्यविचार आढळत नाही. त्यांच्या काव्यचर्चेखेरीज असलेल्या इतर वाङ्मयचर्चेचा विचार इतरत्र केला आहे. )

ना. म. भिडे यांनी सुनीतवादात घेतलेला भाग असाच लक्षणीय आहे. प्रो. सब-नीस हे रविकिरणमंडळाचे कठोर टीकाकार. हा वाद सुरू झाला प्रो. रा. प. सबनीस यांच्या ' मिल्टिनची गीतिका ' ( १९२४ ) या लेखानधून व १९२४ सालीच त्यांनी रविकिरणमंडळाच्या ' काव्यविचार ' या वाङ्मयसमीक्षणात्मक लेखांच्या संग्रहाचे जे ' विस्तारा'तून परीक्षण केले त्यातून. सुनीताचा वाद झाला तो मुख्यतः दोन मुद्द्यांवर : एक Sonnet ला प्रतिशब्द काय असावा हा प्रश्न व दुसरा ते १४ ओळींचे असावे की नसावे हा प्रश्न. सबनिसांच्या मते Sonnet ला सुनीत किंवा स्वनीत हा प्रतिशब्द योग्य नसून त्याऐवजी ' गीतिका ' हा शब्दच योग्य होय. त्यांचे आणखी म्हणणे असे की, Sonnet मध्ये ' एकच उदात्त व ओजस्वी विषय ससाण्यासारखी भरारी मारीत गेला पाहिजे, पण आठव्या ओळीच्या शेवटी त्याला नवी दिशा लागली पाहिजे व चवदा ओळींच्या प्रदेशात त्याने स्वतःला सामाविले पाहिजे. ' सबनिसांनी मराठी कवींना तुम्ही अशा पद्धतीच्या मिल्टनी ' गीतिका ' लिहा, त्यासाठी शार्दूलविक्रीडित वृत्त वापरा व ' मराठी मापनाची परंपरा ठेवून गीतिका बारा ओळींतच संपवा, यमके योजा ' असा उपदेश केला आहे. ' विस्तारा 'तूनच ( १९२४ ) प्रो. मा. त्र्यं. पटवर्धन यांनी सबनिसांना उत्तर दिले आहे : त्यात म्हटले आहे की, ' गीतिका ' या शब्दाचा अर्थ लहान गीत असा होत असल्यामुळे तो Sonnet ला प्रतिशब्द होऊ शकत नाही; त्यापेक्षा ' सुनीत ' हाच शब्द योग्य असून तो ' सुष्ठु नीतं सुनीतम् ' असा व्युत्पादिला पाहिजे. पटवर्धनांनी वर्डस्वर्थच्या Sonnets च्या संबंधात सबनिसांनी केलेल्या काही विधानांची सदोषताही दाखवून दिली आहे व सबनिसांच्या अज्ञानाची कीव केली आहे. पटवर्धनांना सुनीत बारा ओळींचे असावे असे जे काही टीकाकारांचे म्हणणे

होते—त्यांत वा. म. जोशीही असावेत, कारण त्यांनी पुढे आपल्या गोवे-साहित्य-संमेलनातील भाषणात सुनीतात चरण-संख्येचे बंधन नसावे असे मत मांडले आहे.—ते अमान्य आहे. 'आज मात्र यमकांची व वृत्तांची विविधता मोडली जाण्याचा योग्य दिसत नाही' असे पटवर्धनांचे म्हणणे आहे; मात्र त्यांना सुनीताचे साचे होत आहेत व होणार आहेत यांची कल्पना आहे. 'विरोध किंवा विरोधाभास म्हणजेच कलाटणी अशी (अनेक कवींची) समजूत झालेली दिसते व बाह्य स्वरूपात ओळींची १४ ही संख्या हाच गुण दिसतो' असे त्यांनी म्हटले आहे. प्रो. पटवर्धन यांचा 'सुनीत आणि प्रो. सबनीस' हा लेख अत्यंत रेखीवपणे व मुद्देसूदपणे लिहिलेला आहे. याच वादात ना. म. भिडे यांनी भाग घेतला असून त्यांच्या लेखाचे नाव 'चतुर्दशपद सुनीत' असे आहे. हा लेख 'विस्तारां'तर्गत 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'त (१९२४) आलेला आहे. भिडे यांची भूमिका पटवर्धनांच्या भूमिकेसारखीच आहे. त्यांना सुनीत १२ ओळींचे असणे अमान्य आहे. शार्दूलविक्रीडित हे वृत्त सुनीताला योग्य आहे असे त्यांचे सबनिसांप्रमाणे म्हणणे असले तरी 'मात्रावृत्तांचा (सुनीतरचनेसाठी) उपयोग होणार नाही असे म्हणणे धाडसाचे होईल' असे मत त्यांनी नोंदले आहे. ह्या वादाला थोडेबहुत कारण झालेले प्रो. सबनिसांचे रविकिरणमंडळाच्या 'काव्यविचारा'चे परीक्षण बरेच परखड आहे. (सबनिसांचे बहुतेक परीक्षणलेख कडक आहेत. त्यांचा रेंदाळकरांच्या कवितेवरील परीक्षण-लेख (१९२५) असाच कठोर आहे. त्यात रेंदाळकरांबरोबर प्रस्तावनाकार माडखोलकर यांच्यावरही ते घसरले आहेत. या प्रस्तावनेबद्दल 'शब्द भाराभर व मुद्दा उपेक्षणीय' असेच त्यांचे मत आहे.); परंतु हे परीक्षण परखड असले तरी बरेच साधार आहे. माडखोलकरांची आडंबरयुक्त भाषा, त्यांनी टीकेला दिलेले अवाजवी महत्त्व, अभिजात कवीसंबंधी त्यांचा गैरसमज, द. ल. गोखले यांच्या विवेचनातील बालिशता, श्री. बा. रानडे यांनी केलेले Sonnet संबंधीचे 'हसावे की रडावे' असे विवेचन, यशवंत पेंढर-करांचे शब्दबंबाळ विवेचन इत्यादींवर सबनिसांनी घेतलेले आक्षेप अगदीच चुकीचे नाहीत. सबनिसांच्या ह्या टीकेला प्रो. मा. त्र्यं. पटवर्धनांनी उत्तर देण्याचा प्रयत्न (१९२४) केलेला आहे परंतु तो फसला आहे. 'विस्तारा'च्या ५५ व्या (१९२४) पुस्तकातील हा सर्वच वाद त्या काळातील काव्यविचारावर महत्त्वाचा प्रकाश टाकतो.

काव्यविचाराच्या संदर्भात ना. म. भिडे यांच्याबरोबरच ज्यांचे नाव आपल्या डोळ्या-समोर येते ते बाळकृष्ण अनंत भिडे हे होत. बा. अ. भिडे हे, माझ्या समजुतीप्रमाणे, मूळचे 'सरस्वतिमंदिर'चे लेखक. त्यांचे B या टोपणनावाने लिहिलेले बरेच लेख 'सर-स्वतीमंदिर'मध्ये प्रसिद्ध झालेले आहेत. मला वाटते, ते 'सरस्वतीमंदिर' बंद (१९०८) झाल्यावर 'विस्तारा'तून लिहू लागले. ना. म. भिडे यांच्या व्यासंगाचा विषय मुख्यतः अर्वाचीन कविता हा होता असे त्यांच्या 'विस्तारा'तील समीक्षात्मक लेखनावरून दिसते. बा. अ. भिडे यांचे तसे नव्हते. त्यांचा अर्वाचीन कवितेइतकाच, किंबहुना काकणभर

अधिकच प्राचीन मराठी कवितेचा व्यासंग होता. 'सरस्वतीमंदिर'च्या पहिल्याच वर्षीच्या दुसऱ्या अंकात (१९०१) वा. अ. भिडे यांनी आपल्या 'काव्यविवेचन' या लेख-मालेचा पूर्वार्ध प्रसिद्ध केला असून त्यात 'काव्याचे पुरातनत्व व सर्वव्यापकत्व', 'काव्य व धर्म : काव्योत्पत्ती,' 'शास्त्र व काव्य,' 'काव्यलक्षण,' 'काव्यव्याख्या,' या प्रकरणांची चर्चा केली आहे. 'सरस्वतीमंदिर' दुसऱ्या वर्षीच्या (१९०२) पहिल्या व दुसऱ्या अंकात सदर लेखमालेचा उत्तरार्ध प्रसिद्ध झाला असून त्यात 'काव्यात्मा-रस,' 'कवित्व व कविगुण,' 'कविप्रतिभा आणि रसिकता,' या प्रकरणांचा विचार आहे. भिडे यांनी केलेले हे 'काव्यविवेचन' त्या काळाच्या दृष्टीने विचारप्रक्षोभक आहे. त्यात भारतीय साहित्यविचार आणि पाश्चात्त्य साहित्यविचार यांचा समन्वय साधण्याचा अनेक ठिकाणी प्रयत्न आहे. भिड्यांनी 'सरस्वतीमंदिर'च्या सातव्या वर्षीच्या (१९०७) च्या अंकातून अर्वाचीन कवी व कविता यांवर आजगावकरांनी जे आक्षेप घेतले होते त्यांना उत्तर देण्याकरिता आणि अर्वाचीन कवी काव्यगुणांमध्ये प्राचीन मराठी कवींपेक्षा तसूभरही कमी नाहीत हे सिद्ध करण्याकरिता 'प्राचीन व अर्वाचीन मराठी कवी' नावाची लेख-माला लिहिली ती त्यांच्या प्राचीन व अर्वाचीन मराठी कवितेच्या व्यासंगाची साक्ष देते.[१] 'सरस्वतीमंदिर' मधूनच भिडे यांनी वामनपंडित, मुक्तेश्वर इत्यादी प्राचीन मराठी कवींवर काव्यपरीक्षणात्मक लेखन केलेले आहे; त्याच्या छोट्या पुस्तिका निघालेल्या असल्यामुळे ते किती व्यासंगपूर्ण आहे याची अभ्यासकांना कल्पना आहेच. भिडे यांचा

---

१. या लेखमालेत वा. अ. भिडे यांनी केशवसुतपूर्व कालातील अर्वाचीन कवितेचे स्वरूप अत्यंत मार्मिकपणे स्पष्ट केले आहे व या कवितेने केशवसुतांच्या आगमनासाठी पूर्वतयारी कशी केली ते सूचित केले आहे. प्राचीन मराठी कवींनी भागवत, भारत व गीता व पुराणे यांवरच आपले लक्ष केंद्रित केल्यामुळे संस्कृतमधील अभिजात साहित्या-कडे त्यांचे दुर्लक्ष झाले. अव्वल इंग्रजीतील पंडित कवींचे लक्ष इंग्रजीच्या साहचर्यामुळे नेमके या संस्कृत साहित्याकडे वळले व त्याचे अनुवाद करण्याचे प्रयत्न त्यांनी केले. त्यांना कोठेतरी या संस्कृत साहित्याचे इंग्रजी साहित्याशी लौकिकी विषयासंबंधी असलेले थोडे-फार साम्य लक्षात आले असावे. त्यांनी प्राचीन मराठी कवींनी दुर्लक्षिलेल्या शाकुंतल, मालतीमाधव, विक्रमोर्वशीय, मुद्राराक्षस, मृच्छकटिक, नागानंद, उत्तररामचरित, वेणी-संहार इ. नाटकांची मराठीत भाषांतरे केली व त्याचबरोबर रघुवंश, ऋतुसंहार, भामिनी-विलास, मेघदूत, गंगालहरी, अमरुशतक, इ. संस्कृत काव्यांचे मराठी अनुवाद केले. स्वाभाविकपणे याच काळात भट्टवंशकाव्य, स्ववंशकाव्य, कृष्णाकुमारी, शोकावर्त, अकबर-काव्य, विलापलहरी, गंगावर्णन, यशवंतराव महाकाव्य, राजा शिवाजी वगैरे स्वतंत्र काव्ये रचली गेली व भिडे सुचवितात त्याप्रमाणे मराठी कविता पारलौकिकाकडून एकदम लौकिकाकडे वळली. तिने सांधा बदलला व ती वेगळ्या दिशेने पाउले टाकू लागली.

'विस्तारा'तील जो लेख आपले प्रथम लक्ष वेधून घेतो तोही जुन्यानव्या मराठी कवींच्या लेखनाचा विचार करणारा आहे. त्याचे नाव आहे 'मराठी भाषा व प्राचीन आणि अर्वाचीन कवी – यांचे संबंधाने फुटकळ विचार' ( १९२० ). हा लेख म्हणजे त्यांच्या संकल्पित वाङ्मयेतिहासाची ( याचा पहिला अपुरा राहिलेला भाग प्रसिद्ध आहेच ) झलकच आहे. यात त्यांनी प्रथम मराठी भाषेच्या उत्पत्तीसंबंधी आपले विचार मांडले असून प्राचीन मराठी साहित्याचे पुढीलप्रमाणे कालखंड पाडले आहेत व त्यांचे नामकरण केले आहे : ( १ ) आर्षयुग (......१३००), ( २ ) संकोचयुग (१३००–१६००), ( ३ ) उत्क्रांतियुग ( १६००–१७०० ), ( ४ ) प्रौढत्वयुग ( १७००–१८०० ), ( ५ ) विस्तारयुग ( १८००....... ). निबंधाचे शेवटी नव्या कवितेची तरफदारी आहे व तिचे लवकरच सर्वांकडून स्वागत होणार आहे असा आशावाद आहे. भिडे यांनी येथेच कीर्तनकारांना आवाहन केले असून त्यांनी 'अलीकडील काव्याशी परिचय ठेवून खऱ्या रसिकतेने सुंदर सुंदर वेचे आपल्या कीर्तनात समाविष्ट करावे' अशी सूचना केली आहे. बा. अ. भिडे हे नव्याजुन्या मराठी कवितेचे व्यासंगी असले तरी त्यांची वाङ्मयाच्या प्रकृतीची व वाङ्मयव्यवहाराची समज ना. म. भिडे यांच्याइतकी निर्दोष नाही. ना. म. भिडे हे अचूकपणे तुकारामानंतरच्या श्रीधर-मोरोपंतांच्या काळाला अपकर्षकाल म्हणून संबोधतात व अपकर्षकालाची लक्षणे यथार्थपणे नोंदतात तर बा. अ. भिडे या कालास ( १७००-१८०० ) प्रौढत्वयुग या नावाने संबोधताना आढळतात, यावरून माझ्या म्हणण्याची सत्यता पटेल. बा. अ. भिडे यांची वाङ्मयाच्या प्रकृतीची समज कमी निर्दोष असली तरी त्यांचे एकंदर समीक्षात्मक लेख अत्यंत नीटस, अभ्यासपूर्ण, ठाशीव व मुद्देसूद असल्यामुळे त्यांचा त्या काळात श्रीपाद कृष्णांच्या लेखनाप्रमाणेच वाङ्मयक्षेत्रात सतत प्रभाव पडला. 'विस्तारा'च्या १९२१ च्या पुस्तकात त्यांनी वामनपंडिताच्या 'नामसुधा व हरिविलास' या पुस्तकाला लिहिलेली प्रस्तावना उद्धृत करण्यात आली आहे : ह्या प्रस्तावनालेखात 'नामसुधे'त ज्ञानयुक्त सगुणभक्तीची कोणती सहा तत्त्वे अन्तर्भूत आहेत ते त्यांनी कलमवार स्पष्ट केले असून वामनपंडिताच्या चरित्राची, वाङ्मयाची व कार्याची सुस्पष्ट ओळख करून दिली आहे. 'विस्तारा'च्या १९२२ च्या पुस्तकात आपणांस भिडे यांचे एकामागून एक असे पाच परीक्षणलेख आढळतात. यांतील प्रो. वा. ब. पटवर्धन यांच्या 'काव्य आणि काव्योदय' या सुप्रसिद्ध निबंधाचे दोन लेखांकांतून केलेले परीक्षण विशेष महत्त्वाचे आहे. त्यातून भिडे यांच्या काव्यदृष्टीवर उत्तम प्रकाश पडतो. हा निबंध मुंबई विद्यापीठाने प्रवेश-परीक्षेसाठी नेमल्यामुळे मुख्यतः भिडे त्याचे परीक्षण करण्यास प्रवृत्त झाले आहेत. पटवर्धनांनी त्यात मांडलेली मतें अप्रौढ विद्यार्थ्यांचा बुद्धिभेद व दिशाभूल करणारी आहेत असे भिडे यांचे मत आहे. पटवर्धनांनी प्राचीन मराठी कवितेचा निबंधात ठिकठिकाणी अधिक्षेप केलेला आहे. भिड्यांच्या मते कोवळ्या विद्यार्थ्यांवर याचा विपरित परिणाम होण्याची शक्यता आहे.

पटवर्धनांचे हे कार्य विष्णुशास्त्र्यांच्या कार्याला छेद देणारे आहे व म्हणूनच भिडे यांना पसंत नाही. त्यामुळे विद्यार्थ्यांच्या ठिकाणी आपल्या प्राचीन वाङ्मयाबद्दल अप्रीती निर्माण होणार आहे; आपल्या वाङ्मयधनाला ते पारखे होणार आहेत. असे त्यांचे मत आहे. पटवर्धनांनी निबंधास योजलेली काव्यमय भाषा भिडे यांना पसंत नाही; शास्त्रीय स्वरूपाच्या लेखनाला साजेसा काटेकोरपणा, अचूकपणा पटवर्धनांच्या लेखनात त्यांना आढळत नाही. पटवर्धनांनी आपल्या काव्यविवेचनात अनेक ठिकाणी राजकीय व सामाजिक प्रश्न अनुषंगाने आणले आहेत. भिडे यांना पटवर्धनांची ही विवेचनपद्धती पसंत नाही; त्यामुळे पटवर्धन निष्कारण आपल्याला पसंत नसलेली राजकीय व समाजसुधारणाविषयक मते प्रतिपादणाऱ्यांना काव्यविवेचन करता करता कोपरखळ्या मारीत आहेत व हे त्यांचे करणे बरोबर नाही असे भिडे यांना वाटते. (वास्तविक पटवर्धनांनी चातुर्वर्ण्य व्यवस्थेचा व तज्जन्य जातिभेदाचा प्राचीन मराठी साहित्याच्या स्वरूपावर काय परिणाम झाला आहे हे सांगण्याचा महत्त्वपूर्ण प्रयत्न केलेला आहे; परंतु भिडे हे विष्णुशास्त्रीपंथाचे असल्यामुळे त्यांना हे पटवर्धनी विवेचन बुद्धिभेद करणारे वाटत आहे.) आपले म्हणणे पटवून देण्यासाठी त्यांनी पटवर्धनांची अनेक विधाने उद्धृत केली आहेत. भिडे यांचे मत असे आहे की ' पटवर्धनांनी जुन्या मराठी कवींबद्दल जे प्रशंसोद्गार कित्येक ठिकाणी काढले आहेच, त्यांतही बरेच वेळा शंकोपशंका, उपरोध व प्रच्छन्न उपहास यांचा मिलाफ होऊन ती प्रशंसा डागलट बनली आहे. ' अशा प्रकारच्या पटवर्धनी उद्गारांचे नमुनेही भिडे यांनी सादर केले आहेत. कोणीही कोठेही ' पद्या 'ला ' काव्य ' म्हणून संबोधिलेले नसताही पटवर्धन ' पद्य ' हे ' काव्य ' नव्हे असे मुद्दाम आवर्जून पुनः पुनः का सांगतात असा भिडे यांचा सवाल आहे. ' वाक्प्रबंधातील हृदयंगमत्व म्हणजे काव्य ' ही काव्याची व्याख्या भिडे यांनी सादर केली आहे. पटवर्धनांनी वर्णिलेल्या काव्यनिर्मितिप्रक्रियेत प्रतिभेला महत्त्व दिले असून बुद्धीला गौण लेखिले आहे, एवढेच नव्हे तर ' काव्य प्रसविण्याचा अधिकार प्रतिभेचा आहे. तो बुद्धीला मिळावयाचा नाही ' असे त्यांनी म्हटले आहे. भिडे यांच्या मते ' काव्यजननी जी प्रतिभा तिलाही कार्यक्षम होण्याला बुद्धी, श्रद्धा व कल्पना यांचा पाठिंबा असतो. त्याशिवाय प्रतिभा जननीपदाला पोहचूच शकत नाही. ' पटवर्धनांनी जुन्या मराठी कवींवर परपुष्टतेचा आरोप केला आहे. त्यावर भिडे यांचे म्हणणे असे की, जुन्या कवींवर परपुष्टतेचा आरोप करणारे पटवर्धन स्वतः आंग्ल-काव्य-धार्जिणे आहेत. जुने काव्य पटवर्धन समजतात तसे केवळ निवृत्तिपर नसून प्रवृत्तिपरही कसे आहे, जुने मराठी कवी केवळ ' कथडे ' नसून त्यांच्या कथाकाव्यात प्रतिभेची चमक कशी आहे, जुन्या मराठी काव्यातही निसर्गसौंदर्याविषयी रसिकता कशी अनेक ठिकाणी व्यक्त झाली आहे, पटवर्धन म्हणतात त्याप्रमाणे मराठी कवींना रंगसौंदर्य आकर्षून घेत नाही हे खोटे असून त्यांच्या कवितेत रंगगंधांचे सौंदर्य ठिकठिकाणी कसे प्रकट झालेले आहे, जुन्या मराठी कवितेत

नागरपण कसे आहे, प्राचीन मराठी कवींना अन्तःसृष्टीची ओळख कशी परिपूर्ण आहे हे सर्व भिडे यांनी पटवर्धनांच्या जुन्या कवींवरील आक्षेपांचा समाचार घेताना कलमवार पटवून देण्याचा प्रयत्न केला आहे. (बा. अ. भिडे हे जुन्या व नव्या मराठी कवितेचे सारखेच भोक्ते व पाठिराखे आहेत. येथे ते पटवर्धनांनी जुन्या कवींवर घेतलेले आक्षेप खोडून काढीत आहेत तर 'सरस्वतीमंदिर'मधील आपल्या लेखात आजगावकरांनी अर्वाचीन कवींवर घेतलेले आक्षेप त्यांनी असेच खोडून काढलेले आहेत.) 'विस्तारा'च्या या परीक्षणलेखाच्या शेवटल्या परिच्छेदात त्यांनी प्रतिभेचे स्वरूप व तिची कार्यपद्धती यासंबंधीचे पटवर्धनांनी 'आपल्या पद्धतीने फार सुंदर विवेचन केले आहे व आधुनिक साहित्यकारांस त्याचे मोठेंच साह्य होणार आहे' असे म्हणून पटवर्धनांना त्याबद्दल धन्यवाद दिले आहेत; परंतु एकंदरीने भिडे यांचा हा परीक्षणलेख मतैक्यापेक्षा मतभेद व्यक्त करण्यासाठीच लिहिला गेला आहे.

'आधुनिक कविपंचक' या माडखोलकर यांच्या पुस्तकावरील भिडे यांचा परीक्षणलेख असाच मतभेददर्शक आहे. त्यातही सर्व लेखभर माडखोलकरांशी मतभेद व्यक्त केल्यावर शेवटी 'माडखोलकरांनी हा ग्रंथ फार चिकित्सक बुद्धीने व मार्मिक रसिकतेने लिहिला आहे' असा अभिप्राय त्यांनी दिला आहे. माडखोलकरांनीही पटवर्धनांप्रमाणेच काव्य-निर्मितिप्रक्रियेत बुद्धी व श्रद्धा यांना स्थान दिलेले नाही असे भिडे यांना जाणवल्यामुळे केवळ कल्पनेच्या भराऱ्या म्हणजे काव्य कसे नव्हे ते स्पष्ट करण्यात परीक्षणाचा काही भाग खर्ची पडला आहे. माडखोलकरांनी जे काव्यहेतू म्हणून सांगितले आहेत ते साध्य होण्याच्या दृष्टीनेही बुद्धी व श्रद्धा यांची आवश्यकता कशी आहे हे सांगून तेवढेच काव्यहेतू नसून त्याखेरीज इतरही कसे संभवतात हे त्यांनी स्पष्ट केले आहे. भिडे यांचा माडखोलकरांशी एका मुद्द्यावर विशेष मतभेद आहे. माडखोलकरांचे मत 'कवी हे राष्ट्र-घटनेचे कर्ते आहेत' असे आहे तर भिडे यांचे म्हणणे असे की 'राष्ट्राच्या भावनांचे व चढपडीचे द्योतक असे सारस्वत त्यांच्या भाषेत निर्माण होते, परंतु ते या चढपडीचे व भावनांचे कारण नसून कार्यच असते. तेव्हा राष्ट्रघटनेकरिता जे कवींच्या कृतींवर अव-लंबून राहतील, त्यांच्या पदरी निराशा पडल्यास फारसे आश्चर्यचकित होण्याचे कारण नाही.' माडखोलकर हे रे. टिळकांना त्यांच्या धर्मश्रद्धेबद्दल दोष देतात हे भिडे यांना पसंत नाही. त्यांना माडखोलकरांच्या केशवसुतांसंबंधीच्या विवेचनात अनेक परस्परविरोधी विधाने आढळतात. केशवसुतांना अभिव्यक्ती साधली नाही असे माडखोलकरांप्रमाणेच यांचे मत आहे; व केशवसुतांच्या कितीशा कविता काळौघात टिकतील याबद्दल ते माडखोलकरांइतकेच साशंक आहेत. त्यांनाही केशवसुतांची 'झपूर्झा' म्हणजे 'तत्त्वांची व कल्पनांची जाळी विणण्याची लहर' वाटते. 'केशवसुतांनी सुरू केलेला संप्रदाय जोरात येईल, पण त्यांची काव्ये बहुतेक लोपल्यासारखीच होतील' असेच भविष्य त्यांनी वर्त-विले आहे. एवढेच नव्हे तर विवेचनाच्या ओघात त्यांनी पुढील विधान केले आहे.

" आजमितीस सुद्धा 'विनायक' व 'गोविंदाग्रज' यांच्या नादमधुर, सुगम व सरस कवनांनी गुरूवर ताण करून आपल्या गुणांनी त्याच्या कृतीस मागे सारले आहे.' वा. अ. भिडे यांच्या वर उल्लेखिलेल्या विवेचनाशेजारी ना. म. भिडे यांचे 'विस्तारा'तील केशवसुतांच्या कवितेसंबंधीचे विवेचन ठेवले म्हणजे वा. अ. भिडे यांच्यापेक्षा ना. म. भिडे यांची काव्यदृष्टी कशी अधिक निर्दोष होती हे स्पष्टपणे लक्षात येते.

वा. अ. भिड्यांनी 'विस्तारा'च्या ह्याच पुस्तकात (१९२२) आनंदराव टेकाडे यांच्या 'आनंदगीता'चे परीक्षण केले आहे. त्यात प्रारंभी Lyric (वीणागीत) ची वैशिष्ट्ये—ती नेहमीचीच आहेत. त्यांत भिडे यांचा दृष्टिकोणाचा वेगळेपणा नाही.—सांगून नंतर प्रस्तावनाकार माधवराव अणे यांच्या म्हणण्याप्रमाणे 'आनंदगीत' म्हणजे श्रोत्यांच्या किंवा वाचकांच्या मनात आनंदकल्लोळ उत्पन्न करणारे गीत नसून केवळ आनंदकवीचे गीत होय हे स्पष्ट केले आहे. नंतर 'ही गीते कवीच्या प्रासंगिक उत्कट कल्पनांच्या अगर विकारांच्या शब्दमूर्ती असतात, तेव्हा त्यावरून कोणाही कवीच्या आचारविचाराविषयी अगर स्वभावप्रवृत्तीविषयी खात्रीलायक अनुमाने काढणे हे धाडसाचे व तर्कविरुद्ध होईल' हा इशारा देऊन अणे यांनी अशा प्रकारे कवीच्या स्वभावाबद्दल काढलेले अनुमान—कवीची विनयशीलता वगैरे—चुकीचे कसे आहे ते दाखविले आहे. (कवीचे शील व त्याचे काव्य यांच्या अन्योन्यसंबंधाविषयीचे कुतूहल या वेळेच्या काही काव्यपरीक्षणांत आढळते. १९२१ मध्ये 'विस्तारा'तूनच प्रो. लक्ष्मणशास्त्री लेले यांनी 'विनायकाची कविता' या पुस्तकाचे परीक्षण केले. या पुस्तकाचे प्रस्तावनालेखक प्रो. वा. ब. पटवर्धन यांनी प्रस्तावनेत विनायकाचे चारित्र्य व त्याचे काव्य यांतील अन्योन्य संबंध शोधण्याचा प्रयत्न केला आहे तो लेले यांना पसंत नाही. ते म्हणतात, 'विनायकाचे—शीलभ्रष्टाचे—चरित्र ते काय, व त्याचे एवढे स्तोम तें कशाकरिता ? कवीचे शील व त्याचे काव्य यांचा नित्यसंबंध असतो असे आम्हांस तरी वाटत नाही.') 'उणीव रसिकाचीच परी' असे म्हणणाऱ्या 'वी' कवींना अणे यांनी जो दोष दिला आहे त्याबद्दलही भिडे यांनी त्यांची हजेरी घेतली आहे. आनंद कवी हे आपली कविता लोकसमुदायासमोर गाऊन दाखवतात त्याबद्दल काही लेखक त्यांना दोष देत होते. या लोकांचा भिडे यांनी निषेध केला आहे. " आनंद कवींची गीते दिसण्यात केशवसुतांच्या संप्रदायाची भासतात. पण त्यांत केशवसुतांची जशी धडाडी आढळून येत नाही, तसा त्यांचा विक्षिप्तपणाही त्यात दृग्गोचर होत नाही. त्याप्रमाणेच गोविंदाग्रज कवींची सफाई व सरसता आनंदगीतात प्रतीत झाली नाही, तरी गोविंदाग्रजांचा छचोरपणाही त्यात दिसत नाही. आनंदगीते जरा घस्मर व कठोरच आहेत. पण त्यांत मनोहरताही आहे, हे नाकबूल करता येणार नाही.'' हा त्यांचा 'आनंदगीता'वर अभिप्राय आहे. त्यांच्या दृष्टीने आनंदकवीचे कार्य दुहेरी आहे: 'राज्यकर्त्यांमध्ये व जनतेमध्येही स्वकर्तव्य जागृती उत्पन्न करावयाची, व तद्द्वारा राष्ट्रात जोम व चेतना आणावयाची हे त्यांचे उद्दिष्ट आहे.'

म्हणूनच त्यांनी आनंदकवींच्या शाहिरी बाण्याच्या कवितेचे कौतुक केले आहे. भिडे यांच्या काव्यदृष्टीवर हे परीक्षणही प्रकाश टाकते.

वा. अ. भिडे यांनी याखेरीज 'माधवानुजांची कविता', सावरकरांचे 'गोमांतक', तिवारी यांची 'अभंगमाला', 'संग्रामदेवता' 'राधामाधव' ही काव्ये, लेलेशास्त्री यांचे 'विश्वमंगल', वि. मो. महाजनी यांचे 'फुलांचे झेले' इत्यादी काव्यग्रंथांची 'विस्तारा'-तून परीक्षणे केली आहेत; त्या सर्वांतून त्यांचा नव्या-जुन्याचा समन्वय बाळण्याचा दृष्टिकोण दिसून येतो. त्यांना माधवानुजांची कविता पसंत आहे (१९२५), का तर माधवानुज हे केशवसुतांप्रमाणे चंडलोरीची भाषा वापरीत नाहीत, त्यांच्यात 'आधुनिक कवींचे चवचाल रंगेलपणाचे वेढंगी गुलजारपणही नाही,' (हे माधव जूलियन् यांच्या कवितेला उद्देशून केलेले विधान आहे.) नुसडेपणा नाही, त्यांची कविता 'विचारांनी निर्मळ व मवाळ आहे', तिच्यात कल्पनेच्या भराऱ्या नाहीत, समाजाला दुखविणारी मूर्तिभंजकता नाही, भाषा सुबोध व सरळ आहे म्हणून. यशवंत कवींची 'यशवंती' त्यांना पसंत आहे (१९२२). याचे कारण त्या कवितेत 'जुन्या व नव्या वळणाचे मनोहर संमेलन झालेले आढळते. तरल कल्पनेच्या विरल वातावरणातील भ्रामक लहरी त्यांच्या काव्यात आढळत नाहीत...यशवंत गूढ काव्याचे भोक्ते दिसतात तरी त्यांची स्वतःची सर्वच कविता बहुतेक साधी, सरळ, सोपी आहे. त्यांची सर्वच स्फुट काव्ये आम्हांस सामान्यतः ठाकठिकीची व रसपूर्ण वाटतात...हे कवीही राष्ट्रीय--शाहीर वर्गातील आहेत.' भिडे यांची काव्यदृष्टी स्वातंत्र्यप्रवृत्तीपेक्षा (romantic) सुव्यवस्था प्रवृत्तीकडे (classical) अधिक झुकलेली आहे असे त्यांच्या एकंदर समीक्षा-लेखनावरून दिसते. 'विस्तारा'ने ना. म. भिडे, रा. प. सबनीस, रा. ना. ब्रह्मनाळकर यांच्याबरोबरच वा. अ. भिडे यांच्या समीक्षालेखनाला स्थान देऊन अभावितपणे विचारांचा समतोल साधला असेच म्हणावेसे वाटते.

श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे 'विस्तारा'चे एक मान्यवर समीक्षक; परंतु कोल्हटकरांच्या समीक्षालेखनात काव्यसमीक्षेचा भाग अत्यल्प आहे. ही त्यांची समीक्षा मुख्यतः नाट्य-समीक्षा आहे. कोल्हटकरांनी काव्यविचार केला तो मुख्यतः द्वितीय महाराष्ट्र कविसंमेल-नाच्या अध्यक्षपदावरून. हे त्यांचे भाषण 'विस्तारांतर्गत असलेल्या म. सा. पत्रिकेच्या १९२२ च्या पुस्तकात छापलेले आहे. या भाषणात कोल्हटकरांनी समकालीन कवितेच्या स्वरूपाविषयी विवेचन करण्याचे टाळले आहे. त्यासाठी त्यांनी पुढे केलेली सबब लंगडी आहे.. ह्या कविसंमेलनापूर्वी नुकत्याच भरलेल्या बडोदे येथील महाराष्ट्र साहित्य संमेलनात संमेलनाध्यक्ष तात्यासाहेब केळकर यांनी तत्संबंधी विवेचन केलेले असल्यामुळे आपण ते येथे करीत बसत नाही असे त्यांनी म्हटले आहे. (जणू काय केळकरांनी सोडवून टाकलेले गणित परत सोडवण्यात काय अर्थ आहे असेच त्यांना काव्यविवेचनाबाबत म्हणायचे आहे.) या भाषणात कोल्हटकरांनी काव्याच्या प्रकृती-

संबंधी केलेले विवेचन काळजीपूर्वक वाचले तर ते काव्यलेखनात ' वैचित्र्या'ला, ' अपूर्वाईला,' ' अलंकारांना,' ' कल्पनाचमत्कृती'ला कसे महत्त्व देत होते हे लक्षात येते. काव्य कसे असावयास पाहिजे, त्यात काय असावयास व काय नसावयास पाहिजे यासंबंधी त्यांनी जे विवेचन केले आहे ते लक्षात घेतल्यास ते काव्यलेखनाकडे एक प्रकारची कारागिरी म्हणूनच पाहात आहेत की काय असा संशय येतो. कवितेचा ' अर्थ ' स्पष्टपणे लक्षात आला पाहिजे, काव्यात जी ' एकरूपतेची भावना ' निर्माण होणे आवश्यक असते ती एकरूपता कवी ' कारणविषयक अद्वैत व प्रयोजनविषयक अद्वैत या दोन साधनांनी मुख्यतः साधीत असतो; काव्यातील आरंभीच्या परिस्थितीशी उत्तरोत्तर परिस्थिती कार्यकारणभावाने संबद्ध आहे, असे दाखवून कारणविषयक एकरूपता साधता येते. एकरूपतेच्या या दोन प्रकारांस अनुक्रमे उगममूलक व अंतमूलक म्हणावयास हरकत नाही.' कोल्हटकरांचे हे विवेचन वाचले की ते काव्यलेखनाचे नियम व पोटनियम समजून सांगत आहेत हे लक्षात येते. काव्यात पुनरुक्ती व पाल्हाळ असता कामा नये, ' रसिकांच्या समजुतीवर कवीने कधीही फाजील ताण पडू देता कामा नये,' हे व असलेच ' नियम ' कोल्हटकरांनी आवर्जून सांगितले आहेत. कोल्हटकरांचे पुढील विधान त्यांची काव्यविषयक समज किती कोती होती यावर प्रकाश टाकणारे आहे : ते म्हणतात, " अलंकारप्रचुर काव्य रचण्यास कवी विशेष बुद्धिमान असावा लागतो; पण सुरस काव्यरचनेस कवीस प्रेमळ अन्तःकरणाहून अधिक तयारीची फारशी जरुरी नसते." कोल्हटकर हे त्या काळातील प्रतिष्ठित टीकाकार. त्यांनी फारसे काव्यविवेचन का केलेले नाही हे कळण्यासारखे आहे. ' विस्तारा'त त्यांनी केलेले एकही काव्यपरीक्षण आढळत नाही. जेथे प्रो. लक्ष्मणशास्त्री लेले यांच्यासारखे जुन्या पटडीतून तयार झालेले हेदेखील नव्या कवितेबरोबर आलेली कवितेसंबंधीची नवी समज व्यक्त करीत होते तेथे कोल्हटकरांसारखे वाङ्मयसमीक्षक वर उद्‌धृत केले आहेत तसले विचार व्यक्त करीत होते याचे आश्चर्य वाटते. येथे वास्तविक कोल्हटकरांच्या काव्यविचाराचे विवेचनही अनावश्यक होते. ते केले ते एवढ्याचसाठी की कोल्हटकरांसारख्या ' विस्तारा 'च्या एका प्रतिष्ठित टीकाकाराला काव्यविचार फारसा जमला नाही हे लक्षात यावे म्हणून.

' विस्तारा'मधून जुन्या मराठी कवींसंबंधी आणि त्यांच्या काव्यलेखनासंबंधी भरपूर विचार झाला. ज्ञानेश्वर, मुक्तेश्वर, मोरोपंत, श्रीधर, अमृतराय, दयाळनाथ, विठ्ठल, वामनपंडित, वेणूबाई, तुकाराम, इत्यादींबरोबर तुळशीदास, संत कबीर व मीरा यांच्यावरही अभ्यासलेख ' विस्तारा'ने प्रसिद्ध केले; परंतु यांमध्ये चरित्रात्मक संशोधन, वर्णनात्मक विवेचन, पारंपरिक स्वरूपाचे रसग्रहण यांचाच भाग अधिक आहे. ना. म. भिडे यांच्यासारख्यांच्या लेखांमधून जी नवी काव्यदृष्टी दिसून येते त्या दृष्टीने जुन्यांचे परीक्षण झाल्याचे क्वचितच आढळून येते; तेव्हा या अभ्यासलेखांमधून लक्षणीय काव्यविचाराला चालना मिळाली असे म्हणता येत नाही; ह्या सर्व अभ्यासलेखांमध्ये वा. अ. भिडे यांचे

अभ्यासलेख विशेष लक्षात घेण्याजोगे वाटतात. त्यांत थोडाफार तरी पारंपरिक दृष्टी-बरोबर नव्याकाव्यदृष्टीचा अवलंब केल्यासारखा दिसतो. या दृष्टीने त्यांचे वामनपंडित, मुक्तेश्वर, तुकाराम यांजवरील ' सरस्वतीमंदिर ' व ' विस्तार ' यामधील विवेचन थोडे इतरांच्या विवेचनाहून वेगळे ठरते; परंतु ते देखील विशेष डोळ्यात भरेल इतके नव्हे.

' विस्तारा 'तून झालेल्या काव्यविचाराचे स्वरूप काय होते ते आतापर्यंत स्पष्ट केले. ' विस्तारा 'तून झालेला जवळजवळ सर्वच महत्त्वाचा काव्यविचार तेवढ्यासाठी लक्षात घेतला आहे. प्रारंभीच स्पष्ट केल्याप्रमाणे ' विस्तार 'कर्ते हे जरी केशवसुतप्रणीत मराठी नवकवितेच्या प्रत्यक्ष प्रकाशनाला फारसा हातभार लावताना निदान त्या कवितेच्या प्रारंभकालात दिसत नसले तरी ही कविता नेमके काय साधू पाहात आहे, ते मराठी कवितेच्या दृष्टीने इष्ट आहे की अनिष्ट आहे ह्या प्रश्नांच्या विवेचनाला त्यांनी आपल्या मासिकातून सतत स्थान दिले. या कवितेने कवितेची भाषा, कवितेचा विषय, कवितेचा छंद, कवितेचे प्रकार यासंबंधात जे बदल केले होते तत्संबंधीच्या चर्चेला बुद्धिपुरस्सर प्रोत्साहन दिले. सुनीताचा वाद, निर्यमक कवितेचा वाद, कवितेच्या भाषेसंबंधीचा वाद, काव्यातील वर्णनांसंबंधीचा वाद अशा अनेक कवितेसंबंधीच्या वादांना ' विस्तारा 'ने कसे स्थान दिले ते वरील परिच्छेदांत स्पष्ट केले आहे. Lyric चे स्वरूप, Lyric ची लक्षणे यासंबंधीच्या चर्चेला तर ' विस्तारा 'त किती वेळा स्थान मिळाले त्याची मोजदाद करणे कठीण आहे. ह्याबरोबरच ना. म. भिडे सारख्यांच्या लेखांमधून कवितेचा उत्कर्षकाल कोणता, तिचा विस्तारकाल कोणता व तिचा अपकर्षकाल कोणता, ह्या विविध कालांतील तिची बदलती रूपे कोणत्या प्रकारची असतात या प्रश्नांच्या विचाराला जे स्थान मिळाले ते मराठी काव्यविचार प्रगल्भ होण्यास उपकारक ठरले. ' विस्तारा 'च्या काव्यसमीक्षकांनी ह्या नव्या ऐतिहासिक दृष्टिकोणातून जुन्या मराठी कवितेचा केला त्यापेक्षा अधिक विचार केला असता तर मराठी वाङ्मयेतिहास-लेखनाला महत्त्वपूर्ण वळण मिळाले असते; परंतु रामदासांच्या ' दासबोधा 'ला काव्य म्हणण्याऐवजी प्रबंध म्हणणे चांगले यासारखा नवी काव्यदृष्टी व्यक्त करणारा एखाद दुसरा फुटकळ विचार मांडण्यापलीकडे त्याने जुन्या मराठी वाङ्मयासंबंधात नव्या दृष्टीने विचार केलेला आढळत नाही; एवढेच नव्हे तर प्रो. वा. ब. पटवर्धन यांनी ' काव्य व काव्योदय ' या निबंधात जुन्या मराठी वाङ्मयाच्या केलेल्या अचूक विश्लेषणावर ' विस्ताराच्या प्रतिष्ठित टीकाकारांनी—वा. अ. भिडे यांनी कडाडून हल्ला चढविल्याचे दृश्य आपणांस दिसते. वासुदेवराव पटवर्धनांनी उपस्थित केलेल्या प्रश्नावर ' विस्तारा 'ने साधकबाधक चर्चा होऊ दिली असती तर ती मराठी काव्यविचाराला अधिक उपकारक ठरली असती. अर्थात हे कार्य ' विस्तारा 'तून झालेले नसले व त्यामुळे जुन्या मराठी काव्यलेखनाचे नव्या दृष्टिकोणातून त्याने पुनर्मूल्यमापन करण्यास चालना दिल्याचे दिसत नसले तरी नव्या मराठी कवितेबरोबर आलेला नवा काव्यविचार तिच्या वाचका-पर्यंत नेण्याचे आवश्यक असे कार्य त्याने केले असेच म्हटले पाहिजे.

अनुक्रमणिका

# कला म्हणजे काय ?

डॉ. सुरेन्द्र बारलिंगे

'कला' या शब्दाचा ज्या अर्थाने आपण आज प्रयोग करतो, जवळजवळ त्याच अर्थाने प्राचीन काळीही त्या शब्दाचा प्रयोग होत असावा असे दिसते. कालिदासाच्या अजविलापात–

"गृहिणी सचिवः सखी मिथः प्रियशिष्या **ललिते कलाविधौ**"

या ओळीत ललित कला असा शब्दप्रयोग केलेला आढळतो. तसेच भर्तृहरीने –

"साहित्य-संगीत-कलाविहीनः। साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः॥"

अशी साहित्य, संगीत आणि कलांची प्रशस्ती केलेली आढळते. पण या श्लोकार्धा-तून एक प्रश्न निघतो. साहित्यकला आणि संगीतकला अशी या चरणाची संगती लावा-वयाची, की साहित्य, संगीत, आणि कला यांना वेगळे मानावयाचे ? जर कलेला साहित्य आणि संगीत यांपासून वेगळे काढले, तर त्या काळी साहित्य आणि संगीत यांचा कलांत अंतर्भाव होत नसावा असा याचा अर्थ होईल. परंतु परंपरागत चौसष्ट कलांत संगीत म्हणजे नृत्य, गीत आणि वाद्य यांचा अंतर्भाव होत असावा असे दिसते.

भामहाने– "नृत्तं गीतं तथा वाद्यम् आलेख्यम् मणिभूमिकाः। इत्यादी कारिकांनी, संगीताचा कलांत अंतर्भाव केलेला आढळेल. त्या मानाने साहित्याचा अंतर्भाव फार उशिरा झालेला असावा. 'कला' शब्दाचा उपयोग श्रीवामनानेही केला आहे. "कलाशास्त्रेभ्यः" (१. ३. ७. का. लं. सू. वृ.) या सूत्रावरील वृत्तीत कला शब्दाने श्रीवामनांना ('गीतनृत्यचित्रादिकाः') गीत, नृत्य, चित्र आदी कला अभिप्रेत होत्या असे दिसते. पण आदी या शब्दाने कोणत्या इतर कला त्यांना अभिप्रेत होत्या हे मात्र स्पष्ट होत नाही.

श्रीभरतानेही 'कला' शब्दाचा प्रयोग केला आहे. विशेषयेत् कलाः सर्वा यस्मात् तस्मात् तु कैशिकः — भ. ना. शास्त्र (१।२३) पण यांपैकी कोणीही 'कला'

किंवा ललितकला शब्दाची व्याख्या केलेली नाही. कदाचित 'लोकव्यवहारात' कला या शब्दाचा वापर इतका केला जात असावा की, एकतर त्या काळी 'कला' शब्दाची व्याख्या करण्याची गरजच पडली नसावी, किंवा कला या शब्दाची व्याख्या करणे सोपे नसावे. कलांमध्ये कोणतेही एक तत्त्व उपलब्ध होत नसल्यामुळे कलावस्तूची सम्यक् व्याख्या करणे शक्य नाही असे वामनानेही म्हटले आहे.

"न हि कलातत्त्वानुपलब्धौ कलावस्तु सम्यक् निबद्धुं शक्यमिति !"
(१-३-७ का. लं. वरील वृत्ति)

'कला' शब्द संस्कृतमध्ये निरनिराळ्या अर्थी वापरलेला दिसून येतो. कला म्हणजे 'अंश' उदा. : चंद्रकला. कलेची, 'जायते, अस्ति, परिणमते, वर्धते, अपक्षीयते व नश्यति' अशी सहा लक्षणे वाक्यपदीयात सांगितलेली आढळतात. 'कला' म्हणजे संपूर्ण जीवन नसून जीवनांश. कदाचित या अर्थी 'कला' शब्दाचा वापर 'कला' म्हणून करण्यात आला असेल. आज आपण ज्यांना कला म्हणतो त्यांत प्रत्येकी जीवनातील काही अंगच प्रतिबिंबित झालेले दिसतात. म्हणूनही कदाचित जीवनांगांच्या ह्या पुनर्दर्शनाचे 'कला' असे नामकरण झाले असावे. कला या शब्दाचे ज्ञान आणि ध्वनी असेही अर्थ आहेत. कदाचित या अर्थाचाही आज ज्या अर्थाने आपण कला या शब्दाचा उपयोग करतो त्या 'कलावस्तूच्या' सीमा मर्यादित करण्याकडे उपयोग झाला असावा (कल् म्हणजे आवाज काढणे; यावरून तर संगीत ही पहिली कला झाली नसेल ना !)

कसेही असले तरी 'कला' शब्दाने आपणास जे अभिप्रेत होते त्याची पूर्ण व्याख्या करणे कठीण दिसते. त्यामुळे कलेची व्याख्या करण्याचा मी प्रयत्न करणार नाही. पण गीत, वाद्य, संगीत, साहित्य (काव्य, नाट्य आदी), चित्र, शिल्प, वास्तू, नृत्य, नाट्य इत्यादी शब्दांनी आपणास जो 'अनुभव' येतो, त्या अनुभवविशेषांना मी 'कलाविशेष' असे नाव देतो. अशा कलाविशेषांच्या कुटुंबास मी 'कला' असे म्हणतो. या कलाकुटुंबामध्ये काही सामान्य तत्त्वे असतील आणि काही विशेष तत्त्वे पण असतील. या कलाकुटुंबातील सामान्य **तत्त्वांचे व्याख्यान** म्हणजे 'कला' होय असे म्हणता येणार नाही, कारण एकतर हे सामान्य सूत्र कलांशिवाय इतरही जीवनांगांत दिसण्याचा संभव आहे. शिवाय या कलाविशेषांचे कलात्व हे या सामान्य सूत्रावर अवलंबून असण्याऐवजी या कलाविशेषातील सामान्य-विशेषसंबंधावर अवलंबून असण्याचा संभव आहे. प्रत्येक कलाविशेष हे निरनिराळ्या, कमी–अधिक अवयवांनी निबद्ध असे अवयवी असते. संगीतात जे घटक असतील त्यापेक्षा वेगळे घटक नृत्यात किंवा काव्यात असतील. पण एका काव्यात किंवा नृत्यात जे विशेष असतील तेच दुसऱ्या काव्यात किंवा नृत्यात असतील असेही नाही. त्यामुळे प्रत्येक कलाविषयक

अनुभव ' हा एक एकजिनसी आणि अनन्य असा अनुभव असतो असे मानावे लागते. तेव्हा साऱ्या कलाविशेषांना सामान्य असे सामान्यसूत्र जरी शोधून काढले तरी, ज्याप्रमाणे पुष्पमालेतील पुष्पाची व्याख्या ज्या सूत्राद्वारे ती फुले एकत्र झाली आहेत त्या सूत्रावरून करता येणार नाही, त्याचप्रमाणे कलाकुटुंबातील सामान्यसूत्र शोधून काढले तरी त्यावरून कलेचे पूर्ण स्वरूप स्पष्ट होणार नाही.

पण तरीसुद्धा **शास्त्र**विचार हा सामान्य नियमावरच अवलंबून असतो. त्यामुळे कलाकुटुंबातील या सामान्यसूत्राचा विचार आवश्यक होणार आहे.

नृत्य, संगीत, काव्य, चित्र, नाट्य इ० कलांच्या स्वरूपाकडे दृष्टिक्षेप टाकल्यास एक गोष्ट निश्चितपणे नजरेसमोर येते. या सर्व कला म्हणजे जणू काही निर्माता आणि रसिक यांच्यामध्ये चाललेला खेळच होय. एका खेळाडूने चेंडू मारावा आणि दुसऱ्या खेळाडूने तो स्वीकारावा त्याप्रमाणे निर्माता जणू काही आपल्याजवळचे ' काहीतरी ' आपल्याजवळून दूर सारतो आणि दुसरा कोणी तरी ( रसिक, सहृदय, सभ्य काही म्हटले तरी चालेल ) त्या ' काहीतरीला ' जवळ करतो. नदी ज्याप्रमाणे एका पर्वतात किंवा सरोवरात उत्पन्न व्हावी आणि हळूहळू वाहात जाऊन समुद्रास मिळावी, त्याप्रमाणे, निर्मात्याने उत्पन्न केलेले ' काहीतरी ' हळूहळू वाहात जाऊन रसिकाच्या हृदयास मिळते. तत्त्वज्ञानाचीच भाषा वापरावयाची झाली तर, असे म्हणता येईल ' निर्मात्याजवळील काही ' सत् ' रजोगुणात्मक होऊन शेवटी रसिकाच्या ठिकाणी विलीन म्हणजे **तमो**गुणात्मक होतात. ( त्या उदाहरणाचे स्पष्टीकरण पुढे केव्हा तरी येईल. )

एकूण कोणत्याही कलेला ठोकळ मानाने खालील गोष्टी लागतात : ( १ ) निर्माता ( २ ) रसिक ( ३ ) निर्मात्याने निर्माण केलेली वस्तू आणि ( ४ ) या वस्तूचे ( निर्मात्यापासून तो रसिकापर्यंतचे ) भ्रमण अथवा व्यापार. शिवाय ही निर्माण केलेली वस्तू जर दृश्य असेल तर दिक् व काल आणि नसेल तर, नुसता काल **तसेच** नदी, नदी म्हणून दृग्गोचर होण्यापूर्वी ती ज्याप्रमाणे सरोवररूपाने, सरोवराच्या अंशरूपाने किंवा मेघाच्या रूपाने अस्तित्वात असावयास पाहिजे, आणि समुद्रात विलीन झाल्यावरही समुद्ररूपाने अस्तित्वात असावयास पाहिजे, त्याचप्रमाणे कला ही प्रथम निर्मात्याच्या मनात आणि नंतर रसिकाच्या मनात मनोरूपाने अस्तित्वात असावयास पाहिजे. ज्याप्रमाणे नदी ही केवळ मधल्या अवस्थेतच ' नदी ' या व्यक्त रूपाने अस्तित्वात राहते, त्याप्रमाणे केवळ मधल्या अवस्थेतच कला ही कोणत्या तरी व्यक्त स्वरूपात अस्तित्वात असते. हे मधले स्वरूप इतर दोन स्वरूपांपेक्षा अगदी वेगळे असते. एका रीतीने म्हणावयाचे झाल्यास केवळ हे मधले स्वरूप तेवढे खरोखर असते, आणि बाकीचे नसते किंवा केवळ कल्पनेतच असते. पण हे प्रथम किंवा तृतीय स्वरूप व्यक्त नसले तरी, ते स्वरूप संवेद्य असते, किंबहुना त्या अवस्थेचा अर्थ आपणास कळत असतो. मधली अवस्था ही व्यक्त असली तरी ती पहिली अवस्था तिसऱ्या अवस्थेस जोडणारा एक दुवा आहे. आपणास

जर एक तारायंत्रावरील संदेश एका ठिकाणाहून दुसरीकडे पाठवावयाचा असेल तर, तो संदेश मधील तार व तारेचे खांब याशिवाय पाठविता येत नाही. त्याचप्रमाणे निर्मात्याकडून रसिकाकडे जाताना आपणास काहीतरी साधन किंवा उपकरण किंवा उपादान लागत असते. द्वितीयावस्था हे ते साधन, उपकरण किंवा उपादान होय. द्वितीयावस्था ही केवळ चिन्हात्मक (Symbolic) अवस्था होय. या मधल्या अवस्थेला मी साधन म्हटले हे खरे, पण तेही ठोकळ मानानेच. कारण तिला साधन मानण्याऐवजी रूपांतर मानणेच अधिक योग्य व्हावे. रेशमाच्या किड्याचे ज्याप्रमाणे फुलपाखरू, सुरवंट...इत्यादी रूपान्तरे होतात आणि तरीसुद्धा त्यातील मुख्य तत्त्व किंवा द्रव्य (unchanging) बदलातीतच असते त्याप्रमाणे, निर्मात्याच्या मनात जन्म पावलेली ही कलारूपी वस्तू, मधल्या अवस्थेत निराळ्या अवस्थेत व्यक्त झाली तरी ती निराळी नसते. किंबहुना या मधल्या रूपाचेच खरे महत्त्व आहे. ज्याप्रमाणे तारायंत्रावर पाठविलेल्या संदेशाला आपण 'तार' असे नाव देतो, त्याचप्रमाणे निरनिराळ्या कलांचे नामकरणसुद्धा आपण या मधल्या अवस्थेवरूनच करीत असतो. उदा. चित्र, गीत इ०. तात्पर्य, या कलाव्यापारात निर्मात्याच्या मनातील संदेशाच्या तीन अवस्था होतात. ज्याप्रमाणे मधल्या अवस्थेत रेशमाचा किडा आपल्याभोवती एक कोष निर्माण करीत असतो त्याचप्रमाणे या मधल्या अवस्थेत निर्मात्याच्या मनातील मानसिक वस्तू जणू काही आपल्याभोवती एक वस्त्वात्मक कोष निर्माण करीत असते. पण ज्याप्रमाणे रेशमाच्या किड्याच्या अवस्था वेगळ्या असल्या तरी किडा एकच आणि तोच असतो त्याप्रमाणे कलेच्या तीन अवस्था जरी भिन्न दिसल्या तरी, एका दृष्टीने त्यांच्यात अभेद असतो. त्यामुळे १ ली अवस्था = २ री अवस्था = ३ री अवस्था असे समीकरण मांडता येणे शक्य आहे. पण असे समीकरण जरी मांडता आले तरी, १ ली अवस्था = २ री अवस्था = ३ री अवस्था असे सममूल्यीकरण मात्र कोणासही कल्पिता येऊ नये. या तीन अवस्थांत समीकरण होऊ शकल्यामुळेच यांपैकी कोणत्याही अवस्थेला 'त्र्यवस्थात्मक' मानण्यात काहीच गैर नाही. पण यांपैकी प्रत्येक वस्तू किंवा अवस्था ही त्र्यवस्थात्मक आहे, हे म्हणणे वेगळे, आणि ती एकच आहे हे म्हणणे वेगळे. ह्या तीन अवस्था 'कालबद्ध' आहेत, हा येथे लक्षात ठेवण्याचा मुद्दा. अर्थात याचे विवेचन पुढे येईलच. कलेचे हे त्र्यवस्थात्मक स्वरूपच "एवं रसाश्च भावाश्च **त्र्यवस्था** नाटके स्मृताः" या आणि अशाच इतर काही कारिकांद्वारे सांगण्याचा भरतमुनींनी प्रयत्न केला; आणि कलेच्या याच त्र्यवस्थात्मक स्वरूपाचे आणि व्यापारात्मकतेचे श्रीअभिनवगुप्तांनी आपल्या प्रसिद्ध लोचन टीकेच्या सुरुवातीसच 'सरस्वत्यास्तत्त्वम् कविसहृदयाख्यम् विजयते' असे वर्णन केलेले आहे.

वरील चर्चेचा निष्कर्ष असा की, कलेत निर्मात्यापासून तो सहृदयापर्यंतचा व्यापार अंतर्भूत आहे. हा व्यापार ज्या माध्यमाद्वारेच चालत असेल ते माध्यम म्हणजे कला-

विशेष. या माध्यमाद्वारेच एक कलाविशेष किंवा कलावस्तू दुसऱ्या कलाविशेषाहून किंवा कलावस्तूहून भिन्न ठरते. या माध्यमालाच कधीकधी कला या शब्दाने संबोधिले जाते, आणि या मर्यादित अर्थीच मी पण कला या शब्दाचा इतउत्तर प्रयोग करणार आहे.

या मर्यादित अर्थाने कलेकडे पाहिले म्हणजे कलेची आर्थिक माध्यमाशी–पैशाशी तुलना करता येईल. जर एका माणसाला गहू पाहिजे असतील आणि त्याजजवळ जर तांदूळ असतील आणि दुसऱ्या माणसाला जर तांदूळ हवे असतील आणि त्याच्याजवळ जर गहू असतील तर, त्यांच्यात अदलाबदलीचा व्यवहार होऊ शकतो. पण पैशाचा उपयोग केला, तर ही देवघेव कमी दगदगीची होते. याचकरिता व्यवहारास सुलभ अशा **पैशाचा** जन्म झाला. पैशाचे खरे कार्य दोन माणसांची सोय पाहणे व त्यांच्यात देवाणघेवाण घडवून आणणे एवढेच आहे. साध्या देवीघेवीत हे माध्यम व्यक्त झाले नसते. पैशाची निर्मिती केल्याबरोबर हे साधन व्यक्त-दृश्य होते.

कलेचेही असेच आहे. निर्मात्याच्या मनातील संदेश कलामाध्यमातून वाहात जाऊन सहृदयाला प्राप्त होतो. परंतु अर्थव्यापार ( Economic ) व कलाव्यापार ह्यांच्यात एक फरक आहे. अर्थव्यापारात किंवा व्यवहारात देवाणघेवाण असते, कलाव्यापारात अशी देवाणघेवाण केवळ टोकळ मानानेच असते, असे म्हणावे लागेल. येथे बहुधा देवाणच असते. येथे वाहतूक फक्त एकतर्फीच चालते. ( जरी कदाचित येथे घेवाण झालीच तर ती निराळ्या प्रकारची राहील. रसिकाच्या आनंदात आनंद अशा प्रकारची ही घेवाण राहील. ) त्यातही माध्यमाचे स्वतंत्र अस्तित्व प्रत्येक कलेत व्यक्त होईलच असे नाही.

गायनासारख्या कलेत हे माध्यम जणू काही निर्मात्याला–कलाकाराला–चिकटलेलेच असते. ते निर्मात्यापासून वेगळे असे केवळ एकदाच करिता येते. पण ते वेगळे होत असताना स्वतंत्रपणे अस्तित्वात राहात नाही, तर उत्पन्न झाल्याबरोबरच अन्तर्धान पावत असते. ( विद्युतश्रवणलहरींच्या योगाने आता ही उत्पन्न झालेली कला जीवन्त ठेवता येते व म्हणून कदाचित हे विवेचन विसाव्या शतकात बरोबर भासणार नाही ) परंतु कलेचे रूप स्पष्ट होण्याकरिता अशा विवेचनाची गरज आहे असे मला वाटते. उलट चित्रकलेत हे माध्यम कलाकाराला चिकटलेले असते, असे म्हणता येणार नाही. ते चित्रकारावर निर्मितीकरिता जरी अवलंबून असले, तरी अस्तित्वाकरिता ते त्याच्यावर अवलंबून राहात नाही. लिपीमुळे काव्यही असेच कवीवर अवलंबून राहात नाही. कवी पंचत्वास गेला तरी काव्य अस्तित्वात असू शकते. अनेक कलाप्रकारांतील माध्यमाचे मिळून उत्पन्न झालेले पुष्ट माध्यमसुद्धा कधी कधी एखाद्या कलेत माध्यम झालेले आढळते. उदा. वादनकलेत अनेक वाद्यांचा मिळून एक Orchestra होऊ शकतो. संगीत आणि नृत्यात अनेक माध्यमांचा उपयोग केला जातो. नाट्यात तर कला, साहित्य, अभिनय, संगीत, नृत्य इ. सर्वांचाच त्याचप्रमाणे नटनटींचाही उपयोग या संदेशप्रेषणा-करिता केला जातो.

या दृष्टीने विचार केला, तर कला ह्या खेळासारख्या आहेत. काही खेळांत खेळणारे आपणच असतो, तर काही खेळांत आपण दुसऱ्यास खेळावयास लावतो; दुसऱ्याचा खेळ हा आपल्या खेळातील भाग होतो. शिवाशिवीच्या खेळात, खेळणाऱ्यापासून, खेळण्याचे माध्यम वेगळे करिता येत नाही; टेनिसच्या खेळात मात्र टेनिसचा चेंडू व रॅकेटस् हे खेळाडूपासून वेगळे करता येतात. बुद्धिबळाच्या खेळात खेळणारे आपण असलो तरी, जणू काही बुद्धिबळातील राजे, राण्या, प्यादे, हत्ती, उंट इत्यादी स्वतंत्र एक खेळ खेळत असतात, तर घोड्यांच्या आदी शर्यतीत खेळ खेळणारे दुसऱ्याकडून तो खेळ खेळून घेत असतात. नाट्यात अशा प्रकारची स्थिती दृग्गोचर होते. नाट्यातील मुख्य खेळाडू निर्माता आणि प्रेक्षक पण यांच्या बरोबरच सूत्रधार, नटही आपसात एक प्रकारचा खेळ खेळतच असतात. पण नटांचा आपसात चाललेला खेळ हा महत्त्वाचा खेळ असला तरी तो खेळ म्हणजे संपूर्ण नाट्य नव्हे. नटांच्या खेळाच्या माध्यमातून मुख्य खेळ चालतो तो नाटककार (निर्माता) व प्रेक्षक ह्यांच्या मध्ये. कवीला जो संदेश शब्दातून द्यावयाचा असतो तोच संदेश नाटककाराला नाट्यातून द्यावयाचा असतो. कवीला ज्याप्रमाणे या संदेशाकरिता शब्दात्मक भाषेचा उपयोग करावा लागतो, त्याचप्रमाणे नाटककाराला नाट्य-माध्यमाचा उपयोग करावा लागतो. हे नाट्य-माध्यम ही एक प्रकारची भाषा आहे-असे म्हटले तरी चालावे. या माध्य-मातील भेदामुळेच नाटक-शब्दात लिहिलेले–आणि नाट्य–प्रयोगित केलेले–यांच्या कलास्वरूपात फरक पडतो. तात्पर्य, प्रत्येक कलेत निर्मात्याला काहीतरी संदेश पाठ-वावयाचा असतो. निवेदन करावयाचे असते. कलामाध्यम हे या संदेश वाहकाचे काम करते. कलेचे हे कार्य खेळाशी किंवा भाषेशी बरेच जुळते आहे. म्हणून एका दृष्टीने कला ही भाषाप्रकार किंवा खेळाचा प्रकार आहे, असे म्हटले तरी चालावे. अर्थात कलेत व साधारण भाषेत किंवा खेळात काहीच फरक नसतो असे म्हणता येणार नाही.

येथे असा एक मुद्दा उत्पन्न होण्याचा संभव आहे की, जर कला ही व्यापारात्मक आहे, तर, जर रसिक नसेल तर, कला अस्तित्वात येणार नाही काय? जेव्हा एखादा गायक स्वतःकरिताच गाणे म्हणतो, किंवा एखादा चित्रकार एखादे चित्र चितारतो, तेव्हा त्याची कला रसिकसापेक्ष असते काय? कला ही जर भाषाच असेल आणि कलेतून जर आपले मनोगतच सांगावयाचे असेल, तर आपले मनोगत स्वतःला सांगण्या-करिता अभिव्यक्त स्वरूपाची गरज का? यावरून असा निष्कर्ष काढला जातो की, कला म्हणजे खरोखर अभिव्यक्तीच होय, आणि एका दृष्टीने हे खरेही आहे. पण आपण निर्माण केलेल्या 'व्यक्त स्वरूपात'–वस्तूत आपणास जे सांगावयाचे आहे त्याची योग्यता आहे किंवा नाही हे जाणण्याची इच्छा असतेच. याचकरिता निर्माता आपण निर्माण केलेल्या वस्तूत निवेदन-संप्रेषण–शक्ती आहे किंवा नाही हे जाणण्याचा प्रयत्न करीत असतो. ज्याप्रमाणे रुपया खरा की खोटा एवढेच आपण पाहात असतो.

अनुक्रमणिका

तो जर खरा असेल तर वस्तू विकत घेण्याची शक्ती त्यात आहे असे आपण समजतो; प्रत्यक्ष उलाढालीची तेथे गरज नसते. त्याचप्रमाणे अभिव्यक्ती जर प्रभावी असेल तर, तिच्यात संप्रेषणशक्ती असलीच पाहिजे असे आपण समजून चालतो. अभिव्यक्तीतून संदेश-प्रत्यय येतो किंवा नाही हे निर्मात्याला याकरिताच पाहावे लागते; हे पाहणे केवळ परीक्षारूप असते. 'कला' व्यापारात्मक नसते असे यावरून निघत नाही. उलट व्यापारात्मकता, आणि अभिव्यक्तिस्वरूपता हे दोनही कलेचे गुणधर्म असतात असे म्हणता यावे.

तात्पर्य, व्यापक अर्थाने 'कला' हा व्यापार आहे. हा व्यापार तीन अवस्थांतून होतो. प्रथमावस्था मानसिक व निर्मात्याच्या मनोऽन्तर्गत असते; हीच अवस्था दुसऱ्या अवस्थेत वस्तुस्वरूपात अभिव्यक्त होते आणि हीच वस्तू परत आस्वाद–ज्ञानरूपाने रसिकास ज्ञात होते. ह्या तीन अवस्था म्हणजे तीन वस्तू नव्हेत. एकाच वस्तूच्या त्या तीन अवस्था आहेत. त्यामुळे या तीन अवस्थांचे एकच वस्तू म्हणून कधी कधी वर्णन केले जाऊ शकते, कारण त्यातला अर्थ–संदेश एकच असतो. परंतु कालमर्यादित व स्वरूपमर्यादित असल्यामुळे या तीन अवस्थांचे वेगळेपणही मान्य करावे लागते. त्यांचे अभेदत्व कल्पिता येऊ नये. मर्यादित अर्थाने या तीन अवस्थांपैकी अभिव्यक्त वस्तुरूप मध्यम अवस्था हीच कला होय.



## साभार पोच

१. **मराठी नियतकालिकांची सूची : ( १८००–१९५० ) द्वितीय खंड –** पहिला भाग. संपादक : शं. ग. दाते; दि. वि. काळे; शं. ना. बर्वे; पृ. ७६७, किंमत ७५–० रु.

२. **दलितांचे राजकारण :** दादूमिया; मॅजेस्टिक बुकस्टॉल; मुंबई ४; पृ. १९५, किंमत १५–० रु.

३. **नाटक – एक चिंतन :** वसंत कानेटकर; नीलकंठ प्रकाशन, पुणे ३०; पृ. ६८, किंमत ५–० रु.

४. **भगवद्गीतेचे तीन टीकाकार :** डॉ. वि. रा. करंदीकर, केसरी प्रकाशन, पुणे ३०; पृ. ३५०, किंमत २५ रु.

५. **कविवर्य तांबे – साहित्यविचार :** संपादक : रा. अ. काळेले आणि वा. रा. ढवळे, तांबे जन्मशताब्दी प्रकाशन, किंमत १५ रु.



अनुक्रमणिका

# कै. डॉ. शं. दा. पेंडसे : श्रद्धांजली

## डॉ. वि. वा. प्रभुदेसाई

क. डॉ. शं. दा. पेंडसे हे संतवाङ्मयाचे प्रगाढ अभ्यासक, मराठी विषयाचे कुशल अध्यापक आणि एक अत्यंत प्रभावी वक्ते या नात्याने महाराष्ट्राला सुपरिचित होते. महामहोपाध्याय श्री. दत्तो वामन पोतदार यांनी डॉ. पेंडसे यांचे वक्तृत्व किती परिणामकारक होत असे ह्याचे वर्णन करताना त्याला 'नटनागर' म्हटले आहे, त्याचे येथे स्मरण होते. डॉक्टरसाहेबांच्या एकूण ग्रंथसंपदेचा परिचय करून द्यावयाचा झाल्यास मोजून 'एकादश नामे' घ्यावी लागतील, ती अशी :– (१) महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास, (२) ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान, (३) हिंदुस्थानातील धार्मिक इतिहासाचे सामान्य निरीक्षण, (४) ज्ञानेश्वरीचा अभ्यास, (५) मराठी संत–काव्य आणि कर्मयोग, (६) वैदिक वाङ्मयातील भागवतधर्माचा विकास, (७) पौराणिक भागवतधर्म, (८) ज्ञानदेव आणि नामदेव, (९) भागवतोत्तम संत श्रीएकनाथ, (१०) साक्षात्कारी संत तुकाराम, (११) राजगुरू समर्थ रामदास. हे सगळे ग्रंथलेखन मोजक्याच विषयांवरचे असले तरी ते अत्यंत भरीव असेच उतरले आहे.

श्री. शं. दा. पेंडसे यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यातील खेड या गावी दि. २८ फेब्रुवारी १८९७ रोजी झाला आणि पुणे मुक्कामी दि. २३ ऑगस्ट १९७४ रोजी त्यांनी आपली इहलोकीची यात्रा संपविली.

प्रा. दे. द. वाडेकर यांनी 'डॉ. शं. दा. पेंडसे गौरव-ग्रंथा'साठी लिहिलेल्या लेखात, "डॉ. पेंडसे हे एका विशिष्ट अर्थाने बृहन्महाराष्ट्रीय किंवा सार्वमहाराष्ट्रीय आणि सार्वभारतीय आहेत," असे जे विधान केले आहे ते अत्यंत सार्थ वाटते.

कोकण ही त्यांची जन्मभूमी तर विदर्भ ही कर्मभूमी ठरली आणि त्यांना मृत्यू आला तो श्रीज्ञानेश्वरांच्या समाधीने पावन झालेल्या आळंदीच्या जवळच पुण्यात. 'श्रीज्ञानेश्वर माऊली' हे डॉक्टरसाहेबांचे आराध्य दैवत असून त्यांनी आपल्या वास्तूचे नाव देखील 'माऊली' असेच ठेवले होते, या गोष्टीकडे लक्ष वेधावेसे वाटते.

अनुक्रमणिका

नागपूर विद्यापीठातील मराठी विषयाच्या अध्यापनाची मुहूर्तमेढ रोवण्याचे श्रेय जसे प्रा. पेंडसे यांच्याकडे जाते, तसेच त्या विद्यापीठातील मराठीच्या एम. ए. परीक्षेसाठी बसलेल्या पहिल्या तुकडीतून प्रथम श्रेणीत प्रथम येऊन १९३० सालचे मराठीचे ना. के. बेहरे सुवर्णपदक मिळविण्याचा बहुमानही त्यांच्याकडेच जातो. त्यानंतर १९३९ साली नागपूर विद्यापीठातील मराठी विषयाची पहिली डॉक्टरेट (पी.एच. डी.) पदवी मिळवून प्रा. डॉ. पेंडसे यांनी या अध्ययन-अध्यापनाच्या क्षेत्रात जणू तिहेरी मुकुटच संपादला, असे म्हणावे लागेल! महाराष्ट्रात, पदवीपरीक्षेसाठी मराठी या विषयाचा अंतर्भाव करणारे सर्वांत जुने म्हणजे मुंबई विद्यापीठ होय. एन. ए. च्या परीक्षेसाठी मराठीच्या तीन प्रश्नपत्रिका असाव्यात ही श्री. चिमणलाल सेटलवाड यांची सूचना १९०० साली मान्य होऊन १९०२ साली प्रत्यक्ष या अभ्यासक्रमाला प्रारंभ झाला होता. महाराष्ट्रातील त्यानंतरच्या जुन्या अशा नागपूर विद्यापीठाची स्थापनाच मुळी १९२३ सालची आहे. या विद्यापीठात मराठी भाषेला प्रतिष्ठा प्राप्त होण्यासाठी प्रा. पेंडसे यांच्यासह अनेक भाषाभिमान्यांना जाणीवपूर्वक सतत प्रयत्न करावे लागले होते. श्री. अ. सी. साठे आणि श्री. नी. ब. भवाळकर या उभयतांनी त्या वेळी बी. ए. व एम. ए. परीक्षांसाठी मराठीचा भरगच्च अभ्यासक्रम आखून विद्यापीठातील दुसऱ्या कोणत्याही विषयापेक्षा मराठीचा अभ्यासक्रम गुणवत्तेच्या दृष्टीने (कोणत्याही प्रकारे) कमी दर्जाचा नाही हे साधार दाखवून दिले होते. त्यानंतर मराठी या विषयाचे बी. ए. च्या परीक्षेसाठी अध्यापन प्रथमतः नागपूरच्या हिस्लॉप कॉलेजात १९२७ च्या जून मध्ये प्रा. शं. दा. पेंडसे यांनीच सुरू केले. तेच महाविद्यालयीन पातळीवरील विदर्भातले पहिले मराठीचे प्राध्यापक होत.

नागपूर विद्यापीटात एम. ए. परीक्षेसाठी मराठीचे अध्यापन हे १९२८–२९ साली त्या वेळच्या मॉरिस कॉलेजमध्ये प्रा. श्री. ना. बनहट्टी यांनी सुरू केले. त्यानंतर १९३० पासून प्रा. पेंडसे हेही एम. ए. ला शिकवू लागले. तेव्हापासून १९६७ पर्यंत (म्हणजे एकंदर तीन तपे) डॉ. पेंडसे यांनी नागपूर विद्यापीठातील एम. ए. च्या वर्गांना शिकवून पी.एच. डी. च्या अनेक विद्यार्थ्यांना मार्गदर्शनही केले आहे. विदर्भातील (जुन्या मध्यप्रदेशातील) जुन्या पिढीतल्या प्रा. भ. श्री. पंडित, डॉ. वि. भि. कोलते यांच्यापासून नव्या पिढीतील प्रा. सुरेश डोळके, डॉ. वि. बा. प्रभु देसाई, डॉ. द. भि. कुळकर्णी यांच्यापर्यंतच्या मराठीच्या अनेक प्राध्यापकांवर डॉ. पेंडसे यांच्या अध्यापनाचे संस्कार झालेले आहेत. त्यांचे मार्गदर्शन अशा या तीन पिढ्यांना लाभलेले आहे.

प्रा. डॉ. पेंडसे यांनी मराठी विषयाच्या अध्यापनाचे बीजारोपण जसे नागपूर विद्यापीठात मोठ्या उमेदीने केले, तसेच आपण लावलेले हे रोपटे प्रचंड अशा वटवृक्षाच्या रूपाने फुलाफळांनी कसे बहरून येईल, याचीही त्यांनी आयुष्यभर चिंता वाहिली. प्रस्तुत संदर्भात, संस्कृताभिमान्यांच्या अट्टाहासामुळे निर्माण झालेला एक गंभीर पेच-

प्रसंग येथे निवेदन करावासा वाटतो. त्यावरून डॉ. पेंडसे यांची महत्त्वपूर्ण कामगिरी ध्यानात येईल.

नागपूर विद्यापीठातील . इंटरच्या अभ्यासक्रमात मराठीला एक वैकल्पिक विषय म्हणून मागेच मान्यता मिळालेली होती. पुढे १९४५ च्या सुमारास फॅकल्टी ऑफ आर्ट्सने नेमलेल्या रीग्रूपिंग कमिटीने मराठीच्या अध्ययनावर निर्बंध घालणाऱ्या ज्या काही शिफारशी केल्या होत्या त्या अशा : "जे विद्यार्थी संस्कृत हा वैकल्पिक विषय म्हणून घेतील किंवा ज्यांनी इंटरच्या परीक्षेत संस्कृत घेतले असेल किंवा जे संस्कृताचा स्पेशल पेपर घेतील, त्यांनाच बी. ए. ला मराठी विषय घेऊ देण्यात येईल. यामुळे मराठीचा अभ्यास अधिक पूर्ण होईल व संस्कृत घेणारांची संख्या घटते आहे ती थांबेल."

या शिफारशी जशाच्या तशा मान्य झाल्या असत्या तर केवळ मराठीचीच नव्हे तर एकंदर लोकभाषांचीच विद्यापीठातून उचलबांगडी झाली असती! माय मराठीच्या अस्तित्वावरच अशा प्रकारे गदा आली असताना तिचे पराक्रमी सुपुत्र डॉ. पेंडसे यांनी या घोर अन्यायाविरुद्ध जनमत जागृत करण्यासाठी म्हणून नागपूरच्या "**तरुण भारत विशेषांक १९४५**" मध्ये "**नागपूर विद्यापीठ आणि मराठी भाषा**" या शीर्षकाचा एक अत्यंत मुद्देसूद व आवेशपूर्ण लेख लिहिला होता. डॉक्टरसाहेब हे स्वतः पट्टीचे संस्कृत पंडित असून या भाषेशी संबंधित अशा 'वेदान्ततीर्थ', 'शास्त्री', 'एम. ए.', 'एम. ओ. एल.' अशा अनेक पदव्यांनी विभूषित होते. दोन्ही भाषा सारख्याच प्रिय असताना सापडलेल्या या शृंगापत्तीत शास्त्रीबुवांनी (प्रा. पेंडसे हे 'शास्त्रीबुवा' या नावानेही परिचित होते) निस्संदिग्धपणे कैवार घेतला तो मात्र मराठीचाच! सदरहू लेखात त्यांनी मराठीची वकिली करताना समर्पक युक्तिवाद केला तो असा :—

"मराठीचा अभ्यास पूर्ण (थरो) होण्याला संस्कृतची मुळीच आवश्यकता नाही. मराठीने संस्कृत व इंग्रजीतील उत्कृष्ट विचार आत्मसात केले असून ते व्यक्त करण्याच्या दोन्ही भाषातील शैलीचा स्वीकार केला आहे. त्यामुळे संस्कृत विद्यार्थ्यांना मराठी विषय आवश्यक केला, तर पूर्णतेच्या (थरोनेस) दृष्टीने इष्ट होईल. पण उच्च शिक्षणात सक्ती नसावी व केवळ भाषा विषयांचा ग्रॅज्युएट चौरस होत नाही, म्हणून संस्कृत घेणाऱ्या विद्यार्थ्यांवर मराठी घेण्याची सक्ती करू नये. याच्या उलट मराठी घेणाऱ्या विद्यार्थ्यांवर संस्कृत घेण्याची सक्ती करणे संस्कृतीच्या किंवा पूर्णतेच्याही दृष्टीने जरूर नाही. मराठीने संस्कृतमधील घटपटादी खटपट आणि क्लिष्ट व्याकरण तेवढे गाळले. पण या गोष्टी संस्कृतीला आवश्यक नाहीत. मराठीत 'भाषाशास्त्र' या विषयात आवश्यक तेवढ्या संस्कृत, प्राकृत व पाली व्याकरणाचा समावेश एम. ए. च्या परीक्षेत आपोआपच होतो. त्याकरिता बी. ए. च्या विद्यार्थ्यांवर संस्कृतची सक्ती करण्याची मुळीच आवश्यकता

नाही. मराठीचा अभ्यास पूर्ण ( खरा ) होण्याला जर संस्कृतची आवश्यकता असेल तर इंग्रजी या विषयाला लॅटिन किंवा ग्रीक घेण्याची सक्ती बी. ए. मध्ये का करीत नाही? तसेच बी. ए. करता जे विद्यार्थी मराठी व संस्कृतही न घेता तत्त्वज्ञान, अर्थशास्त्र, इतिहासादी इतर विषय घेतात, त्यांना जर त्या विषयामुळे पुरेशी संस्कृती मिळू शकते, तर संस्कृतच्या ऐवजी वरील विषयांपैकी कोणताही एक विषय मराठी घेणाराने निवडला, तर त्याला पुरेशी संस्कृती का मिळू नये?"

"संस्कृत-मराठीच्या या सहा शतकांच्या लढ्याचे खरे स्वरूप अद्यापि पुष्कळांच्या लक्षात आलेले नाही. वरपांगी हा भाषांचा लढा दिसत असला तरी वस्तुतः तो वरिष्ठ वर्ग ( क्लासेस ) आणि कनिष्ठ मानलेले वर्ग ( मासेस ) यांमधील लढा आहे. संस्कृत ही पंडितांची भाषा वरिष्ठ वर्गांना प्रिय असली, तरी मराठी ही कोट्यवधी मराठी बहुजनसमाजाची आवडती मातृभाषा आहे. 'ये मराठीयेचे नगरीं। ब्रह्मविद्येचा सुकाळ करीं' अशा उद्देशाने तर ज्ञानेश्वरांनी गीतेवर मराठी टीका लिहिली. प्रत्येक मोठ्या मराठी ग्रंथकाराला आपल्या ग्रंथात **'संस्कृत भाषा देवें केली। आणि मराठी काय चोरें आणिली॥'** अशा अर्थाची तुलना करावी लागली आणि मराठीची संस्कृत भाषेशी बरोबरी सांगावी लागली. यावरून संस्कृतचा जुलूम केवढा असला पाहिजे, याची कल्पना करता येते. आज जसा इंग्रजी माध्यमाचा जुलूम आहे, तसा पूर्वी संस्कृत माध्यमाचा होता. या जुलमाविरुद्ध बंड पुकारून जनतेच्या पुढाऱ्यांनी ज्ञानाची कोठारे फोडली आणि मराठी माध्यमाच्या द्वारे ब्रह्मविद्येचा सर्वत्र सुकाळ करून सोडला. इंग्रजीचा जुलूम जसा तिच्यावर होत आहे, त्याप्रमाणे संस्कृताचाही व्हावा, असा प्रयत्न विद्यापीठातील पंडितांनी आज चालविला आहे. पण त्यांनी हे लक्षात घ्यावे की, असा जुलूम फार दिवस करता येणार नाही. जबरदस्तीने संस्कृत लादल्यामुळे त्याविषयी लोकांच्या मनात अप्रीती मात्र वाढेल. आजपर्यंतच्या प्रगतिपर धोरणाने मिळालेला लौकिक प्रतिगामी धोरण स्वीकारून नागपूर विद्यापीठाने घालवू नये आणि तुम्ही संस्कृत घेणार नाही तर तुम्हाला मराठीही घेऊ देणार नाही, असे म्हणून मराठीचा अभ्यास करणे अशक्य करू नये, अशी त्याला कळकळीची विनंती आहे."

डॉ. पेंडसे यांनी अन्य मराठी भाषाभिमान्यांच्या साहाय्याने अगदी वेळेवर केलेल्या अविरत प्रयत्नामुळेच मराठीवर येऊ घातलेले हे गंडांतर वेळीच कायमचे दूर झाले! गतकाळाचे सिंहावलोकन केल्यास डॉक्टरसाहेबांच्या या कामगिरीला अनन्यसाधारण असेच महत्त्व द्यावे लागेल.

कै. वि. ल. भावे यांच्या 'महाराष्ट्र सारस्वत' या ग्रंथातील रामदास-तुकाराम तुलनेचा भाग पुणे विद्यापीठाच्या अभ्यासक्रमातून गाळण्यात आल्यामुळे अलीकडे वादंग माजले होते. त्या वेळीही आपली व्यथा डॉक्टरसाहेबांनी मला लिहिलेल्या खाजगी पत्रातून व्यक्त केली होती.

डॉ. पेंडसे यांनी आपल्या हयातीत केलेला ग्रंथलेखनाचा संकल्प पूर्णपणे सिद्धीला गेला आहे. मला पाठविलेल्या दिनांक १५ एप्रिल १९७४ च्या पत्रात कृतार्थतेच्या भावनेने गुरुवर्यांनी लिहिले आहे, "ईश्वराच्या कृपेने व सत्पुरुषांच्या आशीर्वादाने संकल्पित कार्य सिद्धीला जाऊन रघुनाथकृपेची प्रचीती आली. यात्र कार्याकरिता ईश्वराने मला दीर्घायुष्य दिले होते. ते कार्य संपल्यामुळे त्याच्या आज्ञेची वाट पाहात समाधानाने राहिलेले दिवस काढावयाचे आहेत. कारण प्रकृती फार ढासळली आहे. तथापि, '**आता होणार तें होयेना का। जाणार तें जायेना का। फिटली मनांतील आशंका। जन्ममृत्यूची**' या समर्थांच्या ओवीनेच मी नवीन पुस्तकाची बरगुती प्रस्तावना संपवली आहे."

गुरुवर्य डॉ. शं. दा. पेंडसे यांचे आदर्श जीवनकार्य त्यांच्या असंख्य चाहत्यांना सदैव स्फूर्तिदायक ठरेल.



## आगामी अंकात ( मार्चमध्ये प्रसिद्ध होईल )

**१९७२ मधील वाङ्मय-समालोचने**

कादंबरी — डॉ. एस्. एस्. भोसले
कविता — प्रा. गंगाधर पानतावणे
नाटक — डॉ. वि. भा. देशपांडे
टीकालेखन — प्रा. यशवन्त मनोहर

याशिवाय डॉ. वसन्त जोशी, डॉ. यू. म. पठाण, डॉ. सुधीर रसाळ इ.

**परीक्षणे :**

महाराष्ट्राचे विचारधन ( ग. त्र्यं. माडखोलकर ) :
डॉ. य. दि. फडके

मराठवाडा संशोधन वार्षिक ( संपा. सु. ग. जोशी ) :
डॉ. वसन्त जोशी

दत्तरांची धर्ममीमांसा ( डॉ. सुरेश शेळके ) :
डॉ. अ. ना. देशपांडे

अनुक्रमणिका

# ग्रंथपरीक्षण

रा. श्री. जोग / सौ. सुहासिनी लहू / म. सु. पाटील / सौ. उषा दा. कुलकर्णी
डॉ. सुधाकर के. भोसले / मु. मु. सोवनी / वासू देशपांडे



## छत्रपति शिवाजी भारत / अध्याय ४१ ते ४४
### कवि श्री. विष्णु सखाराम घाटे

छत्रपती शिवाजी महाराजांच्या राज्यारोहणाच्या त्रिशतसांवत्सरिक महोत्सव-वर्षामध्ये प्रकाशित झालेले हे पुस्तक म्हणजे एका मोठ्या काव्याचा एक लहानसा खंड आहे. त्यात छत्रपतींच्या राज्यारोहणाचा भाग यावा हे प्रसंगोचितच होते. प्रस्तुत चार अध्यायांत अभिषेकाची पूर्वसिद्धता, प्रत्यक्ष अभिषेकोत्सव, अभिषेकाची फलश्रुती हे तीन विषय साहजिकच एकेका अध्यायातून आले आहेत. परंतु या प्रसंगाचा भाग नसताही त्यानंतर लगेच झालेली जिजाईच्या जीवनाची अखेरही चौथ्या अध्यायात वर्णून हा खंड पुरा केला आहे. शंभर पृष्ठांच्या या खंडात जवळजवळ चौदाशे आर्या आल्या आहेत. प्रकाशकांच्या निवेदनावरून ते समग्र स्वरूपात १३००० आर्यांचे महाकाव्य आहे आणि त्याचे एकसष्ट अध्याय झाले आहेत. शिवाजीचे जीवन हा महाकाव्यास योग्य असा विषय आहे हे गेल्या शतकातील कै. म. मो. कुंटे यांच्यापासून अनेक कवींना वाटत आले आहे, आणि त्यांचे सबंध चरित्र पेलणे हे जरी शक्य झाले नाही, तरी अनेकांनी त्याचा एखादा अंश घेऊन आपापली कथाकाव्ये लिहिली होती. अगदी अलीकडे कवी यशवंत आणि ना. रा. मोरे यांनी संपूर्ण शिवरायचरित्र काव्यबद्ध केले आहे हे प्रसिद्धच आहे. त्याच हेतूने श्री. वि. स. घाटे यांनीही आपल्या वार्द्धक्यात ( ते आता ८७ वर्षांचे आहेत ) हे शिव छत्रपतिचरित्र लिहून पुरेही केले आहे ( १९७१ ). आजच्या प्रकाशनाच्या परिस्थितीत ते समग्र प्रकाशित करणे सर्वच दृष्टींनी किती जिकिरीचे आहे याची कल्पना सर्वच साहित्यिकांस आहे. तेव्हा समग्र नसले, तरी प्रस्तुत प्रसंगास अनुरूप असा भाग तरी प्रसिद्ध व्हावा या मनीषेने ते आणि त्यांचे स्नेही यांनी हे चार अध्यायांचे पुस्तक प्रकाशित केले आहे. ( त्यांचा ‘ शिवरायाचा तानाजी ’ हा भाग १९६५ मध्येच प्रकाशित झाला आहे. )

या समग्र काव्यात एका आर्यावृत्ताचाच उपयोग कवीने केला आहे. याबाबत कविवर्य मोरोपंत हे त्यांचा आदर्श असावे असे वाटते. त्यांच्या ' आर्याभारता 'प्रमाणे घाटे यांनी आपल्या काव्यास ' शिवाजी-भारत ' असे नावही दिले आहे. मोरोपंतांची अनेकाक्षरी यमकांची आसक्ती मात्र त्यांनी स्वीकारली नाही. त्यामुळे ही कविता मोरोपंती कवितेपेक्षा स्वाभाविकपणेच सुगम झाली आहे. तथापि या काव्यातही संस्कृतप्रचुरता आणि भाषेची प्रौढीही बरीच आली आहे. एवढीही संस्कृतप्रचुरता आजच्या मराठी वाचकास पचेल असे वाटत नाही. पंतांप्रमाणेच कथानिवेदन हीच या कवीचीही प्रमुख दृष्टी दिसते. मात्र उपमारूपकादींनीही हे निवेदन सजविलेले आहे. शिवचरित्र हे अनेक अद्‌भुत प्रसंगांनी भरलेले असल्याने केवळ कथानिवेदनही वेधक व रंजक व्हावे हे स्वाभाविक आहे. तसे ते ( शितावरून भाताची परीक्षा करावयाची झाल्यास ) या काव्यातही होत असेल यात शंका नाही. महाकाव्याची प्रदीर्घता या कवितेत आहेच, परंतु महाकाव्यात यावेत असे जे प्रसंग पूर्वीच्या साहित्यज्ञांनी सांगितले आहेत, ते बहुतेक सारे यात आल्याने ते जुन्या तंत्रदृष्टीने खरोखर महाकाव्य झाले आहे. विठ्ठलसामराजांसारख्या जुन्या मराठी कवींच्या ७-८ सर्गांच्या काव्यास ' महाकाव्य ' मानणारे काही रसिक आपल्यात होऊन गेले आहेत. प्रस्तुत महाकाव्य खंडस्वरूपातही पाहिले, तरी या जुन्या कवींच्या काव्यापेक्षा महाकाव्य-पदवीस यशवंत व मोरे यांच्या काव्यांप्रमाणेच अधिक पात्र ठरावे. शिवचरित्र हे केवळ एका कवीचे चरित्र नव्हे. ते एका ( मराठी ) समाजाचे सामूहिक असे उत्थान होते आणि म्हणून इंग्रजी एपिक-कल्पनेस धरूनही ते महाकाव्य ठरते. या काव्याचे ' **शिवाजी-भारत** ' असे जे नाव आहे ते या दृष्टीने समर्पकच होईल. कारण एपिकची कल्पना आपल्याकडील भारत या शब्दानेच खरोखर येऊ शकते. प्रस्तुत काव्याची तेरा हजार ही आर्यासंख्या आणि एकसष्ट ही अध्यायसंख्याही संस्कृत पंच-महाकाव्यांपेक्षा ' भारत ' या नावास अनुरूप अशीच ठरते.

भारत हे आपल्याकडे काव्यापेक्षा इतिहासच म्हटले जाई. प्रस्तुत काव्य हा इतिहासही आहे. ऐतिहासिक दृष्ट्या ते निर्दोष ठरावे अशी काळजी कवीने घेतलेली दिसते. निर-निराळ्या घटनांचे काळ त्याने वेळोवेळी मुद्दाम वर्षतिथींसह उल्लेखिले आहेत, आणि बहुधा आजच्या वाचकांच्या सोयीकरिता ते इसवी सनात सांगितले आहेत. ' त्रिशद्‌शर्मी मेच्या ' किंवा ' सन चाराधिक सोळाशे सत्तरच्याच जून महिन्याच्या ' असे कालनिर्देश हे आपल्यास एकदम हे काव्य आहे की इतिहास आहे असे वाटावयास लावतात. घटनाप्रसंगांचे पौर्वापर्य सांभाळून हे इतके अचूक कालनिर्देश टाळले असते तर काव्य-वातावरण अभंग राहते. प्रस्तुत चार अध्यायांमध्ये राज्याभिषेकोत्सवाविषयीचे तीन अध्याय या इतिहास-निवेदनाने व्यापिले आहेत. पद्धती मात्र काव्यपद्धती आहे. त्यांतील मधला अभिषेकोत्सवाविषयीचा अध्याय तपशिलाच्या दृष्टीने व एकंदर भव्य व ऐश्वर्ययुक्त वर्णनाच्या दृष्टीने इतरांपेक्षा अधिक चांगला ठरेल. पहिला अध्याय राज्याभिषेकाची

आवश्यकता सिद्ध करण्यासाठी व तिसरा त्याची अपेक्षित फलश्रुती साधल्याचे सांगण्या-साठी खर्ची पडला आहे. त्यांत काव्यामध्येच, पण आर्ग्युमेंट केल्यासारखे वाटते. रस-सिद्धीच्या दृष्टीने या विषयाशी निकटसंबद्ध नसलेला, परंतु कालदृष्ट्या अगदी निकट असलेला जिजाईच्या निधनप्रसंगाचा अध्याय अधिक सरस ठरतो. दोन असामान्य मातापुत्रांच्या परस्पर भावबंधाची अभिव्यक्ती त्यात झाली आहे, आणि करुण रसाचा बराच परिपोष त्यातून होत आहे. पुराणास साजेल अशी अद्‌भुताची योजनाही कवीने त्यात केलेली दिसते, आणि स्वर्गात जिजाईचे देवेंद्र व देव यांनी स्वागत केल्याचेही दृश्य त्यात वर्णिले आहे. या वेळी मात्र आपण एक आधुनिक व ऐतिहासिक काव्य वाचत नसून मोरोपंती पौराणिक कथाच वाचत असल्याचा भास वाचकांस होणे अपरिहार्य होते.

आपण एक महाकाव्य लिहीत आहो आणि ते मोरोपंतपद्धतीने लिहीत आहो ही जाणीव सतत ठेवल्यामुळे या काव्याची भाषा सर्वत्र संस्कृतप्रचुर आणि एकाच व्यक्तीची असल्यासारखे वाटते. यातील गागाभट्ट शिवाजीपेक्षा अधिक संस्कृतप्रचुर बोलत असेल, किंवा जिजाईपेक्षा कदाचित शिवाजी अधिक प्रौढ भाषेत बोलत असेल, परंतु सर्वच कवीच्या भाषेत बोलतात असे वाटते. मोरोपंतांप्रमाणेच बाटे हेही याबाबत भाषाविवेक करीत नाहीत. म्हणून जिजाई ‘ स्थगित अनुगमन केले की तुजला साह्यभूत मी व्हावे ’ असे शिवाजीस म्हणते, आणि शिवाजीही तिला उद्देशून ‘ नसता वसंत बहर न वन-सृष्टिस, विहगसंघ हर्षविना । तुजविण नाही शोभा ’ असे सांगतो. कुंटे यांची भाषा महाकाव्यास न साजेल एवढी बालिश होती; यातील भाषा महाकाव्यास साजेशी असली, तरी काही प्रमाणात अस्वाभाविक वाटावी एवढी प्रौढ आहे.

प्रस्तुत काव्य हे अथपासून इतीपर्यंत आर्यावृत्तात रचिले गेले आहे असे दिसते. त्यामुळे त्यात एकसुरीपणा येऊन पूर्वीच्या साहित्यशास्त्रज्ञांनी महाकाव्याच्या निरनिराळ्या सर्गांतून वेगवेगळ्या वृत्तांमध्ये रचना करावी असे का म्हटले असेल, त्याची कल्पना येते. प्रस्तुत चार अध्याय वाचीत असतानाच ही जाणीव होत असेल, तर ६१ अध्याय वाचताना ते अधिकच प्रमाणात अनुभवास येईल.

‘अलीकडे महाकाव्ये का होत नाहीत’ असा एक विचार ४० वर्षांपूर्वी चर्चिला गेला होता. त्याची विविध उत्तरेही देण्यात आली होती. शिवचरित्रावर लिहिल्या गेलेल्या गेल्या काही वर्षांतील तीन महाकाव्यांनी त्या प्रश्नाचे उत्तर मिळाले की नाही ते सांगता येत नाही. शिवचरित्रासारखा महाकाव्ययोग्य असा विषय अद्यापि कोणास दिसला नाही किंवा असे चरित्रच घडले नाही असे म्हणावयाचे काय ? ते केव्हा घडेल ते घडो, तोपर्यंत प्रस्तुत कवीस त्याच्या काव्यरचनेबद्दल धन्यवाद देण्यास काहीच प्रत्यवाय नाही.

— प्रा. रा. श्री. जोग



**भाषा व भाषाशास्त्र ( वर्णनात्मक )** — व्हीनस प्रकाशन, पुणे १९७२
**श्री. न. गजेंद्रगडकर** — बारा + ४३२ पृष्ठे. किंमत दिलेली नाही.

“ भाषा व भाषाशास्त्र यांच्या पदव्युत्तर विद्यार्थ्यांना मराठीत एक पाठ्यपुस्तक असावे व त्याचप्रमाणे जिज्ञासू वाचकांना आधुनिक भाषाशास्त्राची प्रणाली व पद्धती यांची ओळख करून द्यावी एवढाच हेतू हे पुस्तक लिहिण्यात आहे ” ही लेखकाची भूमिका ‘ भाषा व भाषाशास्त्र ’ या पुस्तकाने सफल झाली आहे.

भाषाशास्त्राचे स्वरूप काय, ते खरोखर शास्त्र आहे का, या विषयाच्या अभ्ययनास केव्हा, कोठे, कशी सुरुवात झाली, ब्लूमफील्ड व सपीर यांनी लिहिलेल्या ‘ लँग्वेज् ’ या पुस्तकात पुढील भाषाभ्यासाची मुळे कशी सापडतात, युरोप खंडातही या अभ्यासाचे स्वरूप काय होते याचा ओझरता आढावा लेखकाने घेतला आहे. मात्र आधुनिक भारतीय भाषाशास्त्रकारांचा उल्लेख आढळत नाही. व्याकरण, साहित्य, शब्दशास्त्र, मनोविज्ञानशास्त्र, समाजशास्त्र व तर्कशास्त्र यांच्याशी भाषाशास्त्राचा संबंध सुचवून एककालिक किंवा वर्णनात्मक, कालक्रमिक किंवा ऐतिहासिक या प्रमुख शाखांची माहिती देऊन तुलनात्मक, बोलीभूगोल, भूभाषाविचार इत्यादी नवीन शाखांचाही परिचय करून दिलेला आहे.

‘ भाषे’ची ध्यानी मानवेतर दळणवळण पद्धतीहून भिन्न असून तिची वैशिष्ट्ये कोणती हे सविस्तर सांगितले आहे. भाषेचा ध्वनिसंकेतांशी अनिवार्य संबंध असून त्याचे वर्णनात्मक, सूचनात्मक व आदेशात्मक त्रिविध कार्य असते; संकेतासंबंधीच्या मॉरिस यांच्या या तीन दृष्टिकोणांतून भाषेचा अभ्यास होणे आवश्यक ठरते, असे विधान केले आहे. संकेतशास्त्राची एक शाखा या दृष्टीने सोस्यूर यांनी सुचवलेला व उल्मन यांनी पद्धतशीरपणे मांडलेला भाषा व भाषण यांतील भेद स्पष्ट केला आहे. त्या वेळीच भाषेतील अतिरिक्ततेचे स्थान व संख्याशास्त्रीय किंवा गणिती दृष्टिकोण भाषेला कसा उपयुक्त ठरतो याचे थोडक्यात विवेचन केले आहे. भाषेतील सार्वत्रिक लक्षणांची ओळख करून देऊन भाषेच्या उत्पत्तीसंबंधीच्या विविध उपलब्ध मतप्रणाली थोडक्यात मांडल्या आहेत.

ध्वनींचे उच्चारण, आकलन व श्रवण या तीन अंगांवर अवलंबित अशा औच्चारिक, सांचारिक व श्रव्य या ध्वनिविचाराच्या शाखांची ओळख करून दिली आहे. औच्चारिक ध्वनिविचारात प्रयत्न, उच्चारणस्थान व उच्चारण अवयव यावर अवलंबून असलेले ध्वनींचे स्वरूप सचित्र विशद करून त्यानुसार ध्वनींचे वर्गीकरण केले आहे. आय. पी. ए. ( आंतरराष्ट्रीय ध्वनिविज्ञान परिषद ) ध्वनिलिपी बरोबरच देवनागरी ध्वनिलिपी सुचवली आहे. ( देवनागरी लेखन अवयवाधिष्ठित असल्याने, वाचकाला पूर्वपरिचय असेल तर तो ध्वनी व अक्षर यात घोटाळा करील अशी शक्यता वाटते. ) याशिवाय ब्लॅक व ट्रेगर लिपीनुसार स्वरांचा तक्ताही जोडला आहे. यानंतर ध्वनी व अक्षर यांतील भेद

अनुक्रमणिका

स्पष्ट करून हॉकेट याने मानलेले पूर्वगह्वर शिखर, पूर्वगह्वर, इत्यादी चार अक्षर प्रकार दाखवून स्वरसंयोग, मात्रा, बलाघात, स्वराघात, तान, अन्त्यपरिरेखा इत्यादी प्रतिलेखना-साठी आवश्यक गोष्टींची माहिती देऊन ध्वनिविचार संपवला आहे.

वर्णनात्मक भाषाशास्त्राच्या अभ्यासाची पुढची पायरी स्वनिम विचार. स्वनिम म्हणजे काय, त्याचे लक्षण कोणते, स्वनिमिक विश्लेषणाची तत्त्वे कोणती, ती कशी वापरावी याची सोदाहरण चर्चा करून त्या अनुषंगाने मराठी भाषेची स्वनिमिक व्यवस्थाही मांडली आहे. यानंतर पदिमांमध्ये भाषेचे विश्लेषण कसे करावे याचे तंत्र, पदिमांचे व पदांचे विविध प्रकार विस्तृतपणे सोदाहरण मांडले आहेत. यात 'अक्षर' या शब्दाचा 'अवयव' याअर्थी वापर नवीन अभ्यासकाला लक्षात घ्यायला त्रास पडेल असे वाटते. रूप व व्यवस्थापद्धती आणि रूप व प्रक्रियापद्धती या दोन्ही पद्धतींचे फायदे निदर्शनास आणून भाषा शिकविण्यासाठी त्यांचा समन्वय उपयोगी पडतो, पदिम विचारात आशयाचे स्थान महत्त्वाचे असते, अशी विधाने केली आहेत.

वाक्याची ' अदोष ' व्याख्या करण्यापेक्षा कोणत्या उच्चारणखंडाला वाक्य मानता येईल ते सविस्तर मांडणे लेखकाने अधिक पसंत केले आहे. ' वाक्यविचार प्रामुख्याने वाक्यामधील रचनापद्धतीच्या अभ्यासापुरता मर्यादित असून पदिमविचाराचे क्षेत्र पदिमा-पासून मिळणाऱ्या शब्दसमृद्धीपुरते आहे ' ही लेखकाची भूमिका आहे. ( पृ. ३३९ ) संघटक, अव्यवहित संघटक, अंतःकेंद्रीय व बहिःकेंद्रीय रचना, व्याकरणिक प्रवर्ग इत्या दींचा परिचय करून देऊन वाक्यविचारासंबंधीची ब्लूमफील्ड-प्रणाली, फर्थ व लंडन-प्रणाली, हॅलिडे-प्रणाली यांची ओळख करून देऊन वाक्यविचाराच्या अभ्यासाच्या वाटचालींवर प्रकाश टाकला आहे.

फ्रेंच, इंग्रजी वगैरे युरोपीय भाषांतून प्रामुख्याने परिचित झालेले भाषाशास्त्र मराठी भाषिकाला मराठी भाषेतून उपलब्ध करून देण्याचे मोठे कार्य श्री. गजेंद्रगडकर यांनी केले आहे. यासाठी, ज्या संस्कृत भाषेचे ते गाढे अभ्यासक आहेत तिचे मराठीशी जुने नाते लक्षात घेऊन, नवनवीन शब्द तयार करण्याची तिची कुवत मराठीत ओतली आहे. फोन–फोनीम–फोनीमिक यांतली स्वन, स्वनिम, स्वनिमिक; मॉर्फ–मॉर्फीम–मॉर्फीमिक यांसाठी ' पद, पदिम, पदिमिक ' अशा तऱ्हेच्या शब्दांतील –इम, व –इक प्रत्यय मात्र मराठीला इंग्रजीतून मिळवून दिला आहे की सोप्या केलेल्या संस्कृतच्या प्रक्रियेतून [ ध्वनि ( सं. )–ध्वानिक ( सं. )→ध्वनिक ( म. ) ] हे ओळखता येत नाही. कसेही असले तरी –इम व –इक हे नवीन प्रत्यय मराठी शब्दांच्या नवनिर्मितीला खूपच चालना देणारे ठरत आहेत.

नव्या परिभाषेच्या साहाय्याने भाषाशास्त्रासारखा विषय सुंदर उदाहरणांच्या साहाय्याने लेखकाने मनोरंजकपणे हाताळला आहे. तसेच, स्वतःचे मत मांडण्यापेक्षा विविध मतांचे संकलन करून वाचकाला स्वतःच विचार करायला प्रवृत्त केले आहे.

याच वेळी भाषाशास्त्र हा विषय शिकणे खडक फोडण्यासारखे कठीण आहे ही समजूत हळुवारपणे दूर केली आहे. काही ठिकाणी मात्र मनोरंजकता विषयाशी विसंगत नसूनही नकोशी वाटते ( पृ. ८२–३; पृ. ११३–४ ). तसेच ज्याला संस्कृत भाषेच्या मोडणीचा परिचय नाही त्याला लेखकाने सहजपणे व समर्थपणे हाताळलेले असूनही कित्येक पारिभाषिक शब्द ( श्रावणिक, आक्षारिक, रैखिक ... ) कितपत योग्य अर्थ व्यक्त करू शकतील अशी शंका येते. पुस्तकाला जोडलेले शुद्धिपत्र व...' चालू शकेल 'ने सुरू होणारे मराठी वाक्य ( पृ. २७८ ) या गोष्टी हे काम घाईनेच हातावेगळे करावे लागले आहे असे दर्शवितेे. सर्व पुस्तकभर संस्कृत व्याकरण व पारंपरिक मराठी व्याकरण यांचा थोडाफार प्रभाव जाणवल्याशिवाय राहात नाही. पुस्तकाच्या शेवटी जोडलेल्या विविध सूची वाचकाला अभ्यासासाठी अत्यंत उपयुक्त ठरणाऱ्या आहेत. ' भाषा व भाषाशास्त्र ' या प्रस्तुत पुस्तकाने मराठी भाषेच्या भाषाविषयक अभ्यासास बहुमोल मदत झाली आहे. या शास्त्रावर आधारलेले मराठी भाषेचे व्याकरण श्री. गजेंद्रगडकर लवकरच उपलब्ध करून देतील अशी आशा आहे.

—डॉ. सुहासिनी लद्दू



**मनमोर ( कथासंग्रह )**
**प्रा. चंद्रकांत वर्तक**

मेनका प्रकाशन,
पृष्ठे १६८, किंमत दहा रुपये.

' मनमोर ' हा प्रा. चंद्रकांत वर्तक यांचा तिसरा कथासंग्रह. कथालेखनाचा पुरेसा अनुभव असलेल्या लेखकाच्या दहा कथा या संग्रहात समाविष्ट झालेल्या आहेत. यांपैकी 'आवर्त' व ' अंधारलाटा ' या दोन कथा त्यांच्या दीर्घत्वामुळे काहीशा वेगळ्या पडतात. ' आवर्त 'चा तोंडवळा तर लघुकादंबरीशी मिळताजुळता वाटावा. बाकीच्या कथांतून एखादा क्षण किंवा एखादी व्यक्ती केंद्रस्थानी कल्पून त्याद्वारे मनोदर्शन घडविण्याच प्रयत्न केलेला दिसतो. या कथा अंगासरशा आहेत.

या कथांतून चित्रित झालेले विश्व एकंदरीने पाहता मध्यमवर्गीय मनाचे आहे. ' फेरा ' सारखी वेगळी वाटणारी कथाही जे मनोव्यापार चित्रित करते, ते कॉन्स्टेबलवर आरोपित केलेलेच वाटतात. या कथाविश्वातील ' दंश ' मधील एखादी नायिका व निवृत्ती गायकवाडच्या मित्रासारखा ' पांढरीमाती 'मधील एखादा माणूस या वर्तुळाबाहेरचा आहे. त्यामुळे हे अनुभवविश्व सांकेतिक झालेले आहे, असे मात्र म्हणता येणार नाही. या व्यक्तींच्या जीवनातील ताण आपआपल्या परीने वेगळे आहेत. ते ज्या घटनांतून व्यक्त होतात त्या घटनाही काहीशा वेगळ्या म्हणता येतील. डिटॅचमेन्ट ऑफ रेटिना, वेड्या

मुलाला हाॅस्पिटलमध्ये पाठविण्याचा प्रसंग, पत्नीच्या प्रसूतीच्या क्षणीच एका कॉन्स्टेबल-वर संपकाळात स्मशानभूमीवर पहारा करण्याची आलेली पाळी, यातून हा वेगळेपणा सहज जाणवणारा आहे. तरीही त्या वेगळ्या घटनांवर लेखकाचे लक्ष केंद्रित झालेले नाही. त्या त्या परिस्थितीत सापडलेल्या व्यक्ती कशा वागतील, किंवा त्यापेक्षा त्यांच्या मनात कोणते कल्लोळ उठतील, त्या मनाचे व्यापार कसे चालतील, याबद्दल लेखकाला अधिक कुतूहल आहे. 'अंधारलाटा' ही कथा लक्षणीय बनते ती यामुळेच होय. अध्ययन-अध्यापन-लेखन हेच ज्याचे जीवन आहे, त्याच्या डोळ्यांचा रेटिनाशी असलेला संबंध तुटणे म्हणजे जीवनाशी असलेले नातेच संपल्यासारखे आहे. या अवस्थेतील शारीर-मानस ताणांचे चित्र वर्तक समर्थपणे उभे करतात, पण ते उत्कटमात्र होत नाही. घाटे व प्रा. काळे यांच्या भेटीगाठी या चित्रणात पसरटपणा आणि काहीसा हिशेबीपणाही आणतात. एक डोळा गेलेल्या घाटेची भेट कृत्रिमच वाटते. या कथेच्या तुलनेने 'यात्रा' ही कथा कितीतरी परिणामकारक आहे. माधवला हॉस्पिटलमध्ये नेण्याच्या एका क्षणात अप्पासाहेबांच्या मनोव्यथा घनीभूत स्वरूपात येथे व्यक्त होतात. आरंभी वेडा माधव मेन्टल हॉस्पिटलमध्ये जातो तर अंती अप्पासाहेबांची नजर गढुळते, वेडसर, सैरभैर होते. जणू एक वर्तुळ पूर्ण होते. मधल्या भागात वेड्या माधवाचे वेडेचार व त्यांनी व्याकुळलेले पितृमन यांचे चित्रण झालेले आहे. ते आटोपशीर आहे.

'हरवलेले विरलेले' ही कथा एका अपेशी कथालेखकाची व्यथा चित्रित करणारी आहे. काहीतरी चांगले गवसल्यासारखे वाटावे आणि शब्दांकित करताना ते विरून जावे हा अनुभव येथे एका विशिष्ट कालबिंदूत गोठविण्याचा प्रयत्न प्रा. वर्तकांनी केलेला आहे. तो बराचसा यशस्वीही झालेला आहे. परंतु शेवटी 'आपल्या कथा ही आपली मुलेच...' यासारखे उघडेवाघडे समीकरण मांडण्याचा मोह त्यांनी आवरायला हवा होता असे वाटल्यावाचून राहात नाही.

'फेरा'मधील कॉन्स्टेबलची त्याच्यावर आरोपित केलेली संवेदनशीलता गृहीत धरली, तर तीही कथा एक चित्तथरारक असा उत्कट अनुभव देऊन जाते. तीही स्मशानातील काही क्षण सलगपणे साकारते. त्यांना अर्थपूर्णता लाभते ती मात्र प्रसूत होण्याच्या वेतात असलेल्या कॉन्स्टेबलच्या पत्नीमुळे. प्रेते जाळतात ती जागा, मुलांना पुरतात ती जागा आणि एका मळवट भरलेल्या बाईचे प्रेत या गोष्टी पाहून या कथानायकाच्या मनात उठलेली वादळे येथे विलक्षण आवेगाने अचूक शब्दांत पकडली असल्याचा प्रत्यय येतो आणि हे सारे अनुभवीत असताना आपली पत्नी व तिला होणारे मूल यांची त्याच्या मनातली उपस्थिती या अनुभवात विलक्षण ताण निर्माण करून जाते. यातील वातावरणही जिवंत आहे.

वरील कथांत थोड्याफार प्रमाणात संज्ञाप्रवाही पद्धती अवलंबिलेली दिसेल. ती त्या कथांना काहीशी मानवलेलीही आहे. याच कथा या संग्रहातल्या बऱ्या कथा म्हणून

दाखविता येतील. 'नाथा' आणि 'माझ्या आजीची गोष्ट' या दोन कथांतून व्यक्तिचित्रे रेखाटण्याचा प्रयत्न फारसा सफल झालेला नाही. आजींचे चित्र आरंभी मोठे आकर्षक वाटते पण पुढे त्यावरील लेखकाची पकड सुटत जाते असे वाटते. 'नाथा'मध्ये विशेष लक्षणीय काही वाटत नाही. त्यातील प्रसंगनिवेदन प्रतिवृत्तासारखे वाटते. हा दोष 'पांढरी माती' या छोट्या कथेत जसा जाणवतो, त्याचप्रमाणे 'आवर्त'सारख्या दीर्घ कथेतही तो प्रत्ययाला येतो. त्यामुळे या कथांतील अनुभवांना विशेष अर्थवत्ता प्राप्त होताना दिसत नाही. 'आवर्त'मध्ये काहीसा विस्तृत पट घेऊन लेखक आपली कुवत अजमावण्याचा प्रयत्न करीत असावासे वाटते. माणसातला ध्येयवादीपणा व व्यावहारिकता, त्याच्या मनाची उदात्तता व क्षुद्रता, त्याचा कमकुवतपणा आणि ढोंगीपणा याचे चित्रण अनेक व्यक्तींच्या समूहाच्या संदर्भात लेखक करू पाहात आहे, परंतु त्यात त्याला फार खोल जाता आलेले आहे, असे वाटत नाही. नीरस तपशिलाने ही कथा उगाच फुगल्यासारखी वाटते. कुणाच्या तरी आत्मचरित्रातील एक प्रकरण वाटावे, असे स्वरूप तिला आले आहे.

या संदर्भात 'हरवलेले विरलेले' या कथेतील लेखकाचेच शब्द स्मरू लागतात. 'अनुभव त्याच्यावर स्वतःहून जीव ओवाळायचा नाही, कधी फिदा व्हायचा नाही.' (पृ. ११९) ही गोष्ट वरील कथांतील अनुभवाबाबत काहीशी खरी वाटू लागते. ह्या कथा म्हणजे एकेक जुळवणूक आहे असा प्रत्यय येतो. त्यात कल्पकतेचा भाग फार थोडा जाणवतो.

या अनुभवविश्वातील काही तपशील आवृत्त होतात. त्यांचे कथानायक बरेचदा प्राध्यापक असतात (प्रा. साने, 'मैत्रीण' मधील व 'माझ्या आजीची गोष्ट' मधील 'मी') काही तरुण वा अरुण संग्रामध्ये जातात. (दिनू, घाटे, नाथा) वसूचा उल्लेख दोन कथांत येतो. 'अंधारलाटा'मधील सुलभा व 'हरवलेले विरलेले' मधील लेखकपत्नी अपत्यहीनतेच्या बाबतीत सारख्या वाटतात. दोन्हीतील नायकांच्या या बाबतीतल्या प्रतिक्रियाही सारख्याच आहेत. फिरलेल्या घराची कल्पना 'हरवलेले विरलेले' व 'यात्रा' या दोन कथांत थोड्या वेगळ्या स्वरूपात आलेली आहे. थोडक्यात काही नायकनायिकांचे व कल्पनांचे तांडवळे सारखे वाटतात. यातून अनुभवाच्या वैचित्र्याबाबतच्या मर्यादा स्पष्ट होत असाव्यात. हे अनुभव प्रथमपुरुषी भूमिकेतून सांगणे लेखकाला अधिक आवडते असे दिसते. दहांपैकी सहा कथा या पद्धतीने लिहिलेल्या आहेत. यातून एक गोष्ट अंदाजता येते. या अनुभवांशी लेखकाचा 'स्व' थोडा अधिक निगडित असावा. तो कलात्मक पातळीवर नेणे काहीसे कष्टाचे झालेले दिसते. त्याच्या फार आहारी न जाता भावविवशता टाळायची व पूर्ण अलिप्त न होता भावार्द्रता साधायची ही लेखकापुढील समस्या असावी. यात क्वचित 'स्व' अधिक डोकावत गेला असावा व काही ठिकाणी वाजवीपेक्षा जास्त अलिप्ततेमुळे रूक्षपणा तरी आलेला असावा. त्यामुळेच काही कथांना

प्रतिवृत्ताचें रूप आले असावे.

'फेरा' किंवा 'यात्रा' यासारखे अपवाद वगळले तर या कथानुभवांची भावलय ही वरीच फिकी आहे. पसरट आहे. पण त्या मानानें तिची अभिव्यक्ति काहीशी गडद वाटते. त्यात सहजता असण्याऐवजी प्रयत्नसाध्यता अधिक असल्याचा प्रत्यय येतो. 'पनमोरा' चा उन्मन नृत्याविष्कार फार थोड्या ठिकाणी जाणवतो.

— प्रा. म. सु. पाटील

## 'जा जरा पूर्वेकडे'
### श्रीपाद जोशी

अलीकडच्या काळातील खुसखुशीत, विनोदी, ललित निबंधासारख्या प्रवासवर्णनातून विशेषेकरून लेखकाच्या आवडीनिवडीवरच अधिक प्रकाश पडतो. वाचकांची अभिरुचीही हलकेफुलके वाचण्याकडेच अधिक, हेही त्याला एक कारण असावे. अशा प्रकारची प्रवासवर्णने, विभिन्न प्रदेश व जनसमाज यांच्यासंबंधी एक सुस्पष्ट प्रतिमा वाचकांच्या डोळ्यांसमोर उभी करण्यात आणि ती प्रतिमा दीर्घकाळ टिकविण्यात काहीशी असमर्थ ठरतात.

'जा जरा पूर्वेकडे' हे शीर्षकच मोठे अन्वर्थक आहे. या शीर्षकाद्वारे लेखकाने वाचकाला केलेली एक आर्जवी सूचना ध्वनित होते. 'आजवर पश्चिमेकडे जात आलात. तेथून बऱ्यावाईट गोष्टींची वरीच आयात केलीत. आता जरा पूर्वेकडील देशांत जाऊन पाहा. तेथेही काही गोष्टी नक्की स्पृहणीय आढळतील;' असा आशय अभिव्यक्त होतो.

'जपानमधील प्रेक्षणीय स्थळेच केवळ पाहणे हा काही माझा मुख्य उद्देश नाही. जपानी माणसाची, समाजाची ओळख करून घेणे हा माझा खरा हेतू आहे' अशा स्पष्ट शब्दात लेखकाने आपले उद्दिष्ट व्यक्त केलेले आहे.

हे पुस्तक वाचल्यावर चेहऱ्यावर स्मिताचे वरदान घेऊन वावरणारा पाहुण्यांना मोठी भेटवस्तू देऊन, 'ही माझी गरिबाची छोटी भेट, स्वीकार व्हावा,' असे नम्रतेने म्हणणारा, परदेशी लोकांबद्दल गैरशब्द तोंडावाटे न काढणारा, प्रामाणिक, उद्योगी, भौतिक दृष्ट्या संपन्न पण मानसिक शांती गमावलेला जपानी माणूस आपल्या डोळ्यांसमोर दिसू लागतो.

या माणसाचे चार खोल्यांचे छोटेखानी घर आहे. खोलीत चटया अंथरलेल्या आहेत. देवघरात कापडावर मंत्र लिहून ते ठेवलेले आहे, घरातील स्त्री कुटुंबाकरता अखंड दिवसभर राबत आहे. टापटीप, स्वच्छता, नेटकेपणा हा तिचा उपजत अंगस्वभाव आहे.

आणि घराभोवतीच्या बगीच्यात लहानमोठ्या आकाराचे, चित्रविचित्र स्वरूपाचे आणि रंगाचे दगड, कल्पकतेने रचलेले असून, पांढरी वाळू पसरलेली आहे. असे स्वाभाविक पण आकर्षक दृश्य नजरेसमोर तरळू लागते.

जपानमधील मोत्यांची शेती, फुजियामा पर्वत ह्या सुप्रसिद्ध गोष्टी तर लेखकाने निरखून पाहिल्या आहेतच; परंतु रक्तासारख्या लालभडक पाण्याचे तळे, दुग्धधवल पाण्याचे तळे, दर सतरा मिनिटांनी उडणारे व तीन मिनिटेपर्यंत उडत राहणारे कारंजे इ. आश्चर्यकारक गोष्टीही जवळून पाहून नमूद करून ठेवल्या आहेत. 'प्रेक्षणीय ते पाहणे' हा मानवाचा स्वभाव, त्याला लेखक अपवाद नाही.

जाता जाता एखाद्या जलाशयात फुललेल्या पांढऱ्याशुभ्र, ताटाएवढ्या कमळांकडे ते आपले लक्ष वेधतात, तर कधी सरोवरात जलकेली करणाऱ्या राजहंसाकडे दृष्टिक्षेप टाकण्यास सांगतात. त्यांच्या नजरेतून मखमली अंगाची, शेवाळी रंगाची मंदिराच्या छताकरता वापरलेली झाडाची साल सुटू शकत नाही.

पण येथे त्यांचे मन अधिक काळ रेंगाळत बसत नाही. त्या मनाला वेध लागला आहे तो जपानी समाजमनाचा वेध घेण्याचा. जपानी माणसाचे राष्ट्रीय चारित्र्य, त्याचे रीतिरिवाज, त्याच्या धर्मविषयक श्रद्धा, क्वचित अंधश्रद्धा आणि लोकभ्रम, त्याची आवडनिवड, पोशाख, शिक्षण, राहणीमान, व्यवसायविषयक दृष्टिकोण, आहारविहार इ. जीवनाच्या अंगोपांगांची, मिळेल तितकी जास्तीत जास्त माहिती लेखक संग्रहित करीत गेलेले दिसतात.

माणसाच्या अंतःकरणात प्रवेश करण्याची किल्ली लेखकाला अवगत झालेली आहे. श्री. फुजिइ गुरुजींच्या एखाद्या शिष्याप्रमाणे, स्वतः लेखकाने, लाकडी पळीसारख्या उपकरणाने त्यांचे पाय चुरण्यास सुरुवात केली आणि काय आश्चर्य! गुरुजींच्या अंतःकरणाची तिळा उघडली आणि तीतून म. गांधींबद्दल असलेला आदर, धर्मान्तरविषयक श्री. आंबेडकरांचा दृष्टिकोण, जपानशी अधिक जवळीक व्हावी यासाठी भारतीयांनी बौद्धधर्म स्वीकारणे आवश्यक आहे की काय? इ. विषयांवरील विचाररत्ने बाहेर पडली. 'हांदो स्तूप समिती'च्या वतीने आयोजित केलेल्या स्वागत भोजनास उपस्थित राहिले असतानाही लेखकाला असाच आणखी एक अनुभव आलेला आहे. 'ऐसी कुदरत तेरी साहिब' हे पलटुदासाचे भजन म्हणून त्यांनी 'आकिरासाकाई' या गृहस्थाला गहिवर आणला आणि मग आठवणी रंगल्या सुभाषचंद्रांच्या आणि अझाद हिंद सेनेच्या. कोणाला चंचीतले पान देऊन, तर कोणाला सुरवार, नेहरू शर्ट हा भारतीय पोशाख बहाल करून त्यांनी माणसांना आपलेसे केलेले दिसते.

परदेशात गेल्यावर तेथील नावीन्याचा आनंद उपभोगायचा असेल तर अलिप्तता स्वीकारून चालत नाही. लेखकाने अनेक गोष्टींचा जातीने अनुभव घेऊन पाहिला आहे. त्याने 'साके' मद्य चाखून पाहिले आहे. उकळत्या पाण्यात केवळ हिरवी पत्ती टाकून

केलेल्या कडू चहाचा घोट घशाखाली उतरवला आहे. विजारीवर 'युकाता' घालून आपण कसे दिसतो हे अजमावले आहे, आणि जपानी स्नानगृहात संपूर्ण विवस्त्रावस्थेत मुक्त स्नान करण्याचा आगळा आनंदही अनुभवला आहे. येथे 'स्नान पहावे करून' असे ते आपणास सुचवितात. या त्यांच्या स्वभाववैशिष्ट्यांचा अनुभव संपन्न करण्यास व प्रवास-वर्णनात जिवंतपणा येण्यास फार मोठी मदत झाली आहे असे वाटते. तरुण भिक्षूशी, विद्यार्थ्यांच्या गटाशी, व्यापारी प्रतिनिधीशी, मोटार-ड्रायव्हरशी, खिस्ती फादरशी, अशा प्रकारे समाजातील वेगवेगळ्या थरातील लोकांशी बातचीत करून लेखक आपल्या जिज्ञासू वृत्तीचे समाधान करीत गेलेले दिसतात. हे करीत असताना भाषेच्या यक्षप्रश्नाशी ते अडून राहिलेले नाहीत, तर साधेल तेथे इंग्रजीतून, हिंदीतून, मोडक्यातोडक्या जपानीतून, किंबहुना जपानी-इंग्रजी शब्दकोशाचाही वापर करून त्यानी भाषिक अडचणीवर मात केलेली आहे. या चर्चेतून जपानमध्ये खाजगी शैक्षणिक वर्ग का चालवावे लागतात ? जपानी माणूस परदेशी भाषा शिकण्याच्या बाबतीत इतरांच्या तुलनेने मुखजड का वाटतो ? जपान आर्थिक साम्राज्य प्रस्थापित करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगून आहे काय ? त्याची धर्म-विषयक श्रद्धा कशी आहे ? त्याला भारताबद्दल काय वाटते ? यासारखे प्रश्न उपस्थित करून त्यांची उत्तरे मिळविण्याची धडपड केलेली आहे. हे प्रश्न वाचकालाही विचार करा-यला लावतात, म्हणून ही चर्चा उद्बोधक झालेली आहे.

**लोककथा–लोकभ्रम–शुभाशुभ कल्पना**–ह्या गोष्टींचा परिचय झाल्याने माण-साच्या मनाचे कोपरे उजेडात येतात. विश्वचालकाच्या शक्तीपुढे अखेर बुद्धिप्रामाण्यवाद थिटा पडतो आणि त्यातूनच लोकभ्रम–शुभाशुभाच्या कल्पना यांच्या आहारी गेलेला माणूस दिसतो. भारतीय लोक दक्षिण दिशा अपवित्र मानतात, त्याप्रमाणे जपानी माणूसही दक्षिण, पश्चिम अशुभ मानतो. नवस फेडण्याकरता एखाद्या देवतेसमान असणाऱ्या वृक्षाला येथेही रंगीबेरंगी कागदाचे कपटे बांधण्यात येतात. भुताटकीची नौका वादळात सापडलेल्या आपल्या नौकेसमोर आली असता, नौकेवर लघवी केली की संकट टळते, असाही एक लोकभ्रम आहे. भक्तांना झालेली शिक्षा स्वतःच्या अंगावर ओढवून घेणाऱ्या देवदेवता येथेही आहेत.

विवेचनाच्या ओघात 'ओबोन' ह्या राष्ट्रीय सणामागील लोककथा, 'यामागा' दिव्यासंबंधीची लोककथा लेखक सहजपणे आपणांस सांगून टाकतात. वेप्पूच्या एका टेकडी-वरून दुसऱ्या टेकडीकडे जाताना मोटार ड्रायव्हरने सांगितलेली राक्षस दांपत्याची कथा आपल्याकडील 'भीम आणि महालक्ष्मी यांचे लग्न होण्याचे कसे टळले' या लोक–कथेशी साम्य दाखवणारी आहे.

कोणतीही गोष्ट लेखक नुसती वरवर पाहून सोडून देत नाही. बुद्धमंदिरे पाहताना तेथील बुद्धाची मूर्ती, तिचा आकार, स्वरूप, वजन, तोरणद्वार, दगडी दिवे, भिंतीवरी चित्रे, नक्षीकाम, हात व तोंड धुऊन प्रवेश करणे, इ. गोष्टी साक्षेपाने ते सांगतात.

' गिंजा ' ही टोक्योची बाजारपेठ. तेथील डिपार्टमेंटल स्टोअरचे वर्णन करताना तेथे दोन देवदार वृक्ष व त्यावर रातकिडे असल्याचा देखावा निर्माण केला होता हे ते सांगतात. आणि रातकिड्यांची किरकिर ध्वनिमुद्रित करून वाजवली जात होती याकडेही आपल्याबरोबर वाचकांचे लक्ष वेधू पाहतात. जे जे चमत्कारिक आणि वैशिष्ट्यपूर्ण दिसले ते त्यांनी अवश्य परिचित करून दिले आहे. **जलचरसंग्रह** पाहताना तेथील आशिका म्हणजे सील मासा हा उघड्या समुद्रात येऊन आपल्या नाकाने, पाण्याच्या पृष्ठभागावर टाकलेला चेंडू वर उडवतो आणि पाण्यात फेकलेले फुगे परत मालकाकडे आणून देतो अशी माहिती ते करून देतात.

लोकांच्या सोयीसाठी सतत तीस वर्षे एकट्याने खपून बोगदा खणण्यास उद्युक्त झालेला भिक्षू त्यांना आढळला आहे. भारतीयांनी बुद्धधर्म स्वीकारल्यास भारताची व जपानची मैत्री अधिक दृढ होईल असा बालिश विचार व्यक्त करणारा तरुण त्यांना भेटला आहे. तसेच भारतातील अप्रमाणिकपणा, दारिद्र्य, अस्वच्छता हे दुर्गुण आर्थिक विषमतेमुळे निर्माण झाले आहेत असा सुबुद्ध दृष्टिकोण बाळगणारेही लोक भेटले आहेत.

जपानी राष्ट्रध्वज, राष्ट्रगीत – त्याचा आशय, राष्ट्रीय स्वभाव, दुसऱ्या महायुद्धापूर्वीचा जपान व महायुद्धानंतरचा जपान यांतील फरक, यांची ओळख ज्याप्रमाणे लेखकाने करून दिली आहे, त्याप्रमाणे ' पाचिनको ' हा जपान्यांचा आवडता जुगार, गैशा पद्धती यासारख्या किंचित गर्हणीय गोष्टीही सांगितल्या आहेत. जपानमधील विवाहपद्धती स्वागतसमारंभाकरता करावा लागणारा भरमसाट खर्च ह्यासारख्या गोष्टीही त्यांच्या निवेदनातून सुटलेल्या नाहीत.

मात्र लेखकाची ज्ञानपिपासा, चिकित्सक वृत्ती, अभ्यासू दृष्टिकोण विचारात घेऊनही त्याने थोडा वाचकांचा विचार करायला हवा होता असे वाटते. ' ड्रॅगन'विषयी माहिती देताना लांबचलक ऐतिहासिक पार्श्वभूमी सांगणे, जपानी माणूस असुखी का ? हे सांगताना फादर पेत्रस याच्या पत्रातील इंग्रजी उतारा उद्धृत करणे, ह्या गोष्टी कंटाळवाण्या वाटतात. काही ठिकाणी उदा० शहरांचे जीवनमानाचे निर्देशांक, एखाद्या ठिकाणचे वार्षिक उत्पन्न, किंवा एखाद्या वस्तूची लांबी-रुंदी-उंची-वजन याबाबतची आकडेवारी आवश्यक वाटते. जपानी लोक पाहुण्यांना घरी का ठेवत नाहीत ? याबाबतीतली मीमांसा चार परिच्छेदांऐवजी चार वाक्यांत आटोपता आली असती.

—सौ. उषा दा. कुलकर्णी

‘ धग ’ ( कादंबरी ) — पॉप्युलर प्रकाशन.

**श्री. उद्धव ज. शेळके** — पृष्ठे २५९, किंमत बारा रुपये

श्री. उद्धव ज. शेळके यांची ‘ धग ’ ही कादंबरी मराठी वाङ्मयातील श्रेष्ठ कलाकृती आहे. ही ग्रामीण कादंबरी आहे.

ही कादंबरी ‘ ग्रामीण ’ म्हणून नव्हे तर तिच्यातील कलात्मकतेमुळे, जीवनानुभवांचे अस्सल, अकृत्रिम, प्रभावी आणि हृद्य चित्रणामुळे श्रेष्ठ ठरली आहे.

जीवन जगण्यासाठी दरिद्री परिस्थितीतील एका बाईला कराव्या लागलेल्या झगड्याचे या कादंबरीत हृदयस्पर्शी चित्रण आहे.

चहूबाजूंनी फाटलेल्या आभाळास शिवू पाहणाऱ्या कौतिक शिंपिणीची ही कथा. जगण्यासाठी-केवळ अन्नाने जगण्यासाठी तिला अनेक आघाड्यांवर झगडा द्यावा लागतो आहे. श्वासाश्वासागणिक तिला शारीरिक आणि मानसिक कष्टांचा अनुभव घ्यावा लागतो आहे. तिचे जगणे स्वतःकरिता नाहीच. कुटुंबाकरिता तिचे जीवन समर्पित आहे. नवरा, मुले यांच्याकरिता ती अखंड झिजते आहे. जीवनापासून तिच्या फार कमी अपेक्षा आहेत. पण तरीही जीवन तिला प्रत्येक ठिकाणी नकार देत आहे, नव्हे हाकलून देते आहे.

नवऱ्याला एक शिवण्याचे मशीन हवे आहे. पण ते त्या दोघांना घेता येत नाही. त्याकरिता आणि एकूणच जीवन जगण्यासाठी त्यांचा खटाटोप मोठ्या अटीतटीचा आहे. साधा सरळ, प्रेमळ, पापभीरू, वैफल्यग्रस्त म्हणून दुबळा असा नवरा, उनाडक्या करणारा नादान मुलगा भीमा, कुशाग्र, हुषार, समंजस नामा ( ज्याची शिक्षण घेण्याची जिद्द शेवटी कोळपून जाते. ), लहानगी यशोदा या साऱ्यांना घेऊन प्रतिकूल परिस्थितीचे तीव्र चटके सोशीत ती ‘ भुतासारखी राबत ’ ‘ जिवाच्या जिकीरीनं ’ ‘ मुरदाड मनानं रस्ता तुडवीत ’ चालली आहे. तिच्या अंतःकरणात अनेक व्यथांचा तळ आहे. परंतु तिच्या वागण्यात चिडचिडेपणा, त्रागा अगर कपाळावर आठ्यांच्या तुसड्या रेघा उमटल्या नाहीत. स्वरातला ‘ टणक ’ पणा तिने गमावला नाही. जीवनापासून वारंवार फरफटत दूर ओढली जाणारी ती पुन्हा पुन्हा जीवनात ‘ मिसळत ’ होती. दिवसेंदिवस ती श्रमातिरेकाने थकत होती. परंतु तरीही ‘ आपण सारे व्यवस्थितपणे निभवू शकू ’ अशी ती उमेद बाळगून होती. आपल्या पतीवर, मुलांवर तिचे फार प्रेम होते. हे प्रेमच तिच्या जीवनातील ‘ विरंगुळा ’ होता. या ‘ विरंगुळ्या ’च्या पायी ती राबत होती, कष्टत होती ! तिचे प्रेम शब्दातून नव्हे कष्टणाऱ्या हातापायातून व्यक्त होत होते. प्रेमातून निर्माण झालेली ‘ जीवनाविषयीची आसक्ती तिला त्या माथ्यावरच्या असह्य भाराखालूनही सोडवत नव्हती. ’

पण जत्रेला गेलेला महादेव हा पुन्हा घरी न येता रक्तपिती झाली म्हणून परस्परच

मिशनऱ्यांबरोबर निघून जातो ही वार्ता कौतिकला जेव्हा कळते तेव्हा तिला तो जबरदस्त आघात पेलवत नाही. ती सुन्न बधिर होऊन जाते. तिचे स्वर कोरडे होतात. 'काळा चेहरा हिरवा करडा होतो. ओठ वाकडीतिकडी वळणे घेऊ लागतात. डोळे भराभर आत ओढल्यासारखे खाचा सोडून मागे सरकतात. चेहऱ्यावर वेदनांचे थर चढतात.' दुःखांना आतल्या आत पचवणाऱ्या कौतिकला हे दुःख पचवता येत नाही. ते दुःख विरत गेलेल्या जीर्ण शरीराच्या, मनाच्या वस्त्राच्या, आतल्या पदराच्या चिंध्या चिंध्या करतात. ती ओक्साबोक्सी रडते. तिचा थरथरणारा हात नामाच्या अंगापोटावरून बराच वेळ फिरत राहतो !

फाटलेलं आकाश शिवण्याची या शिंपिणीची जिद्द होती. आपल्या अखंड 'चालीतून' ती आकाशाला 'टीप' मारू धजत होती. कारण त्या वेळी तिचे मन शाबूत होते. पण शरीराच्याबरोबर मनाच्याही चिंध्या झाल्यावर एकाकी कौतिकला सावरणार कोण ?

ती जहरी वार्ता ऐकताच कौतिक दुसऱ्या दिवसापासून बदलते. ती भ्रमिष्ठ होते. तिचे डोके सुन्नतेत मुरून जाते. डोळ्याभोवती लोंबकळणारा फास आता गळ्याभोवती आवळला जातो ! पायाबरोबर साऱ्या शरीरातली शक्ती निघून जाते. तिची वाटचाल थांबते. परिस्थितीच्या झळा तिला आता वेढू लागतात. एकाच जागी थबकल्यामुळे धगीच्या तीव्रतेने कौतिक पार करपून जाते !

जीवन जगण्यासाठी चाललेला या सर्वसामान्य स्त्रीचा झगडा असामान्य आहे. दांडगा आत्मविश्वास ( पृष्ठ ४७, ५१ ) आणि समज ( ४२, ८९ ) सोशिक आणि श्रद्धाशील भाववृत्ती, प्रेमळ स्वभाव आणि माणुसकी ( सर्व विरोध विसरून ती सासऱ्याचा अंत्यविधी करते. १९५–१९९ ) यामुळे तिच्या झगडणाऱ्या व्यक्तिमत्त्वाला असामान्यत्व प्राप्त झाले आहे. परिस्थिती तिला फणा उभारून डंख मारू पाहते. पण त्यामुळे ती कोठेही बावरून, बावचळून गेल्याचे दिसत नाही. तिच्या कृतिउक्तीतून तिचा उदंड धीर, खंबीर मन यांचा वारंवार प्रत्यय येतो.

मुलांवर तिची माया आहेच, पण नवऱ्यालाही ती आईच्या मायेनेच जपते. समजावते. एका अर्थी तिला तीन नव्हे चार मुले आहेत. महादेव जणू तिचे सर्वांत मोठे पहिले नेणते लेकरूच आहे ! चोरांकडून लुबाडले गेल्यानंतर वैतागून घरी परत न येता परागंदा झालेल्या महादेवाला अमरावतीहून परत आणण्यासाठी तिने जी समजूत घातली तो सारा प्रसंगच विलक्षण हृदयस्पर्शी आहे ( १८२–१८५ ).

कौतिकच्या साध्या साध्या बोलण्यातूनही शहाणपण, अनुभवांचा अर्क व्यक्त होतो. ढोरासारखी मेहनत करणाऱ्या या स्त्रीची बुद्धी अडाणी नाही. त्यामुळे तिच्या झगडण्याला, कृतिउक्तीला अर्थपूर्णता लाभते. तिच्या वाट्याला आलेल्या दुःखानुभवांना विलक्षण धार प्राप्त होते. उदा. पुढील दोन उद्गार पहा – ( १ ) एक डाव मरन त्याले कोनीई लडन्; साराई मरन त्याले कोन तरी लडन ओ ? ( पृ. २२ ) ( २ ) मान्साच्या जातीनं दोन गोठींची सरम टिवाव् – एक त चोरी आन् दुसरी छिनाली. पोटाच्या धंद्याची कायची

सरम आये ? ( पृ. ४१ )

माणसाच्या जगण्याला अर्थ येण्यासाठी दोन गोष्टी हव्यात. एक काळीज आणि दुसरी गोष्ट छाती! प्रेम, ममता करण्यासाठी काळीज आणि हिमतीसाठी, जिद्दीसाठी छाती. भेकड मनुष्य प्रेम करू शकत नाही. आणि काळीज नसलेला आणि नुसती छाती असलेला मनुष्य कठोर असतो. त्याच्याजवळ भावनेचा ओलावा नसतो! कौतिकजवळ काळीजही होते आणि छातीही होती. वाईट एवढंच वाटतं की जीवन जगण्याची ओढ असलेल्या आणि आपल्या कुटुंबाचे कौतिक असलेल्या कौतिकबद्दल फक्त दुर्दैवालाच कौतिक वाटत होतं म्हणून त्या दुर्दैवाने तिला कधी आपल्यापासून दूर जाऊ दिले नाही!

महादेवाचेही चित्रण छान आहे. तो थंड आहे. आळशी आहे पण याचा अर्थ तो संसाराविषयी बेफिकीर आहे, उदासीन आहे असे नाही. प्रतिष्ठेच्या बाजवीच कल्पना उराशी बाळगणारा पण त्याचीही या समाजव्यवस्थेत उपेक्षा झाल्यामुळे शारीरिकदृष्ट्या दुबळा असलेला हा महादेव मनानेही खचत खचत चाललेला आहे. गरिबीने गांजलेला, परिस्थितीने पोखरलेला महादेव हा वरवर वाटतो तसा निष्क्रिय नाही. त्याला आणि एकूण या कुटुंबास भोगाव्या लागणाऱ्या दुःखाचा संदर्भ फार मोठा व्यापक आहे. समाजरचनेच्या किंवा आर्थिक समस्यांत या कादंबरीतील दुःखाची काही पाळेमुळे गेली आहेत हे विसरून चालणार नाही.

गरिबाला देखील मन असते, भावना असतात, स्वाभिमान असतो हे एकदा मान्य झाले की महादेवाच्या दुःखाचे काही पदर दिसून येतील. दोन चांगल्या माणसांची मने ते चांगले असूनही सारखी नसतात. प्रत्येक मनाची जडणघडण, शक्ती, कुवत, झेप ही वेगवेगळी असते. कौतिक करारी आहे, कणखर आहे आणि महादेव हा मवाळ आहे. कोमल आहे. वाटेत आलेल्या अडचणी दूर करण्याचा कौतिक प्रयत्न करते आहे तर महादेव अडचणी दूर करण्याचा प्रयत्न करता करता आपल्याच वाट्याला आणि वाटेला या अडचणी का याव्यात म्हणून खिन्न होऊन गेलेला दिसतो!

संसारातून तो पळून जातो ते जबाबदारी झटकून टाकावी म्हणून नव्हे तर संसारामध्ये आता आपण केवळ भार म्हणून राहू नये असा विचार आणि एकूण जीवनाबद्दलचा वैताग येऊन. चोरट्याकडून लुबाडल्यानंतर तो परागंदा होतो. कौतिक त्याची भेट घेऊन त्याला घरी का आला नाही 'असं सांग काबा घेऊन बसले ?' म्हणून विचारते तेव्हा तो उत्तरतो, 'मान्साले वैताग आला मंजे थो असाच देवाचा धावा करत असते.'( १८३ )

महादेव हा वागणुकीने नेकीचा होता. भीमाने चोरी केली म्हणून त्याने त्याला दोराने करकचून बांधले ( ८७ ). भीमा चंपी मालिश करण्याचे काम करू लागला तेव्हा याने आपल्या कुळास बट्टा लावला म्हणून आरंभी तो खिन्न होतो ( १४२ ). नंतर त्याचा नादच सोडून देतो ( १८६ ). शिंपी जातीत जन्मलो म्हणून आपल्या पोराने गुरे राखण्यास जावे हेही त्याला भावत नाही ( ४१ ). चोरी झाल्यावर नुकसान झाले त्या वेळी

माल गेला, पैसे गेले, त्याचबरोबर धंद्यातली इज्जत गेली म्हणून आक्रंदन करणारा ( १८४ ) महादेव पाहिल्यानंतर आपल्या प्रतिष्ठेच्या बाजवी कल्पनांना तो कसे जपत होता हे ध्यानात येते.

महादेवाचा कौतिकला फार मोठा आधार होता. तिच्या जिद्दीचे त्याला मनोमन कौतुक होते. कादंबरीकाराने तसे स्पष्ट न लिहिताही वाचकास ही गोष्ट कळून येते. पतीचे कौतुक, त्याचा विश्वास ह्या गोष्टीही स्त्रीला फार मोठ्या आधाराच्या वाटतात. म्हणूनच महादेवाने संसाराकडे पाठ वळवल्यावर कौतिक उन्मळून जाते.

आई नाही. बाप आहे पण तो तापट डोक्याचा, हलक्या मनाचा. तो विचारत नाही. दुबळ्या शरीराची साथ नाही. दैवाची मदत नाही. चांगुलपणाचं चीज नाही. त्यामुळे जीवनातील सारी उमेद गमावून बसलेला महादेव एके ठिकाणी वैफल्याने जे म्हणतो ते त्याच्या एकूण जीवनातील अनुभवाबद्दलच सार्थ वाटते.

या कथेतील अनेक घटना, प्रसंग वैशिष्ट्यपूर्ण प्रभावी आहेत. ते मूळ कथेला उठाव आणतात, विषयाला पोषक ठरतात. व्यक्तिरेखांची स्वभाववैशिष्ट्ये अधिक रेखीव करतात.

एक कलावंत म्हणून ग्रामीण लेखकास निसर्गाचे अधिक सूक्ष्म विशेष लक्षात येतात. काही वेळा उत्साहाच्या पोटी, आपल्या निसर्गविषयक या अर्थाने ' नैसर्गिक ' माहितींनी वाचकांना दिपवून टाकण्याच्या सोसाने ग्रामीण लेखक निसर्गवर्णनात रमून गेलेला दिसतो. अर्थातच अशी ' नैसर्गिक ' वर्णने स्वतंत्रदृष्ट्या सरस परंतु कथेच्या दृष्ट्या विचार करता कलात्मक नैसर्गिक ( अकृत्रिम ) वाटत नाहीत. निसर्गवर्णनाचा लेखकाने मोह टाळला हे विशेष वाटते. या कादंबरीत निसर्गवर्णने फार नाहीत.

निसर्गाबरोबरच तिथल्या लोकांचे स्वभाव, त्यांच्या आतिथ्यशीलतेसंबंधीचे सहजोल्लेख किंवा तसे चित्रण गर्वहीन, हृद्य आणि स्वाभाविक वाटतात.

गावातील हिंदू-मुस्लिमांच्या परस्पराबद्दलच्या सौहार्दाच्या भावना, कौतिक सगीना यांचे भावबंध, एकमेकांचे सण साजरे करण्यामधून व्यक्त होत असलेला गावातील लोकांचा एकोपा किंवा त्या पलीकडचेही जिव्हाळ्याचे रक्तापेक्षा घनदाट असलेले निबिड नाते ( ८१, ८४, १३५, १५३ ), यसोदेचा ताप निघावा म्हणून केलेले ग्रामीण उपाय ( १६४ ), प्रसूतीच्या वेळी मांगीण सुईण म्हणून येते, त्यांना लागणारे साहित्य ( १४५, १५७ ),, मृत मुलाचे अंत्यविधीपूर्व संस्कार ( १५८ ), जखमेवरची घरगुती औषधे ( १२५, १७१, १७७, २३३ ) अशा बारीकसारीक तपशिलांनी त्या प्रदेशाची खास वैशिष्ट्ये उभी राहतात.

कौतिकच्या कुटुंबाची गरिबी तिचे चित्रण भडक अगर बटबटीत नाही. साध्या साध्या वर्णनातूनसुद्धा त्या कुटुंबाची आणि त्यांच्या परिवारातील लोकांची सामान्य स्थिती, आर्थिकदृष्ट्या होणारी परवड या गोष्टी प्रत्ययास येतात. त्यांची ' जेवणे ' नव्हे तर पोटाची खळगी भरण्यासाठी केलेले पदार्थ त्यांचे उल्लेख ( ३६, ७०, १३३, १७०, १८०

१८१ ) त्याचप्रमाणे 'अपूर्वाई'च्या पदार्थांचे उल्लेखही ( ५. ३७, ९७, १००, १५०–१५२ ) या दृष्टीने पाहण्याजोगे आहेत. याशिवाय कौतिकचे लक्ष्मीपूजन ( ३८, ३९ ), शेतावर मोलमजुरी करून मिळवलेले धान्य, त्यातले काही धान्य देऊन खरेदी केलेल्या सटरफटर वस्तू ( ५१ ), नाना उपायांनी 'मिसन'साठी केलेली पैशांची जमवाजमव ( ७८ ), जत्रेत महादेवानं मांडलेल्या दुकानात रात्रीच्या वेळा पेटलेल्या दोन मेणवत्त्या, बाकीच्या सर्व दुकानात कुठे एक कुठे दोन दोन झगझगणाऱ्या गॅसबत्त्या, त्यामुळे महादेवाचे अंधारात गडप होऊन गेलेले दुकान ( १०४ ), धुतलेले कपडे वाळेपर्यंत कौतिकच्या फाटक्या लुगड्याचं चिंधूक गुंडाळून घंटीघड्याळाच्या व्हरांड्यावरील बर्फासारख्या गार फरशीवर कुडकुडणारा महादेव ( १८९ ) हे दृश्यचित्रण डोळ्यांना ओलावून टाकते.

आशयालाच लख्वा फुटावी अशी शेळक्यांची भाषा आहे. येथे अनुभवांच्या शोधांनीच आपसूक शब्दरूप घेतले आहे असे वाटते. ज्या जीवनाविषयी, ज्या व्यक्तीविषयी भाषा येते ते जीवन, त्या व्यक्ती आणि ती भाषा यांचे जीवाभावाचे, रक्ताचे नाते आहे हे लक्षात येते. येथे भाषा व्यक्तींना अस्सलपणे जिवंत करण्याकरिता आणि अनुभवांना 'रसरशीतपणे' व्यक्त करण्यासाठी येते.

शेळक्यांची शैली मितभाषी आहे. अवलोकनाचा, अनुभवाचा आणि आकलनाचा अर्क आविष्कृत करण्याचे त्यांचे सामर्थ्य असामान्य आहे. त्यांची शैली दुःखाला आक्रस्ताळेपणाने आक्रोश करून प्रदर्शन करणारी नाही. प्रसंगाप्रसंगातून, वाक्यावाक्यातून दुःख कोंदलेले दिसते.

ही भाषा, भाषेचे वेगळेपण दाखवण्याऐवजी वऱ्हाडचे वेगळेपण म्हणजे वऱ्हाडपण, आणि वऱ्हाडच्या माणसाच्या अंतरंगाचे दर्शन घडवण्यासाठी येते. या भाषेची ताकत इतकी आहे की एकदा जरी कोणी वऱ्हाडहून आलेला वाचक असेल त्याला ही कादंबरी वाचताना त्या वऱ्हाडी भाषेतील त्या लकबी, ते हेल, तो आर्जवीपणा, तो जिव्हाळा, ओलावा या साऱ्यांच्या आठवणींची वलये मनावर उमटू लागतील! वऱ्हाडच्या प्रदेशाशी परिचय नसलेल्या वाचकासही ही भाषा आकलनात कोठे अडचणी निर्माण करीत नाही, उलट रिझवते हे विशेष होय.

जिच्या 'तकदीराले चारीकून भोकं' आहेत ( २१९ ) अशा दुर्दैवी परंतु जिद्दी स्त्रीची ही कथा. ही कथा हृदयस्पर्शी व्हावी म्हणून लेखकाने कोठे भडक प्रसंगांची योजना केली नाही. तिची बाजू घेऊन लिहिण्याच्या आविर्भावाने ते तिची वकिली करीत बसले नाहीत. अलिप्तपणे नव्हे परंतु थोर कलावंताच्या संयमाने आणि समजदारीने ते कौतिकच्या जीवनाचा पट वाचकांच्यासमोर उलगडत राहतात. त्यामुळे त्यांच्या लेखनात गतिमानता आली आहे. निवेदनातील या गतिमानतेमुळे त्यांची कादंबरी कोठे रेंगाळत राहून कंटाळवाणी होत नाही.

महादेवासारखा सरळमार्गी, निरुपद्रवी मनुष्य, कौतिकसारखी जिद्दीची स्त्री, नामा-

सारखा हुषार मुलगा यांची आयुष्ये का कोमेजून, कोळपून जावीत ? त्यांनी असे कोणते पाप केले होते ? अपराध केले होते ? मग त्यांच्या वाट्याला का हे भोग आले ?...

प्रख्यात पाश्चात्त्य लेखकाने म्हटले आहे तेच खरे. खरा कलावंत हा प्रश्नांची उत्तरे देत नसतो तर वाचकांच्यापुढे प्रश्न उभे करीत असतो !



—डॉ. सुधाकर के. भोसले

तालिकीकरण : तात्त्विक, पृष्ठे १९+१११ किं. ३ रु.
तालिकीकरण : प्रात्यक्षिक, पृष्ठे १४४, किंमत तीन रुपये
द्विबिंदू वर्गीकरण पृष्ठे ९२, किं. २ रु.

**शा. ग. महाजन** महाराष्ट्र राज्य ग्रंथालय प्रकाशन

श्री. महाजन यांनी वरील तीन पुस्तके महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघातर्फे चालविण्यात येणाऱ्या अल्पमुदतीच्या ग्रंथपालन वर्गाला क्रमिक पुस्तके म्हणून लिहिली आहेत. पुस्तकांचा प्रधान उपयोग जरी वरील वर्गाच्या विद्यार्थ्यांसाठी असला तरी ग्रंथपालन शास्त्रातील काही विषयांची माहिती करून घेण्यासाठी सामान्य वाचकाला त्यांचा उपयोग होईल.

मूळ इंग्रजी भाषेत या विषयावर पुस्तके पुष्कळ निघाली आहेत व त्यांच्या परिभाषेबद्दल दुमत नाही. महाजन यांनी वापरलेला तालिकीकरण हा शब्द कितपत बरोबर आहे याची शंका आहे. तालिका याचा अर्थ सांख्यिकीशास्त्रात कोष्टक ( Table ) असा आहे. ग्रंथालयातील ग्रंथसूचीचा हा अर्थ निश्चितच नाही. तेव्हा सूचीकरण हा यथार्थ शब्द न वापरता तालिकीकरण हा शब्द अट्टाहासाने का वापरण्यात येतो हे समजत नाही.

तालिकीकरणाच्या दोन्ही पुस्तकांत पुनरुक्ती फार झाली आहे व एकच पुस्तक (तात्त्विक व प्रात्यक्षिक प्रसिद्ध केले असते तरी चालले असते. श्री. महाजन यांनी कुलनामाविषयी त्यांच्या तालिकीकरण तात्त्विक या पुस्तकात खालील विधान केले आहे. " युरोपियन, मराठी आणि गुजराथी भाषिक नावामध्ये प्रथम व्यक्तिनाम ( पाळण्यातील नाव ) व नंतर वडिलांचे नाव येत असते.' ( पृ. ८४ ) हे विधान मराठी व गुजराथी भाषिक नावाबाबतीत बरोबर असले तरी युरोपियन नावाबद्दल निश्चित चूक आहे. उदा. श्री. चर्चिल यांचे नाव विन्स्टन स्पेन्सर चर्चिल असे आहे. त्याच्या वडिलांचे नाव रॅण्डॉल्फ चर्चिल असे होते. त्यांच्या नावात हा उल्लेख कोठेही नाही. कानडी भाषिक गटाबद्दलही हे विधान विवाद्य आहे. कारण राजकीय परिस्थितीमुळे पूर्वीच्या मुंबई राज्यातील कर्नाटक रहिवाशी आपली नावे मराठी व गुजराती भाषिक गटाप्रमाणे लिहीत असत. उदा. दा. चिं. पावटे, त्यामुळे कानडी भाषिक सांस्कृतिक गटामध्ये कुलनाम आधी येते याविषयी खुलासा करावा लागेल.

द्विबिंदू वर्गीकरणाच्या पुस्तकातही सामान्य पोटविभागात परवर्ती पोटविभाग इतक्या विस्ताराने द्यावयाची जरुरी नव्हती. कारण अल्पमुदतीच्या अभ्यासक्रमासाठी पुस्तक लिहिले आहे व इतक्या अल्पमुदतीत विद्यार्थ्यांना हे सर्व शिकवणे अशक्य वाटते. इतिहास व राज्यशास्त्र या दोन विषयांवरील पुस्तकांचे वर्गीकरण करण्याबद्दल डॉ. रंगनाथन यांनी आपल्या ग्रंथात स्पष्टीकरण केलेले आहे. श्री. महाजन यांनी त्याचा अनुवाद येथे केलेला नाही, त्यामुळे विद्यार्थ्यांचा घोटाळा होण्याची शक्यता आहे. भूप्रदेशाचे कोष्टक देताना भारताच्या सर्व राज्यांचे जिल्हावर शुद्ध रूपात कोष्टक द्यावे. कारण पुस्तक ज्यांच्याकरता अभिप्रेत आहे त्यांना त्याची जरुरी भासेल.

श्री. महाजन यांचा प्रयत्न अभिनंदनीय आहे व मराठी भाषेत या विषयावरील ग्रंथ-संख्या वाढल्याशिवाय त्यात सुधारणा होणार नाही.

— मु. वि. सोवनी



## सह्याद्रीतील आदिवासी महादेव कोळी !

**डॉ. गोविंद गारे** पृष्ठे २८८, किंमत पंधरा रुपये.

डॉ. गोविंद गारे ह्यांचे नवीन पुस्तक ‘ सह्याद्रीतील आदिवासी महादेव कोळी ’ हे नुकतेच प्रसिद्ध झाले आहे. दलित आणि आदिवासी जीवनावर मराठी भाषेत तसे वाङ्मय खूपच कमी लिहिले गेले आहे. डॉ. गोविंद आदिवासी, गिरिजन. आदिवासी जीवन गारे स्वतः ते जगलेले. त्यामुळे सह्याद्रीपट्टीतील आदिवासी जीवनावर लिहावे अशी त्यांना प्रेरणा मिळाली असेल तर आश्चर्य नाही. यापूर्वी ‘ मावळती मुशाफिरी ’ ही आदिवासी जीवनावरची लेखमाला त्यांनी लिहिली होती. तिचे चांगले स्वागत झाले होते. पुढे आदिवासी प्रश्नावर गोखले अर्थशास्त्र संस्थेचे सहकार्य घेऊन त्यांनी संशोधन केले. नंतर त्या प्रश्नांवर त्यांनी पी.एच्. डी. पण मिळवली.

सामान्यतः पदवी मिळविली की अध्ययन थांबते. तसे मात्र डॉ. गारे यांच्या संदर्भात झाले नाही. महाराष्ट्रातील दलित—शोध आणि बोध हा ग्रंथ श्री. शिरूभाऊ लिमये यांच्या सहकार्याने त्यांनी लिहिला व त्या ग्रंथाला महाराष्ट्र राज्य सरकारचा राज्य पुरस्कारही मिळाले.

या नव्या पुस्तकाची मांडणी दोन भागांत करण्यात आली आहे. पहिल्या भागात महादेव कोळी या आदिवासी जमातीच्या ऐतिहासिक व सामाजिक जीवनाचा आढावा घेण्यात आला आहे. त्यांचे लोकजीवन, गावरहाटी, जीवनानंद, आदी कशा आहेत हे त्यांनी विस्ताराने लिहिले आहे. इतिहासकाळामध्ये या आदिवासी जमातीने कोणते कार्य केले हे मोठ्या साक्षेपाने त्यांनी कथन केले आहे. आदिवासी जमातीचा बाह्यजीवनाशी

संबंध कमी येतो. पण जेवढा संबंध येतो तेवढ्या संबंधानेही त्यांच्यात हळूहळू परिवर्तन घडू लागते. ते आवश्यकही आहे. आदिवासी मंडळी नागर व्हावीत याचा अर्थ त्यांनी आपले संगीत, नृत्य, हस्तकौशल्य सोडावे असेही नाही. दऱ्याखोऱ्या, जंगल यांच्याशी जवळचे नाते आदिवासींचे असल्यामुळे त्यांच्यात शौर्य, धैर्य, साहस व स्वच्छंदीपणा नैसर्गिक रीत्याच असलेले आढळते. स्वाभाविकच आदिवासी नागर जीवनाशी निगडित होत जातील तसतसे त्यांचे काही स्वभावविशेष बदलतील ही गोष्ट खरीच.

सह्याद्रीच्या कुशीत पिढ्यान्‌पिढ्या विसावलेला महादेव कोळी आदिवासी जमातीचा इतिहास डॉ. गारे यांनी सांगितला आहे. दुसऱ्या विभागात आदिवासींच्या आर्थिक आणि सामाजिक समस्यांची चर्चा डॉ. गोविंद गारे यांनी केली आहे. शेतकरी आणि शेतमजूर यांचे उत्पन्न, त्यांची आर्थिक दुर्दशा त्यांनी विस्ताराने वर्णिलेली आहे. आदिवासी आणि जंगल यांचे अन्योन्य संबंध आहेत. ते कसे आहेत ? जंगलतोडीचे प्रश्न याची चर्चा त्यांनी चांगली केली आहे. आदिवासींचे शिक्षण, आरोग्य, राहणीमान यांची पण चर्चा त्यांनी केली आहे. या प्रश्नाच्या संदर्भात सरकारने नेमलेल्या विविध आयोगांचे अहवालही त्यांनी तपासले आहेत. आदिवासी विकास योजना, त्यांच्या राजकीय आणि सामाजिक समस्या यांचा आढावाही त्यांनी घेतला आहे. आदिवासींच्या सामाजिक जीवनात स्थित्यंतर व्हावे आणि एकात्म समाजजीवनाकडे त्यांनी वाटचाल करावी ही निरोगी भूमिका डॉ. गोविंद गारे यांनी घेतली आहे. सवलतीसाठी सवलती ही डॉ. गारे यांची भूमिका नाही. भारतामध्ये एकात्म समाजजीवन निर्माण व्हावे आणि या एकात्म समाजजीवनाच्या प्रवाहात आदिवासी समाज एकरूप व्हावा असे त्यांना वाटते. हे या पुस्तकाचे फलित आहे, असे माझे मत आहे.

डॉ. गोविंद गारे हे समाजशास्त्रज्ञ आहेत. अभ्यासू आहेत. स्वतः आदिवासी आहेत. यामुळे निर्वैर वृत्तीने त्यांनी लेखन केले आहे. कोणाविरुद्ध त्यांनी कोठेही आकस व्यक्त केलेला नाही. सरळ साधे पण हृदयाला स्पर्श करणारे लेखन त्यांनी केले आहे. त्यामुळे पुस्तक अधिक आकर्षक झाले आहे. समृद्ध समाजजीवनाचे स्वप्न पाहणारे गारे येथे दिसतात. एकात्म समाज विविध अंगी असणार हेही त्यांना जाणवत असलेले दिसते.

मराठी साहित्यात डॉ. गोविंद गारे यांच्या या ग्रंथाने मोठी मोलाची भर घातलेली आहे. समाजशास्त्राचे उपेक्षित दालन त्यांनी या ग्रंथाने समृद्ध केले आहे. आदिवासींच्या प्रश्नांचे अध्ययन समाजशास्त्रीय दृष्टीने कसे करता येईल याचा वस्तुपाठच त्यांनी या ग्रंथाद्वारे जणू दिला आहे. समाजशास्त्राचे अध्ययन करणाऱ्यांची चांगली सोय या पुस्तकाने केली आहे. एका संग्राह्य ग्रंथाची मराठी वाङ्मयात भर घातल्याबद्दल डॉ. गोविंद गारे यांचे अभिनंदन.

— वासू देशपांडे



अनुक्रमणिका

# ' नटसम्राट '

## रमेश वा. धोंगडे

'नटसम्राट'वर आतापर्यंत बरीच उलटसुलट चर्चा झाली. ''नटसम्राट' हे एक मराठीतील उत्तम शोकनाट्य ( tragedy ) आहे' येथपासून तो 'हे नाटक एका मामुली घरगुती संघर्षावर संपते' येथपर्यंत अशी भिन्न मते मांडण्यात आली. प्रस्तुत लेखाचा हेतू प्रामुख्याने या टीकेचे खंडन वा समर्थन करणे नव्हे. नाटक आणि टीका या दोघांचा एकाच वेळी विचार करून काही निसटते धागे पकडण्याचा हा एक प्रयत्न.

गडकऱ्यांचे 'एकच प्याला,' कानेटकरांचे 'अश्रूंची झाली फुले' आणि कोल्हटकरांचे 'दुरितांचे तिमिर जावो' ही नाटके एका दृष्टीने एकाच जातीची. उच्चभ्रू टीकाकार यांना कमी-अधिक प्रमाणात नाके मुरडतो ते त्यांतील भडकपणाला. भावनांची एकांगी वाढ करून खांडेकरी पद्धतीने शब्दांची पखरण केली की मराठी प्रेक्षक भुलतो, 'टाळी देतो' अन् रडतोही. प्रेक्षकांचे असे भारावणे हेच नाटककाराचे यश. 'शांतता! कोर्ट चालू आहे' मधील बेणारेच्या स्वगताला आक्षेप घेणारा टीकाकार याच प्रकृतीचा. शिरवाडकरांनी 'नटसम्राट'मध्ये हेच केले. 'ज्यांना नमस्कार करायला जागा नाहीत ती माणसं अभागी, आणि जागा असून ज्यांना नमस्कार करायचा धीर होत नाही ती निव्वळ कपाळकरंटी' ( १ ) 'सक्तीच्या शहाणपणापेक्षा भक्तीचा मूर्खपणाही एखादेवेळी अधिक यशस्वी होतो' ( ३:१ ) अशी कालेलकरी छापाची वाक्यं टाळी घेतात. तर 'सरकार, तिला माहीत आहे, माझ्या क्रोधाला पाय नाहीत, हात नाहीत. लुळापांगळा आहे तो. वडाऱ्यानी अर्धवट चिरलेल्या डुकराचं धड नुसतं. गटारात तडफडणारं...मी रागवणार नाही...पण मी रडणारही नाही. डोळ्यांत आसवं जमायला लागली तर खिळे मारून डोळ्यांच्या खाचा करीन संभाजीसारख्या, पण रडणार नाही' ( २:३ ) किंवा,

'एका बाजूला, आम्ही ज्यांना जन्म दिला
ते आम्हाला विसरतात

अनुक्रमणिका

## आपण हे करू शकाल !

**ग्रंथ सहाय्य**

आपल्याजवळ दुर्मिळ ग्रंथ किंवा अन्य ग्रंथ असतील तर परिषदेच्या संदर्भ ग्रंथालयाला आपण देणगी म्हणून द्यावे. परिषदेचे अधिकारी वा सेवक आपल्याशी संपर्क साधून ग्रंथ आणवून घेण्याची व्यवस्था करतील.

**वर्गणी पाठवा**

— ज्यांची सभासदवर्गणी संपली असेल त्यांनी त्वरित वर्गणी पाठवून द्यावी.

— मनिऑर्डरने वर्गणी पाठविताना सभासदाने नाव, संपूर्ण पत्ता, वर्गणीचा कालावधी मनिऑर्डर कुपनपर लिहिणे आवश्यक आहे.

— वर्गणी जमा झाली असेल त्यांनाच अंक पाठविण्यात येतो.

**जाहिराती द्याव्या**

आपण जर कारखानदार, व्यापारी, प्रकाशक, मुद्रक, पुस्तक-विक्रेते असाल तर जाहिरात देऊन पत्रिकेला सहकार्य करावे.

**पत्रव्यवहाराचा पत्ता**
**कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद**
**टिळक रस्ता, पुणे ३०.**

आणि दुसऱ्या बाजूला, ज्यानं आम्हाला जन्म दिला
तो तूही आम्हाला विसरतोस,
मग विस्कटलेल्या हाडांचे हे सापळे घेऊन
हे करुणाकरा,
आम्ही येरझ्यांनी
कोणाच्या पायावर डोकं आदळायचं ?
कोणाच्या—पायावर—कोणाच्या—( २:३ )

अशी वाक्यं प्रेक्षकाला रडवतात.

पण 'हलवून' सोडणारी वाक्यं उथळच असतात का ? टीकाकार ज्याला भावनेचा अतिरेक म्हणतात तो नेहमीच सदोष असतो का ? 'Intensitication of feelings' असे वर्णन करून हक्सलेसारखा टीकाकार त्याला शोकनाट्याची एक मूलभूत गरज मानतो. आधुनिक काळांत यांत्रिकीकरणाने खुजा झालेल्या माणसाच्या बाबतीत हे संभव-नीय नाही व म्हणून आधुनिक इंग्रजी प्रेक्षकाला ते रूचणार नाही आणि म्हणूनच आधुनिक काळात उत्तम शोकनाट्य लिहिले गेले नाही हा त्याचा निर्वाळा, 'नटसम्राट'ला भडकपणाचा कधीकधी वास येतो अशी तक्रार करणाऱ्या टीकाकारांची भूमिका उमजण्यास उपयुक्त व्हावा. शिवाय शेक्सपिअरच्या ज्या नाटकाचा एक उत्तम शोकनाट्य म्हणून उल्लेख होतो त्या ' King Lear ' मध्ये अशी भडक वाक्ये आहेतच :

' Old fond eyes '
Beweep this cause again, I'll pluck ye out,
And cast you, with the waters that you lose,
To temper clay ' ( I : iv ),
You heavens, give me that patience, patience I need !
You see me here, You Gods, a poor old man,
As full of grief as age; wrctched in both ! ' ( II:iv )

' नटसम्राट 'चा शोकनाट्य म्हणून विचार करण्याचा मोह का होतो ? ' लिअर 'च्या रूपांतराऐवजी ' नटसम्राट ' लिहिले असे शिरवाडकरच म्हणतात. नाटकात शोकनाट्य उभं करण्याचा प्रयत्न आहे.

' मी कोणावर रागावलो नाही. चैत्रातील सोनेरी सकाळ माझ्या अंगातून झिरपते आहे. नव्या नाटकाचा पडदा वर जायची वेळ आहे ही. तिसरी घंटा वाजते आहे. धूपाचा सुवास हवेत दाटला आहे. ऑर्गनवरून नांदीचे सूर ऐकू येत आहेत.—आणि माझी नटी तर अगांतुकपणानं अगोदरच स्टेजवर जाऊन बसली आहे माझी वाटत पाहात ' ( ३:३ ) हे नटसम्राटाचे अखेरचे शब्द नाटकात चपखल, बसत नाहीत. पण ' A tragedy

ends on a note of peace ' हा आडाखा मनात बांधूनच नाटककाराने हा असफल यत्न केला आहे असे वाटते. पण शोकनाट्य म्हणून फसले म्हणजे नाटक फसले का ? फसलेले शोकनाट्य बहुधा ' मेलोड्रामा 'कडे झुकते. उमेदवारीच्या काळात शेक्स-पिअरच्या हातूनही हेच झाले. ' Titus Andronicus ' याची साक्ष देते. ' नटसम्राट' शोकनाट्य नव्हे असे म्हणणाऱ्या टीकाकारांचा सूर असाच दिसतो. पण ते संपूर्णतः खरे नाही.

' नटसम्राट 'मधील संघर्षावरील टीकाही अशीच साचेबंद वाटते. हा संघर्ष अखेर पिता–पुत्र यांतील भांडणावर थांबतो असे काहींचे म्हणणे. त्यात बिघडले काय ? शोक-नाट्यात संघर्षाचे उदात्तीकरण ( Sublimation ) होते हा आडाखा बांधून केलेल्या टीकेचा तर हा नमुना नव्हे ? ' नटसम्राट 'मधील संघर्ष हा दोन पिढ्यांतील संघर्ष आहे; तरुण पिढीची बाजू भक्कम असल्याने नाटकाला कारुण्याची धार चढत नाही ही टीका हास्यास्पद आहे.

' मी हजारदा तुमच्या पायांवर डोकं ठेवीन, आप्पा, पण माझ्या संसाराचा आणि शारदेचा बळी तुमच्या पायांवर देणार नाही ' ( १ )

असं म्हणणाऱ्या नंदाचा आरोपच फुसका आहे. तरुण पिढीला चीड येईल इतके आप्पांचे वर्तन असंस्कृत नाही. नंदाचा दृष्टिकोण व्यवहारी आहे असे म्हणणाऱ्यांना मग ' लिअर ' मधील गॉनेरीलही अगदी व्यवहारी, शहाणी वाटावी, कारण

' Come, Sir '
I would you would make use of that good wisdom,
Whenceof I know you are fraught; and put away
These dispositions which of late transport you
From what you rightly are ( I : iv )

असे म्हणणारी गॉनेरील किंवा

' You should be ruled and led
By some discretion that discerns your state
Better than yourself ' ( II : iv )

असे म्हणणारी रीगन ह्या नंदापेक्षा काय वेगळ्या आहेत ?

' नटसम्राट 'मुळे उदात्त नाट्याचे समाधान मिळत नसले तर त्याचे कारण गौडी शैली किंवा केवळ दुबळा संघर्ष नाही; ते दुसरीकडे शोधले पाहिजे. शेक्सपिअरच्या गाजलेल्या नाटकांच्या यशाचा मोठा वाटा प्रामुख्याने त्यातील स्वभावचित्रणाकडे जातो असे म्हणतात. म्हणजे नेमके काय होते ? शेक्सपिअरची पात्रे नाटकात जगतात; नुसती बावरत नाहीत ती अलंकारिक भडक बोलतातही. पण ती चिरस्मरणीय होतात ते भाषेच्या

अवडंबराने नव्हे तर साध्या साध्या वाक्यांतूनही चमकून उठणाऱ्या त्यांच्या स्वभाव-दर्शनामुळे. वरून छोटेसे दिसणारे एखादे रोपटे वर काढून पाहिले तर त्याच्याखाली त्याच्या बाह्य उंचीपेक्षा जास्त लांब-रुंद अशी त्याची मुळे दृष्टीस पडतात. शेक्सपिअरच्या पात्रांच्या संवादांचे असेच होते. वरून दिसायला लिअरची ही वाक्ये

' I did her wrong ' ( I : v )
' O fool ! I shall go mad ' ( II : iv )
' Pray, do not mock me
I am a very foolish fond old man ' ( IV : vii )
' If you have poison for me, I will drink it ' ( IV : vii )

किती साधी आहेत. त्यात अलंकार नाहीत, प्रतिमा नाहीत, भावनेचा उघड स्फोट नाही. पण त्यांच्यामागे संश्लिष्ट ( complex ) भावनांचे कल्लोळ दडले आहेत; त्यांच्यामागे लिअरच्या स्वभावचित्रणाचा इतिहास आहे. शेक्सपिअरचे बाह्यात्कारी अनुकरण शिरवाडकरांनी केले—भाषांतर तर फारच सुन्दर केले. ' नटसम्राट ' रिझवते ते त्यात अवतरलेल्या मराठी लिअरमुळे. अपवादाने

' क्लोरोफॉर्म फार झाला, आता ऑपरेशन करून टाका ! ' ( १ ) अशी नटसम्राटाच्या धुमसत्या रागाचे दर्शन घडविणारी, किंवा

' परमेश्वरा, कुत्र्याला, घोड्याला, उंदराला जिवंत राहता येतं आणि माझ्या कावेरीला मात्र नाही ! ' ( ३:३ )

अशो त्याच्या मनातील गहिऱ्या दुःखाचे दर्शन घडविणारी तर क्वचित्

' खरं सांगतो वाद्यांनो,
तुफानाला तुफानपणच
नडतं आहे—' ( ३:२ )

अशी त्याच्या आत्मप्रत्ययाची साक्ष देणारी वाक्यं सापडतात. पण ती इतर जंजाळात हरवून जातात. लिअरसारखा नटसम्राट वाढत नाही; त्याचे लिअरपण क्वचित स्पर्शून जाते पण ठाव घेत नाही. तो नाटकातही ' नट 'च राहतो ' व्यक्ती ' होत नाही. हीच त्याची शोकांतिका !

*

अनुक्रमणिका

